२

पुरवणी अखबार पुणें छ २७ रमजान सन ११९५ हिजरी.

कलकत्याहून इंगरेजांचीं जाहाजें कासीस रवाना जाहलीं व कोण्ही सरदार पलटण्यासुधां माघोन येणार म्हणोन पूर्वील पत्रीं मार लिहिला होता. सांप्रत सर्वत्र जनचर्चा व सावकारी वर्तमान कासीहून आलें कीं इष्टैन नामे इंगरेज सातआठ पलटणासुधां कासीस आला. ग्वालेर प्रांती येणार म्हणोन जनवदंता आहे. पंतप्रधानांचे कारपरदाजानीं तजवीज केली आहे कीं बंगाल्यांत गनीमी फौज पाठऊन तो मुलुक ताख्तताराज करावा. पेशज रवानगी फौज कलकतेवाल्यानीं कासीस पलटणें पाठविलीं आहेत. याउपरी पंतप्रधानाकडील फौज कदाचित रवाना होईल. तर ज्या रुखं फौज जाईल त्या रुखावर इंगरेजांची जमीयत सदराह होईल. याप्रमाणें येथील कितेक मातबरानीं कयास केला आहे.

हरीपंत फडक्यांची प्रक्रुतीं सांप्रत स्वस्थ आहे. दरबारास अद्यापि येत नांहींत.

पंतप्रधानानी तमाम हुजराती वगैरे स्वार व सरदारांस पुण्यांस येणें म्हणोन पत्रें पाठविलीं आहेत. अद्यापि कोण्हीं लोक आले नांहीत. व मालोजी घोरपडे व पाटणकर वगैरे पुण्यांत छावणीस जे राहिले त्यांस सालझाडच्या बाा बाकी तलब पाऊन त्यांची समजावीस अद्यापि जाहली नांही. कोंकणांत तळेघोसांळे प्रांती हबसी यांचा हंगाम पूर्ववत आहे. त्याच बंदोबस्त होता दिसत नांही.

या उपरी जे नवल विशेष वर्तमान होईल तें सेवेसी विनती लिहीन हे विनती.

पैा। छ १० माहे शवाल संन ११९५ हिजरी-रोज शेनिवार डांकेवर मै दारोगे.

---

श्रीनिवास

पुाा श्रीमंत राजश्री नानास्वामीचे सेवेसी विनती जे मौजे मुधळवाडी पाा पैठण येथील शाकभाजी पूर्वापार पैठणास विकावयास येत आहे. सांप्रत पैठणकर कितेक दुष्ट लबाड जमीदार

यांचे सांगितल्यावरून तेथील आमिल मुधोळवाडीकरास म्हणतो कीं कांहीं नजर देणें. म्हणजे पटी देणें. न द्याल तरी पैठणास शाकभाजीचे विकरीस न येणें. त्यास पूर्वापार मामूल नसतां नवीन बाबत काढून गांवकरास उपद्रव देतात. याचप्रमाणें फर्मा-येसी वगैरेचाही उपद्रव फार लागतो. येविषई औरंगाबादचे सुब्यास प्रखर ताकीद व पैठणकर खंडेराव केशव वगैरेस स्वामीचें पत्र प्रखर आलियां उपयोगी पडेल हे विनंती.

पैा छ १० माहे शवाल संन ११९५ हिजरी रोज शेनिवार डांकेवर मै दारोगा.

---

**A. R. No. 110** — २८ रमजान ११९५ हिजरी
१७ सप्टेंबर १७८१

पाा छ ५ शवाल सन ११९५ हिजरी सरकारच्या डाकेबराबर आले ते दारोग्याचे विद्यमाने पावले.

श्रीशंकर

विनंती विज्ञापना यैसी जे यथील कुशल ताा छ २८ माहे रमजान मुाा पुणे. स्वामीचे कृपावलोकणेकरून येथास्थित जाणौन स्वानद लेखन आज्ञा करीत असिले पाा विशष. यथील वर्तमान छ २३ माहे माार रोज बुधवारी प्राथःकाली विनंतीपत्र सरकारचे डाकेसमागमे सेवेसी रवाना केले ते पावोन सविस्तर वर्तमान ध्यानास आले असेल. तदनतर यथील वर्तमान राा चितो विठ (ल) याचे कारकून मावळात पळून जाऊन लपून होते. त्याजकडे लाख दोन लक्ष रुपयाची ठेवी आहे म्हणौन चितोपताचा पुतन्या फिरयाद जाला. म्हणौन नानानी त्या कारकुनास धरावयास कारकून व गारदी पाठविले होते. त्या कार-कुनाचा शोध लागला. त्यास आणून चितोपताचे द्रव्य लक्ष दोन लक्ष

रुपये त्याजपासी आहे, ते घेणार. शृत होये. दिलीहून वकीलाची अखबार आली. वर्तमान लिहिले होते की पातशाहा व नजीबखान येकत्र होऊन फौज्यसहित बाहेर निघनार, कारण की, इग्रजाचे पारपत्य व्हावे. प्रस्तुत नजीबखान वगैर याजपासी फौजेचा ज्यमाव विशेष आहे. दुसरे लिहिले होते की, नजीबखानाचे मानस आहे की सिंद्याणी इकडे यावे. आणिक कितीयेक आखबारी वर्तमान लिहिले होते. श्रुत हाये. छ २४ रोज गुरुवार सुवर्णदुर्गास पहिले इग्रजाचे ज्याहाज सवदागरी सापडले होते. त्याजवर चौ लक्षाचा किरानबाब वगैर माल सापडला. त्यास येथील सावकारापासून बलेच रुपये घेऊन त्या ज्याहाजावर माल जो सापडला तो सावकारास द्या म्हणतात. येविशई सावकार रदबदली करितात. परंतु बलेच त्याचे पदरी माल घालणार. श्रुत होये. पुण्यात सर्वत्रावर घरपटी केली आहे. घराची किमत करून पाच व साहावा हिसा घ्यावा, यैसी वदंता आहे. मग काये निश्चये होऊन घेतील ते सेवेसी लेखण केले जाईल. श्रुत होये. मामलतदार व कमाविसदार वगैर मिलाले आहेत. मागील फडचे होऊन पुढील मामलतीच्या रसदा घेऊन मामलती सागणार श्रुत होये. दरबार वगैर जाला होता. श्रुत होये छ २५ रोज शुक्रवार. राजश्री हरीपंतास पोटदुखीची वेथा निर्मान जाली आहे म्हणून ते घरातच बसतात. दरबारास येत नाहीत व बाहेर निघत नाहीत. नानाच हारीपंताचे घरी येका दो दिवसा येतस्तात व खलवत करितात. मागती नाना आपले घरी जातात नानाही फारसा दरबार करीत नाहीत. येकांतासच आसतात. दरबारचे लोक मुतसदी वगैर बाहेर बसतात. च्यारच्यार पाचपाच रोज नानाचे दर्शण होत नाही. पाचच्यार आसाम्या खलवतीच्या मात्र आहेत, त्या जातस्त्यात. वरकडाचे दर्शण होत नाही सिलेदार वगैर लोकाचाही देण्याचा गौगवा विशेष. तमाम लोकास पत्रे सिलेदार वगैर यास लिहिले आहे की दसऱ्यास डेरे बाहेर होणार. सत्वर जमा व्हावे. परंतु लोक देण्याघेण्यामुळे आजुर्दा आहेत. त्यामधे नानाचे दर्शणही कोन्हास होत नाही यैसे आहे. श्रुत होये.

हरीपंतास महिना पधरा दिवस पोटदुखीची वेथा लागली आहे. औशधी उपाये करितात. परंतु गुनास येत नाही. वदंता आहे की सकारपूर्वक वृधाची बाधा जाली आहे. च्यईण पडू देत नाही. यामुळे पचवीसतीस ब्राम्हण आणुष्टाणास घातले आहेत यैसी वंदंता यैकिल्यात आली आहे. श्रुत होये. प्रज्यन्याची दोनतीन महिने आखाडी पडली होती. प्रस्तुत तीनच्यार रोज प्रज्यन्याचा वर्शाव चागला जाला. श्रुत होये. छ २६ रोज शनवार करनेल गाडर ममईस आहे व पलटणे वगैर कल्याणीस आहेत. वदंता आहे की गाडर मजकूर कल्याणीस आल्यानंतर इकडे बोरघाटाकडे कूच करणार यैसी वदंता आहे. परतु श्रीमंत राजश्री दादासाहेब वगैर हे ज्यमाव करून कोडाईबारीकडे गडबड करणार यैसे वर्तमान विशेष आहे. श्रुत होये. विज्ययादशमीस नाना डेऱ्यादाखल होणार यैसी वदंता आहे. निश्चये जाल्यास लेखण केले जाईल. श्रुत होये. हैदर नाईक आरकाटेस बंदोबस्त करून आहे. पुढे चिनापटणाकडे जाणार. इग्रजाचाही चिनापटणाजवल ज्यमाव विशेष आहे यैसे वर्तमान आहे. तिकडील लढाईचे वर्तमान आलियास सेवेसी लेखण केले जाईल. श्रुत होये. छ २७ रोज रविवार हिंदुस्तानप्रांती सिंद्यासी व इंग्रजासी लढाई आहे. परंतु इंग्रजाचा ज्यमाव विशेष यैसे वर्तमान आहे. श्रुत होये. सुरापूरकर सवस्थाणिक येथे येणार हे पूर्वी आक्षरशाहा लेखण केले होते. त्याजवरून ध्याणास आले आसेल. त्यास सुरापूरकर सवस्थाणिक येथून येकादा मजलीवर आले आहेत. येथे दाखल होणार. दाखल जाल्यास लेखण केले जाईल श्रुत होये. ममईची बातमी यास येत नाही. तेथे कारकूण पाठवावयाची यौज्यणा केली होती. कारकूण कोन्ही इंग्रजाचे दहशदीमुळे जाईना हे पूर्वी लेखण केले होते. चितामण दीक्षित सावकार याची दुकाण ममईस आहे. त्याचा कारकूण यैसा बाहाणा करून याणी आपला कारकूण बातमी ल्याहावयास पाठविला आहे. तेथील बातमी येणे कठीणच यैसे आहे. श्रुत होये. राजश्री कृष्णरावजी येकादो दिवसात हजुरात दाखल होणार. पोहोचले असतील अथवा

पोहोचतील. श्रुत होये. प्रस्तुत येथे प्रसंग आहे की दसऱ्यास डेरे वगैर बाहेर करून, दाखल होऊन फौज वगैर जमा करावी. इंग्रजाचे पारपत्यास कोकण प्रांती व कोडाईबारीकडे फौजा रवाणा कराव्या. नानाणी वगैर डेऱ्यादाखल आसावे यैसी काही यौज्यणा करितात. मग काये निश्चयात येऊन ठैरल हे लेखण केले जाईल. श्रुत होये. होलकर वाफगावी आहेत. तेही दसऱ्यास आपली फौज वगैर जमा करणार यैसे वर्तमान आहे. श्रुत होये. पुढे जे प्रसगाचे वर्तमान ध्यानास येईल ते सेवेसी लेखन केले जाईल. सदैव आज्ञापत्री परामृश होत असावा. बहुत काये लिहिणे, कृपा लोभ कीजे, हे विज्ञाप्ती.

---

**A. R. No. 111**

१ शवाल ११९५ हिजरी
२० सप्टेंबर १७८१

पैा छ ५ शवाल सन ११९५ हिजरी.

श्रीनिवास

अखबार* पुणं अज इा छ २८ रमजान लगायत छ १ शवाल सन ११९५ हिजरी आश्विन गुरुवार.

करनल गाडर सुरतेहून बडोद्यास फतेसिंग गाइकवाडासमीप सलाहमसलतीकरितां गेला आहे व रघुनाथराव सुरतेसमीप बागांत उतरले. व सटवाजी भोंसले व बाजीराव बरवे वगैरे सोनगड प्रांती फौजेचे निगाहदास्तीकरितां आले आहेत. मिस्तर हिस्तैन गोरनर कलकतेवाला पांचसाहा पलटणासुधां कलकत्याहून कासीस आला. व माहदाजी सिंदे काळाबाग कालीसिंद नदीसमीप आहेत. हैदरअलीखान आरकाट कंचीचे माबैन व जनराल कूट चिनापटणाहून पांचसात कोसावर जमीयतसुधां खान मााराचे मुकाबिल्याचे दाइयानें मुस्तैद जंग आहे. या-

---

* प्रस्तुत अखबारच्या पुरवण्या २ व ३ क्र. नं. ११२ खालीं पहावयास सांपडतील. हा प्रमाद अखबारनवीसानें अखबारचीं वेगवेगळी पानें मागेंपुढें पाठविल्यामुळे घडलेला आहे.

वितरिक्त आवांतर वर्तमानासहित पूर्वीं अखबार हुजूर व स्वामीचे सेवेसी पत्र डांकेवर पाठविलें तें पाऊन वर्तमान श्रुत जाहलें असेल. त्या उपरी कारपरदाजांचे जुबानीं व खारिज यैकिलें व प्रत्यक्ष पाहिलें वर्तमान दफेवार लिहिलें असे.

गोरनर जनरल इमादुदौला मिस्तर हिस्तैन बहादर जलादतजंग कलकत्याहून कासीस आला म्हणोन पूर्वीं वर्तमान लिहिलें आहे. सांप्रत बाळाजीपंत बुंदेले निा पंतप्रधान सांगरांत आहेत. त्यांची पत्रें सतावीस दिवसाचीं सागरीहून पंतप्रधानास आलीं. त्यांत माार लिहिला आहे कीं मिस्तर हिस्तैन कासीहून तीन मजली आला ते समई राजा चेतसिंग, बळवंतसिंगाचा पुत्र, बमोजिब तलब मिस्तर माार भेटीस गेला व भेट घेतली. मिस्तर मानारानें राजे चेतसिंग यांस फर्मावलें कीं आम्हास खर्चाची जरूरी आहे, वीस लाख रुपये नख्त सध्या देणं. राजे माारानें उतर केले कीं आम्ही तालुकियाचा इजारा केला आहे त्याप्रमाणें रुपये वसूल होत नांहींत. व हकीक* म्हणजे तुम्हास कराराप्रमाणें रुपये देतों याकरितां कर्जाचे पेंचात आलों. इजाऱ्यांत कांहीं तखफीफ करावी म्हणोन तुम्हांसी बोलावयाचा निश्चय केला आहे. वीस लाख तो फार, परंतु लाख दोन लाखाची सरबराई आम्हाकडून होणार नांहीं याप्रमाणं साफ उतर केलें. ते समई मिस्तर हिस्तैनानें राजे चेतसिंग यास पाहऱ्यांत कैदेंत ठेविलं वं कासीस आला. राजे चेतसिंग याचे बूदबासीचें स्थळ गंगापार रामगड म्हणोन मकान. तेथें बिरादर व हमराही लोक होते. त्यांस सूचना लिहून पाठविलीं कीं, या समई जलदी करून तीनच्यार हजार जमीयतीसुधां याल तरीं माझी मुक्तता या कैद फिरंगापासून होईल. मिस्तरासमीप जमीयत कुल हजारबारासे लोक आहेत. त्यावरून राजे चेतसिंग याचे बिरादर व रुफकानीं तीनच्यार हजार जमीयत जमीदारी मिळऊन रातोरात कासीस आले. व ज्या पाहऱ्याचे कैदेंत राजे चेतसिंग होता त्या लोकास मारून चेतसिंगास सोडविलें. व वमय सरंजाम रामगडास जावयाकरितां निघाले. मार्गांत चिर-नारगड इंगरेजाचे ठाण्याचे मकान. तेथील इंगरेजांचे लोक सदराह

जाहले. त्यांस सिकस्त करून रामगडास गेला व कासी वगैरे तमाम गिर्दनवाहचे जमीदारास ताकीद केली कीं इंगरेजांचे निसबतीचे लोक जे सांपडतील त्यांस कतल करणें. दाहावीस हजार प्याद्यांचा जमाव जाहला.

---

**A. R. No. 112**

१ शवाल ११९५ हिजरी
२० सप्टेंबर १७८१

पौा छ ११ शवाल सन ११९५ हिजरी रोज रविवार डाकेबराबर आली ते दारोग्याचे विद्यमाने पावली.

श्रीनिवास

पोष्य हैबतराव गोपाळ सांा नमस्कार विनती उपरी. येथील वर्तमान ताा छ १ शवाल आश्विन शुध त्रितीया गुरुवार दिवारात्रपर्यंत स्वामीचे कृपेकरून क्षेम जाणून स्वानंद लेखनाज्ञा केली पाहिजे. विशेष कृपापत्र छ २० रमजानचें डांकेवर पाठविलें तें छ ३० रमजानीं पाऊन बहुत समाधान जाहलें. चिरंजीव राजश्री रघोतमराव यांचें पत्र पावलें. त्याचें उतर येथोन लिफाफा सेवेसी पाठविला आहे तो पावेल. कलकत्याहून मिस्तर हिस्तैन गोरनर इमादुदौला जलादतजंग बहादर कासीस आला. व तेथील जमीदार राजे चेतसिंग, बलवंतसिंगाचा पुत्र, यास नजरेबाा रुपयाकरितां दस्तगीर करून कैदेंत ठेविलें होतें. जमीदार माारानें तीनच्यार हजार लोक आणऊन चौकीहून निघोन गेला व मिस्तर हिस्तैन माारास दस्तगीर केलें म्हणोन बालाजीपंत बुंदेले यानी सागरीहून श्रीमंत पंतप्रधानांस व कारभाऱ्यास पत्रें पाठविलीं. त्यांत माार लिहिला आहे तो हरीपंतानीं सेवकास सांगितला. व खारिजहीं यैकिला त्यावरून तपसीलवार अलाहिदा पत्रीं माार लिहिला आहे. हुजूरहीं याच अन्वयें वर्तमान लिहिलें असे. राजश्री हरीपंताची व सेवकाची जे समई भेट होत

आहे ते समई हजरत खुदावंदन्यामत यांचे कृपेची व यहसानांची ममनूनमिनत व जनाब मुकदसेंत आपण येकनिष्ट याचा इजहार बहुत करितात. सेवेसी श्रुत होय. बहुत काय लिहिणें हे विनती.

---

पैा छ ११ शवाल.

२

पुरवणी अखबार पुणं. छ १ शवाल सन ११९५ हिजरी. याप्रकारचा बलवा व समग्र जमीदारांचा येका जाहला. हें वर्तमान मिस्तर हिस्तैन यास कळलें व बेइस्तकलाल होऊन कासींत राहावयाची हिमत न राहिली. पुन्हां कलकत्यास जावें हा निश्चय करून कासीहून कूच करून येकदोन मजली गेला. राजे चेतसिंग यानें दाहा हजारपर्यंत प्यादे मिळऊन मिस्तर माारास माहासरा केला. मिस्तरासमीप जंगी सरजाम नव्हता याकरितां मगलूब जाहला. कितेक इंगरेज व पलटणचे लोक मारले गेले व बाकीचे अजीज जाहले. ते समई राजे चेतसिंग यानें मिस्तर हिस्तैनास दस्तगीर केलें. व कलकत्याहून जो सरंजाम मिस्तरानें आणिला होता तो जप्त केला. व कासी वगैरे गिर्दनवाहचे माहालातील रयतीस आज्ञा केली कीं, येक सालाचा महसूल तुम्हास माफ केला. सिबंदी ठेऊन इंगरेजांचे निसबती लोकास मारणं व इंगरेजांकडील तालुकियांत ताख्तताराज करणं. शुजायदौला मरहूम यांचा पुत्र जंगली सादतअलीखान राजे चेतसिंगासी मुतफिक जाहला. बालाजीपंत बुदले वगैरे पंतप्रधानाचे निसबती सरदार व राजेरजवाडे यांस चेतसिगानें आपले कुमकेस बोलाविलें आहे. व राजा माार जातीनें वीस हजारपर्यंत जमीयत जमीदारी प्यादे वगैरे मिळऊन मुस्तैद जंग आहे. याप्रमाणें बाळाजीपंत बुंदले यानीं कारभारी व पंतप्रधानास वर्तमान लिहून पाठविलें व माहदाजी सिंद्याची पत्रें छ मारीं आलीं. त्यांत हाच माार व नागपुरीहून याचप्रकारें लिहिलें आले. व सावकारी पत्रें आलीं म्हणोन

हरीपंत फडके यांचे जुबानीं यैकिलें व खारिज सर्वतोमुखीं याच वर्तमानाची चर्चा यैकिली.

गाडर बडोद्यास फतेसिंग गाइकवाडाकडें गेला होता. परस्परें सलाहमसलत व करार जाहले. दसऱ्यानंतर फतेसिंग गाइक-वाड यानीं मातबर जमीयेतनसीं व गाडराची तीनच्यार पलटणें येणेप्रमाणें सिपरीकोलारसचे इंगरेजांस कुम(क) जावें हा येक विचार. दुसरा प्रकार खानदेशांत यावें. याप्रमाणें करार करून गाडर मा।र भडोचेस गेला म्हणोन खारिज यैकिलें. कारपरदाजांचे जुबानीं तहकीक नांहीं.

सुरतेंत वलंदेज किंवा कोण्हीं कुलाहपोषांची कोठी होती. ते करनल गाडरानें जप्त केली म्हणोन खारिज यैकिलें.

माहदाजी सिंदे काळाबाग कालीसिंद नदीसमीप आहेत व इंगरेजांची पलटणें सिपरीकोलारसाचे मुतसल गोहदकर जाट इंगरेजा-समीप आहे. येथील कारपरदाजांचे सांगण्यांत गोहदकरासी व माहदाजी सिंद्यांसी आहदपैमान जाहला. गोहदकर सिंद्यास येऊन भेटतो. दुसरा प्रकार गोहदकराचे मारफातीनें इंगरेजानीं सिंद्यास पैगाम स्नेहाचा व दारमदाराचा केला आहे. तोफा वगैरे सिंद्याकडील नेल्या आहेत त्या माघारा देत आहेत: परंतु सिंदे मा।र सलाह करीत नांहींत व आखर शवाल हरकत करून इंगरेजांचे मुकाबिल्यास जाणार.

३

पैा छ ११ शवाल.

अखबार पुणें छ १ शवाल सन ११९५ हिजरी.

हैदरअलीखान कंची आरकाटचे सरहदेंत व जनराल कूट चिनाप-टणापासून पांचसाहा कोस खान मा।राचे मुकाबिल उतरला आहे. सांप्रत हैदरअलीखानापेक्षां जनराल कूट गालिब आहे. परंतु खान मा।रासी

दारमदार करावा म्हणोन आपले तरफेनें हैदरअलीखानासमीप कोण्हीं ग्रहस्तास पाठविले आहे. परंतु खान मार दारमदार व सलाहचा पैगाम कबूल करीत नांही म्हणोन खारिज यैकिलें. येथील कारपरदाज व वकीलांचे जुबानीं तहकीक करून माघाहून लिहीन.

राजश्री हरी बलाळ यांची प्रकृती प्रस्तुत स्वस्थ आहे. छ १ माहे मारीं राजश्री बालाजीपंताचे घरी दरबारास व प्राथःकालीं श्रीमंत पंतप्रधानांचे पंक्तीस भोजनास गेले होते. कळावें हे विनंती.

---

**A. R. No. 113** 

३ शवाल ११९५ हिजरी
२२ सप्टेंबर १७८१

पैा छ ११ शवाल सन ११९५ हिजरी रोज रविवार सरकारचे डांकेबराबर आले ते दारोग्याचे विद्यमाने पावले.

श्रीशंकर

विनंती विज्ञापना यैसी जे यथील कुशल ताा छ ३ माहे शवाल मुाा पुणे स्वामीचे कृपावलोकणेकरून येथास्थित जाणौन स्वानंद लेखन आज्ञा करीत असिले पाा. विशेष यथील वर्तमान छ २८ माहे रमजान रोज सोमवारी विनंतीपत्र प्राथःकाली सरकारचे डाकेसमागमे सेवेसी रवाना केले ते पावोन सविस्तर वर्तमान ध्यानास आले असेल. तदनतर येथील वर्तमान राजश्री मुरारजी जाधव गाडापूरकर मोकासी तीनच्यारसे स्वाराचे सरदार होते त्याजवर पेच येऊन ते बागी होऊन होते. त्याजकडील लोक वगैर उठून गेले होते. जाधव माार विदेही होऊन पढरपुरास होते, त्याजवरून येथील च्यार मऱ्हाटे वगैर दरम्यान प(ड)ले की, जाधव माार मातबराचा पुत्र आहे. दुसरे, पुरातन सरदार पदरचे. त्यास आणून समजूती

करावी. त्याजवरून जाधव मार यास पढरपुराहून समजूती करून आनिले आहे. पुढे त्याचा काये बदोबस्त करून देतील हे ध्यानास आलिया लेखन केले जाईल, शृत होये. मारवाडाहून काही इग्रजाकडे मदतेस फौज येणार, यैसे वर्तमान आहे. शृत होये. दरबार वगैर जाला होता. शृत होये. छ २९ माहे रमजान रोज मगलवार हैदर नाईक अरकाटेस होता. चिनापटनाकडे जाणार यैसी वदता होती. प्रस्तुत वर्तमान आहे की नाईक मार चिनापटनाकडे गेले. इग्रजासी व हैदर नायेकासी लडाई मातबर जाली. नाईक मार याजकडील लोक फार पडले. काही तोफा गेल्या. सिकस्त काहीयेक होऊन माघारा आले. यैसे वर्तमान आहे. मागती तिकडील वर्तमान आलिया लेखन केले जाईल. शृत होये. श्रीमत राजश्री दादा-साहेब व सटोजी भोसले वगैर सुरतेजवल आहेत. त्यास दादासाहेब व फतेसिग गायेकवाड वगैर येकत्र होऊन कोडाईबारीकडे येणार यैसी वदंता आहे. मागती तिकडील वर्तमान आलिया लेखन केले जाईल. शृत होये. दसऱ्यास डेरे वगैर कारभारी बाहेर करनार फौज वगैर जमा करनार. कारभाऱ्यानी यौज्यना केली आहे की, आपन पुन्याबाहेर डेरे वगैर देऊन राहावे. कोकनप्राती इग्रजाचे शहास होलकरास फौजेसुधा पाठवावे यैसी घटवटना करितात. निश्चयेरूप जाल्यास लेखन केले जाईल. शृत होये. नाना हरीपताचे येथे येकादो दिवसाआड येतात. कारन की हरीपतास समाधान वाटत नाही. या अर्थी नाना हरीपताचे येथे येऊन खल(व)त वगैर करितात. खलवतीचा भाव यैकिल्यात आला की फौज वगैरचा बदो-बस्त करून पुढे स्वारीचा उद्योग करून इग्रजाचे पारपत्य करावे. दुसरे कितीक आपले दौलतीचे बदोबस्ताविशई खलव(त) होत असतो, शृत होये. छ ३० माहे रमजान रोज बुधवार. बादली व कार-चोबी वगैर वस्त्रे व काही ज्यवाहेर येज्यमानसाहेबास द्यावयास येथून कृष्णरावजीकडे साडनीस्वारासमागमे रवाना केली, शृत होये. कलकत्याचा सुभा इग्रज वारानसीजवल दाहापाच कोसी आला होता. कारन की, बगाल्याचा व प्रयाग वगैर प्राताचा बदोबस्त करावा.

दुसरे, ममई व चिनापटनाकडे ज्यमीयेत पाठवावी, याकरिता कल-कत्याहून दाहाबारा पलटनानसी सुभा वारानसीजवल आला. तिकडील राजेरजवाडे वगैर यास खडनीविशई त्या इग्रजानी पत्रे पाठविली. वारानसीचा राजा बलवतसिग याचे पुत्रास इग्रजानी पत्र पाठविले की, वीस लक्ष रुपये खडनीचे घेऊन भेटीस येणे. त्याज-वरून वारानसीचे राज्यास संकट प्राप्त जाले. वारानसीचा राजा याने आपले भाऊबदास मेलऊन पाचच्यार हजाराचा ज्यमाव केला. आनिक आसपासचे राजे यास सागून दाहावीस हजार मणुशाचा ज्यमाव करविला होता. परतु ते काही समयास येऊन पोचले नाहीत. वारानजीकर राजाच पाचच्यार हजार मणुशानसी कलकत्याचा सुभा इग्र(ज)आला होता, त्याचे भेटीस गेले. भेटी होऊन इग्रजानी त्यासी सख्तीच्या गोष्टी सागितल्या. याप्रमाणे भाशणे होऊन राज्यानी उतरायास जातो म्हणौन इग्रजाचा निरोप घेतला. निरोप घेऊन इग्रजाचे गोष्टाबाहेर निघाला. उपरातिक वारानसीचे राज्यानी विचार केला की उदईक इग्रज दगा करील, याचे कैदेत पडावे हे ठीक नाही, तर आपनच इग्रजास दगा करावा. यैसा मनसुभा करून मागती तो राजा माघारे फिरून इग्रजाचे डेऱ्यास आला तो तीनच्यार हजार लोकानी तरवारा काहाडून इग्रजाचे डेऱ्यावर दंगा केला, कलकतेकर सुभा इग्रज त्यास मारून टाकले. लोकही इग्रजाचे फार मारले, लूट करून लश्कर इग्रजाचे लुटले. याप्रमाणे दगा करून वारानसीचे राज्याने कलकतेकर सुभा इग्रज त्यास मारले, मारून तो राजा वारा-नसीस गेला. दुसरे वर्तमान आहे, लडाई करून तो इग्रज मारला. परतु द(गा)करून मारला हे प्रमान यैसे सावकारी वर्तमान येथे आले. वर्तमान नानास कलले की वारानसीचे राज्यानी कलकतेकर सुभा मारला, बहुत संतोश जाले. बातनीचे पत्र आले होते ते सरे दरबारात वाचले. कलकत्याचा सुभा वारानसीचे राज्यानी मारला, यैसे वर्त-मान आले. शृत होये. दरबार वगैर जाला होता. शृत हाये. छ १ माहे माार रोज गुरुवार कलकतेकर सुभां वारानसीचे राज्यानी मारला म्हणौन करनेल गाडर ममईहून सुरतेस गेला. तेथून

फतेसिग गायेकवाड यासी सूत्र लाऊन पलिकडे हिदुस्तान प्राती जावे, कारन की प्रस्तुत कलकतेकर सुभा मारला, तिकडील बदोबस्त करावा या अर्थी जावे, यैसा विच्यार करून गाडर सुरतेकडे गेला. यैसे वर्तमान आहे, शृत होये. कल्यानीस पलटने वगैर आहेत, सरजाम करितात यैसे वर्तमान आहे. शृत होये. राजश्री कृष्टणरावजी माहे माारी सुद प्रतिपदेस हजुरात पोहोचोन मुलाजमत करनार यैसे वर्तमान आहे. शृत होये. दरबार वगैर जाला होता. माली व मुलकी वगैर कामकाज जाले शृत होये. छ २ माहे माार रोज शुकरवार नानाचे दरवाज्यापुढे से दोनसे गारदी राहातात त्यामधे जमादार दोनतीन जमादार होते. त्यामधे कलागत होऊन पाचच्यार मानसे जखमी जाली शृत होये. राा नाना हरीपताचे घरी आले होते, च्यार घटका खिलवत जाला. उपरातिक नाना राा विसाजी कृष्ण बिनीवाले याचे घरी गेले होते. विसाजीपतासी व नानासी च्यार घटका खिलवत जाला. उपरातिक नाना आपले घरास गेले. विसाजीपताचे खिलवतीचा भाव मागाहून ध्यानास आणून लेखन केले जाईल शृत होये. पुढे जे प्रसगाचे वर्तमान ध्यानास येईल ते सेवेसी लेखन केले जाईल. शृत होये. छ २० माहे रमजानचे आज्ञापत्र पाठविले ते छ ३० माहे रमजानी डाकेसमागमे पावले. पावोन बहुत संतोश जाला. सदैव याचप्रमाने आज्ञापत्रे सादर होत असावी, बहुत काय लिहिणे, कृपा लोभ कीजे, हे विज्ञाप्ती.

---

**A. R. No. 114** ४ शवाल ११९५ हिजरी

२३ सप्टेंबर १७८१

पैाा छ १४ शवाल सन ११९५ हिजरी, रोज बुधवार, सरकारच्या डांकेबराबर आले, विद्यमान दारोगे हरकारे.

श्रीनिवास

पोष्य हैबतराव गोपाळ सांा नमस्कार. विनती उपरी. येथील वर्तमान ताा छ ४ शवाल आश्विन शुध षष्ठी रविवारपर्यंत मोा पुणं

स्वामीचे कृपेकरून क्षेम जाणून स्वकीय क्षेम लेखनाज्ञा केली पाहिजे विशेष. पूर्वीं छ २ माहे शवालीं हुजूर अर्जी व अखबार व स्वामीचे सेवेसी पत्र डांकेवर रवाना केलें तें हुजूर व आपल्या सेवेसी पाऊन वर्तमान कळलें असेल. सांप्रत हैदरआलीखान व जनराल कूट यांची लढाई छ १२ रमजानीं कंचीसमीप जाहली. हें वर्तमान खान मारानें आपले वकीलास लिहिलें. व सेवकानें वकीलांचे जुबांनीं यैकिलें. त्याप्रमाणें हुजूर व स्वामीचे सेवेसी अलाहिदा पुरवणी पत्रांत लिहिलं आहे. राजश्री कृष्टणराव बलाळ यांची मुलाजमत हुजूर होऊन परस्परें मध्यस्तासीं व रावजीसीं बोलण्याचा ज्वाबसाल दरपेश असेल. चौथाईचा तह हुजूरचे मर्जीप्रमाणें मार्गानें फैसल करावा हें लक्ष येथील कारभाऱ्याचे आहे. व सेवटीं रावजी मर्जीमुबारकेप्रमाणें कबूल करतील. परंतु इंगरेजाचे तंबीस हजरत बंदगानआलीनीं अज्म करावा हें बोलणं यांचे मुख्य आहे. याचा तोड हुजूरीहून होण्याचा प्रकार खिसारा कबूल करावा. त्यास सांप्रत इंगरेजांची सिकस्त कासी व कंचीसमीप जाहली. व हैदरआलीखान इंगरेजावर गालिब आहे. याकरिता खिसाऱ्याची बाबत किंवा आणखीं कांही तवाजा हुजूरचा कबूल करावयाचें मानस येथील कारपरदाजांचे नांहीं. सारांश, देशकाळ काबूनुरूप हुजूरची मर्जी पाहून येथील कारभारी वर्तणूक करीत आहेत व करतील, बहुत काय लिहिणं हे विनती.

---

पौ छ १४ शवाल सन ११९५ हिजरी.

श्रीनिवास

अखबार पुणें अज इा छ २ शवाल लगायत छ ४ माहे मार सन ११९५ हिजरी. आश्विन शुध षष्ठी रविवार.

मिस्तर हिस्तैन गोरनर कलकत्याहून कासीस आला व बळवंतसिंगाचा पुत्र चेतसिंग यास वीस लाख रुपये नजर मागितली व पाहऱ्यांत ठेविलें. यास्तव चेतसिगानें रामगडीहून आपले बिरादर व रफीक यांस

इशारा करून तीन हजारपर्यंत जमीयत आणविली. व मिस्तर हिस्तैनाचे चौकीचे लोकांस मारून चेतसिगास घेऊन गेले. त्यानंतर मिस्तर हिस्तैन कासीहून कूच करून कलकत्याचे रुखं येक मजल गेला. इंगरेजासीं निफाक जाहला. याकरितां चेतसिगानें वीस हजारपर्यंत जमीयत गिर्दनवाही जमा करून मिस्तर मारास दस्तगीर केलें व इंगरेज मिस्तरचे हमराही समग्र मारले व ज्या स्थली टोपीवाला सांपडेल तेथें मारणं म्हणोन समग्र कासी प्रांतीं जमीदार व रयतीस ताकीद केली. व येक साला जिरायतीचा महसूल माफ केला. सुज्यायदौला मरहूम याचा पुत्र सादतअलीखान चेतसिगास शरीक जाहला म्हणोन यावितरिक्त आवांतर वर्तमानासहित छ २ माहे मारीं हुजूर अर्जी व अखबार व स्वामीचे सेवेसी पत्र डांकेवर रवाना केलें. तें पाऊन वर्तमान कळलें असेल. त्या उपरी यैकिलें व प्रत्यक्ष जाहलें वर्तमान हुजूर व स्वामीचे सेवेसी लिहिलं आहे. छ २ माहे मारीं बालाजी-पंतानी हैदरअलीखानाकडील वकील नूरमहमदखान व नरसिंगराव यांस बोलाऊन मिस्तर हिस्तैन कलकतेवाल्यास चेतसिंगानें दस्तगीर केलें हें वर्तमान तपसीलवार सांगितलें. व खान मारास पत्रें वकी-लानीं व कृष्टणराव जोसी वकील निा पंतप्रधान हैदरअलीखानासमीप आहे, त्यास कारपरदाजानीं पत्र लिहून पाठविलें.

छ २ माहे मारीं हैदरअलीखानाचीं पत्रें वकीलास आलीं तो मार व बजिनस पत्रें वकीलानीं राजश्री बालाजीपंत नाना व हरी-पंतास दाखविलीं. त्यां पत्राचा मार सेवकानें नरसिंगराव वकील यांचे मुखोदगत यैकिल्याप्रमाणं लिहिला आहे. जनराल कूट चिना-पटणापुढें पांच कोसावर होता. व हैदरअलीखान आरकाट व कंचीचे माबैन इंगरेजासीं व खान मारासीं पंधरासतरा कोसाचा फासला होता. जनराल कूटास प्याज वगैरे कुमकी पलटणें च्यारपांच आलीं. व जमीयत मातबर व सरंजाम जिनसीचा पोख्त करून जनराल मारानें चिनापटणासमीप उतरला होता. तेथोन कूच करून छ ११ रमजानीं कंचीचेसमीप आला. हैदरअलीखानासी

व जनरालासीं पांचसाहा कोसी फासला राहिला. हैदरअलीखानानें फौजेची मिसलबंदी व जगी सरंजाम तोफा व जजायल व बान वगैरे सिध करून, मुस्तयद जंग होऊन पंचावन तोफा लागू करून, लढाईस इंगरेजासीं मुकाबिल जाहला. प्रथम प्रहरापासून घटका दिवस बाकी राहजोपर्यंत दुतर्फा लढाई तोफा व जजायल व बाण व बंदुखाची जाहली. इंगरेजांकडील पनास तोफा सुटत होत्या. आकरा हजार गोळा खान मारा

---

२

पैा छ १४ शवाल सन ११९५.

पुरवणी अखबार पुणें. छ ४ शवाल सन ११९५ हिजरी. कडील, याचप्रमाणें इंगरेजांकडील गोळे बेसुमार सुटले. हैदरअलीखान व जनराल कूट उभयतां लढाईत कायम व मजबूत मकान धरून उभे राहिले. दुतरफा सरदार व लोक जखमी व ठार जाहले. छ १२ रमजानीं घटका दिवस राहिला ते समई लढाई मवकूफ होऊन जनराल माघारा चिनापटण व कंचीचे माबैन पहिलील मुकामास गेला. हैदरअलीखानानं कंचीसमीप येऊन मुकाम केला.

हैदरअलीखानाचे निसबती
लोक जखमी व ठार
प्यादे व स्वार वगैरे
७०० जखमी
८०० ठार
१५००
१००० घोडीं लाहान मोठी
२ सरदार नामी जमादार असामी

जनराल कूटाचे हमराही
१ मिस्तर मंडोर माजी जनराल
१ मिस्तर बुरन कुमकीपैकी
१ मिस्तर हिस्तैन सानी
२००० हजार बारासे लोक, जखमी व हजार बाराचे जवान ठार जाहले

छ १३ रमजानीं जनरालानें कंचीचे मुकामीहून कूच करून चिनापटणाचे मुतसेल पहिलील मुकामास गेला. ते समई हैदरअलीखानानें ताकुबास फौज पाठविली होती व आपण कंचीसमीप येऊन

मुकाम केला. जनरल कूटाचे हमराह वीस पलटणेंपर्यंत जमीयत व हैदरअलीखानासमीप पंचेवीस हजार स्वार व तीस हजार बार व प्यादे तीसचालीस हजार येणेप्रमाणं जमीयत आहे. याप्रमाणं वकीलाचे जुबानीं व खारिज यैकिल्याप्रमाणें लिहिलं आहे.

कासीकडील वर्तमान चेतसिंगानें मिस्तर हिस्तैन गोरनरास दस्तगीर केलें म्हणोन पूर्वील पत्रीं लिहिलें आहे. सांप्रत दुबारा सावकाऱ्यांत वर्तमान आलें आहे कीं मिस्तर हिस्तैन गोरनर चेतसिंगाचे लढाईत मारला गेला, व मिस्तर मााराचा खजाना नख्त रुपये सतर लाखपर्यंत कासीचे सावकारांचे दुकानी आमानत होतें. व गोरनर मााराससमागमें जाहाजें जवाहर व पारचे व तोहफजात वगैरेचीं आली होतीं ते चेतसिगानें जप्त केलीं. सागरांत बालाजी गोविंद बुंदेले पंतप्रधानाचे तरफेनं आहेत. ते च्यार हजार स्वारानसीं चेतसिंगाचे कुमकेस जाणार.

कासीकडें व आरकाट प्रांती इंगरेजांचे सिकस्तेचें वर्तमान यैकिल्यानंतर पंतप्रधानांचे कारभाऱ्यानीं खिलवत करून बालाजी गोविंद बुंदेले वगैरे झांसी व इतर स्थलींचे कमाविसदार यांस व समग्र हिंदुस्तानचे राजेरजवाडे यांस पत्रें लिहून पाठविलीं कीं बमय फौज चेतसिंगाचे कुमकेस जाणं. व यासमईं सर्वत्रांचे राज्याचे कायमीस चेतसिंगाची कुमक करावी हे सलाह चांगली आहे.

दुर्गोजी भापेकर व गणेशपंत बहिरे यांस कारप(र)दाजानी पत्रें पाठविलीं कीं फौजेची निगाहदास्त करून सुरत प्रांतात समग्र देश ताख्ततारा‍ज करणं.

करनल गाडर बडोद्याहून भडोंचेस गेला म्हणोन पूर्वीं यैकिल्याप्रमाणं लिहिलं होतें. सांप्रत खारिज यैकिलें कीं गाडर सुरतेस आला व मुंबई व कल्याणीस पलटणं वगैरे सरंजाम जंगी आहे. तो सुरतेस आणविला. कल्याणी वगैरे मकानें जें इंगरेजांचे तसरूफांत आहेत तेथील ठाण्याची मजबूती करून पलटणें सुरतेस गाडरासमीप जाणार.

मुधोजी भोंसल्यानीं यासमई पंचेवीसतीस हजार फौजेनसीं बगाल्यात जाऊन तो मुलुक ताख्तताराज करावा यांत पंतप्रधानासी स्नेह व यैक्यता विशेष व सालगुजस्ता इंगरेजापासून रुपये घेऊन खंडेराव भोसले

(अपूर्ण)

---

**A. R. No. 115**

४ शवाल ११९५ हिजरी
२३ सप्टेंबर १७८१

पैा छ १४ शवाल सन ११९५ हिजरी, रोज बुधवार दोन प्रहर दिवस आल्यावर सरकारच्या डांकेबराबर आले.

श्रीशंकर

विनंती विज्ञापना यैसी जे यथील कुशल ताा छ ४ माहे शवाल मुाा पुणे स्वामीचे कृपावलोकणेकरून येथास्थित जाणौन स्वानद लेखन आज्ञा करीत असिले पाा विशेष. यथील वर्तमान छ ३ माहे माार रोज शनवारी प्राथःकाली विनंतीपत्र सरकारचे डाकेसमागमे सेवेसी रवाना केले ते पावोन सविस्तर वर्तमान ध्यानास येईल. तदनतर येथील वर्तमान हैदर नायेकाकडून पत्रे आली. वर्तमान लिहिन्याचे यैकिल्यात आले की हैदर नायेकासी व चिनापटनकर इग्रजासी लडाई मातबर जाली, उभयेपक्षी मणुशे फार जाया जाली. इग्रज सिकस्त होऊन माघारा तीनच्यार कोस चिनापटनाकडे गेले. नाईक माार अरकाटेहून कूच करून चिनापटनाकडे जाणार. इग्रजावर नाईक माार गालिब आहे. यैसे वर्तमान पत्राचे लिहिन्याचे यैकिल्यात आले शृत होये. श्रीमत पंतप्रधान राजश्री नानाचे घरी भोज्यनास आले होते. भोज्यने होऊन श्रीमतास नानानी वस्त्रे वगैर ज्यवाहेर दिल्ही भोज्यन वगैर समारंभ होऊन श्रीमत आपले वाड्यात गेले. शृत होये.

छ ४ माहे माार रोज रविवार कलकतेकर सुभा इग्र(ज) वारानसी-कडे आला होता. वारानसीचे राज्यास इग्रजानी खंडनीविशई तगादा केला. त्याजवरून वारानसीचे राज्यानी दगा करून कलकते-कर सुभा यास जिवे मारले. हे वर्तमान काल तिसरे तारखेस डाके-समागमे विनंतीपत्र रवाना केले त्यात सविस्तर लेखन केले आहे. त्याजवरून शृत जाले असेल. त्यास कलकतेकर सुभा इग्रज दोनतीन पलटनानसी वारानसीजवल उतरला होता. वारानसीचे राज्यानी पूर्वतप्रमाणे खडनीचा यैवज दिल्हा होता, यैसे असता आनिक त्या राज्यासी वीस लक्ष रुपये मागत होता म्हणौन त्या राज्यास इग्रजानी बसविले होते. पाचच्यारसे मणुश राज्यावर चौकीस इग्रजाचे होते हे वर्तमान राज्याचे भाऊबंद गंगापार होते त्यास कलले. त्यानी ज्यमाव करून आले. वारानसीचे राज्यावर चौकीचे मानसे होती, ते मारून राज्यास सोडऊन घेतले. इग्रजाचे येक मोठे ठाने होते ते राज्याचे लोकानी घेतले. वारानसीचे राज्याचा ज्यमाव विशेष जाला म्हणौन इग्रज कूच करून जाऊ लागला. तो राज्यानी त्या इग्रजास वेढा घातला. लडाई करून कलकतेकर सुभा इग्र(ज) वारानसीचे राज्यानी मारला यैसे वर्तमान येथे सावकारी वगैर आले. कलकतेकर सुभा मारला म्हणौन येथील कारभारी बहुत संतोश जाले शृत होये. सिद्यासी व इग्रजासी लडाई आहे. वर्तमान आहे की ते इग्रज सिद्यानी जेर केले आहेत. त्या इग्रजाचे लश्करात रुपयाचे दोन सेर धान्य जाले आहे. बहुत ते इग्रज जेर झाले आहेत. सिदे आसपास फौजेचा वेढा घालून आहेत यैसे वर्तमान आहे. शृत होये. अदोनीहून नवाब बसालतजग बहादूर याची पत्रे कारभाऱ्यास साडनीस्वार घेऊन आले आहेत. पत्राचा भावार्थ कलल्यावर लेखन केले जाईल. शृत होये. कलकतेकर सुभा मारला म्हणौन करनेल गाडर ममईहून सुरतेस गेला. पुढे बडोद्यास जाऊन फतेसिग गायेक-वाडाच्या विद्यमाणे हिदुस्तान प्राती जाऊन कलकतेकर बुडविला आहे त्याचा बदोबस्त करनार यैसे वर्तमान आहे. प्रस्तुत करनल सुरतेस आहे व पलटने वगैर कल्यानीस आहेत. शृत होये. करनेल

सुरतेकडे गेला. प्रस्तुत निर्वेद जाले म्हणौन कारभारी बहुत संतोश आहेत. म्हणतात की चिनापटनकर इग्रजास हैदरने सिकस्त केले. मुख्य सुभा कलकतेकर मारला व करनेल गाडर ममईहून सुरतेकडे गेला. तिकडे सिद्यानेही इग्रज सिकस्त केले आहेत, इग्रजाचे चहूकडून पारपत्य जाले आहे. चिता नाही म्हणौन बहुत संतोश होऊ(न) बोलत असतात. शृत होये. रा। हरीपत येकदोन दिवस जाले दरबारात जात असतात, शृत होये. दसऱ्याचे मोहर्ते डेरे बाहेर करून हरीपत निघनार, यैसे वर्तमान आहे. निश्चये जाल्यास लेखन केले जाईल, शृत होये. नानाचे घरी श्रीमत भोज्यनास गेले होते. श्रीमतास नानानी वस्त्रे च्यार, येक सिरपेच व येक माल पाचाची दिल्ही, शृत होये. येकादो दिवसा श्रीमत हरीपताचे येथे मेजमानीस जाणार, शृत होये. पुढे जे प्रसगाचे वर्तमान ध्यानास येईल ते सेवेसी लेखन केले जाईल. सदैव आज्ञापत्री परामृश होत असावा. बहुत काय लिहिणे, कृपा लोभ कीजे, हे विज्ञाप्ती.

---

**A. R. No. 116** ८ शवाल ११९५ हिजरी
२७ सप्टेंबर १७८१

पैा छ १५ माहे शवाल सन ११९५ हिजरी. गुरवार प्रहर रात्र मैं डांक सरकार.

श्रीनिवास

पोष्य हैबतराव गोपाळ सा। नमस्कार विनती उपरी. येथील वर्तमान ता। छ ८ शवाल आश्विन शुध दशमी गुरुवासरपर्यंत मो। पुणें स्वामीचे कृपेकरून क्षेम जाणून स्वानंद लेखनाज्ञा केली पाहिजे विशेष. छ २६ रमजानचें कृपापत्र चिरंजीवांच लिफाफ्यासहित डांकेवर रवाना केलें तें छ ५ शवालीं पाऊन सविस्तारें वर्तमान कळलें व संतोष जाहला. पूर्वी छ ५ माहे मा।रीं विनतीपत्रें हुजूर व स्वामीचे

सेवेसी डांकेवर रवाना केलीं तें दारोग्याचे विद्यमान हुजूर व स्वामीस पाऊन वर्तमान श्रुत जाहलें असेल. सांप्रतचे वर्तमान पृथक पत्रीं लिहिलें आहे त्यावरून श्रुत होईल. कलकतेवाला इंगरेज मिस्तर हिस्तैनास चेतसिंगानें कैद केलें. व हैदरअलीखानानें इंगरेजांचा तसरूफी मुल्क घेऊन दोन वरसें लढाई करितो. व हरयेक लढाईंत इंगरेजांवर गालिब आहे. यावरून पंतप्रधानांचे कारभाऱ्यांस इंग्रेजांचे तंबीविषईं द्विगुणित इछा जाहली आहे. हजरत बंदगानआलीनीं यासमईं इग्रेजाचे तंबीचा अज्म करावा हेच सल्लाहदौलत आहे. याप्रमाणें कारपरदाजांचे बोलण्याचा खुलासा सेवकाचे ध्यानास आला. व हुजूर अर्जमारूज स्पष्ट करावयाविषईं कृष्टणराव बलाळ यांस लिहिणार म्हणोन यैकिलें. सेवेसी श्रुत होय, बहुत काय लिहिणें हे विनती.

---

पैाा छ १५ शवाल सन ११९५ हिजरी. गुरवार प्रहर रात्र मै डांक सरकार.

श्रीनिवास

अखबार पुणें अज इाा छ ५ शवाल लगायत छ ८ माहे माार सन ११९५ हिजरी गुरुवासर.

छ १२ रमजानीं हैदरअलीखानासीं व जनराल कूट यासीं कंचीसमीप लढाई जाहली. दुतरफा माणसें व घोडीं ठार व जखमी जाहलीं व मातबर सरदार पडले. इंगरेज माार पसपा होऊन चिनापटणास गेला व हैदरअलीखान कंचीसमीप येऊन उतरला. पंतप्रधानांचे कारभाऱ्यानीं दुर्गोजी भापकर व गणेशपंतास ताकीद लिहिली कीं, फौजेची निगाहदास्त करून सुरत व गुजरात प्रांतात जाणें. यावितरिक्त अवांतर वर्तमानासहित पत्रें हुजूर व स्वामीचे सेवेसी पाठविलीं. तें पाऊन वर्तमान श्रुत जाहलें असेल, त्या उपरी यैकिलें व प्रत्यक्ष वर्तमान दफेवार लिहिलें असे.

करनल गाडर बडोद्याहून सुरतेस आला म्हणोन पूर्वी खारिज यैकिल्याप्रमाणें लिहिलें होतें. सांप्रत येथील कारभाऱ्याचें जुबानीं तहकीक यैकिलें जे करनल गाडर डबईस आहे व फतेसिंग गाइकवाडानें दाहा हजारपर्यंत फौज ठेऊन माहदाजी सिंद्याचे मुकाबिल इंगरेजांचीं पलटणें आहेंत त्यांचे मुकाबिल्यास जांवें किंवा खानदेश तसखीर करावा, या दोन्हीपैकीं येक मोहीम कबूल करावी म्हणोन बहुत सख्त रदबदली करीत आहे. परंतु गाइकवाड मार कबूल करीत नांहीं. व सांप्रत मिस्तर हिस्तैन यास चेतसिंगानें दस्तगीर केलें हें वर्तमान यैकिल्यानंतर करनल गाडर वगैरे समग्र इंग्रेजांचे सरदार बेदिल व घाबरे जाहले आहेत म्हणोन वर्तमान यैकिलें.

माहदाजी सिंदे कालीसिंद कालाबागासमीप आहेत. व इंग्रेजांची पलटणें सिपरीकोलारसाचे मैदानांत व सिंद्याची फौज आठदाहा हजार इंग्रेजांचे गिर्दनवाह म्हणोन पूर्वील पत्रीं वर्तमान लिहिलें होतें. सांप्रत येथील कारभाऱ्यांचे व सिंद्याकडील वकीलाचे मुखं यैकिलें की सिदे मारानीं पुन्हा पांचसात हजार फौज इंग्रेजांची कही व रसद बंद करावयाकरितां गिर्दनवाह तंई केली व सांप्रत इंग्रेजाचे लश्करांत गिरानीं गवताची फार जाहली आहे. गोहदवाला जाट मखफी सिद्यांचे यैक्यतेंत व सिंदे मारांचा वकील जाटासमीप आहे. इंग्रेजांची पलटणें नाबूद करावीं हे तजवीज माहदाजी सिंद्याची आहे म्हणोन यैकिलें.

छ ५ माहे मारीं पंतप्रधानांस हरीपंतानी ज्याफत केली. बालाजीपंत व कृष्टणराव बळवंत व विसाजी बिनीवाले समागमे होतें. श्रीमंतास बऱ्हानपूरचे रंगांचा पोषाक व किमखाबी तुमान व बालाजीपंत व विसाजीपंत व कृष्टणराव बळवंत व इतर दाहा असामीस हर येकास पैठणी सेला व मुडासें मरातिबाप्रमाणें कमबेश किमतीचीं दिधलीं. श्रीमंत पंतप्रधानास सरपेंच अल्मासी बमय लोलक मोत्याचा दाणा दिधला.

---

श्रीनिवास

२

पुरवणी अखबार छ ८ शवाल सन ११९५ हिजरी.

छ ७ माहे मार बुधवार दसऱ्याचे दिवसीं त्रितीय प्रहरी पंतप्रधानाची स्वारी सीमा उलंघनास गेली होती. खवासींत हरीपंत बसले होते. बालाजी जनार्दन वगैरे समग्र मुतसदी व सरदार हमराह होते. नूरमाखान व नरसिंगराव वकील हैदरअलीखान, यांस येक हाती स्वारीस दिधला होता. व पंतप्रधानांचे स्वारीसमागमे वकील मार होते. तोफाचे सिलक जाहली ते समई पांचसात हाती बुजून पळाले. त्यापैकीं येके हातीवर पुरोहित वगैरे बसले होते. तो हाती बेशक पळाला. झाडास लागून अंबारीचें छत मोडलें. घटका रात्रीं हवेलीस आले. मामूल कायद्याप्रमाणें सर्वत्रानीं नजरा केल्या. हरीपंत फडके यांचे पुत्रास दाजीबा यास मोत्याचा चौकडा व पालखी दिधली. दाजीबा मार बालाजीपंतासमीप पेश व ज्वाबसालास योग्य, याकरितां पालखी देऊन प्रतिष्ठा वाढविली. छ ७ मारी पंतप्रधान स्वारीस निघाले ते समई फरासखान्याचे दारोग्यास बालाजीपंतानीं सांगितलें कीं गारपीरासमीप पूर्वाभिमुख डेरे उभे करणें. त्याप्रमाणें झंडे व डेरे दिधले व उभे केले.

बाजी गोविंद जोसीं यांजसमागमें पांचसात हजार फौज देऊन माहदाजी सिंद्यांचे कुमकेस पाठवावें म्हणोन कारपरदाजांची तजवीज आहे.

बालाजीपंत व हरीपंत यानी डेरे दाखल होण्याचा निश्चय ठरला नांहीं. काम रूबकार होईल ते समई मोहिमेस जावयाचा निश्चय होईल.

पौा छ १५ माहे शवाल सन ११९५ हिजरी गुरवार प्रहर रात्र मै डांक सरकार.

A. R. No. 117

९ शवाल ११९५ हिजरी

२८ सप्टेंबर १७८१

श्रीशंकर

विनंती विज्ञापना यैसी जे यथील कुशल ताा छ ९ माहे शवाल मुाा पुणे, स्वामीचे कृपावलोकणेकरून येथास्थित जाणौन स्वानद लेखन आज्ञा करीत असिले पाा. विशेष येथील वर्तमान छ ४ माहे माार रोज रविवारी सध्या: काली विनंतीपत्र सरकारचे डाके-समागमे सेवेसी रवाना केले ते पावोन सविस्तर वर्तमान ध्यानास आले असेल. तदनंतर यथील वर्तमान राजश्री हरीपताचे येथे श्रीमत भोज्यनास गेले होते. राजश्री नाना व लक्षुमनराव रास्ते व अपा बलवत वगैरही श्रीमताचे पगतीस भोज्यनास होते. भोज्यने वगैर होऊन श्रीमतास वस्त्रे व सिरपेच वगैर हरीपतानी दिल्हा. नानास व रास्ते वगैर मडलीस वस्त्रे दिल्ही. याप्रमाने भोज्यन वगैर समारंभ होऊन श्रीमत आपले वाडचात गेले. नाना वगैरही आपले घरोघर गेले. शृत होये. हरीपतास समाधान वाटत नवते. आता आरोग्य आहे. दरबारास वगैर जात असतात. शृत होये. छ ५ रोज सोमवार. कलकतेकर सुभा इग्रज वारानसीचे राज्यानी मारला हे वर्तमान येकदोन विनंतीपत्री अक्षरशा लेखन केले होते त्याजवरून शृत जाले असेल. कलकतेकर सुभा मारला गेला त्याजवरून मुमईकर वगैर इग्र(ज) दहशत खाऊन आहेत यैसे वर्तमान आहे. त्याज-वरून येथील कारभारी बहुत संतोश आहेत. शृत होये. करनल गाडर सुरतेस आहे. पलटने वगैर कल्यानीस आहेत. ते पलटने काही गरबड करून पुढे बोरघाटाकडे येणार यैसी वदंता आहे. त्याजवरून त्या इग्रजाचे शहास बोरघाटाकडे राजश्री बाजीपताची रवानगी करावी यैसी यौज्यना करितात. निश्चये होऊन बाजी-पताची रवानगी जाल्यास लेखन केले जाईल. शृत होये. हिदुस्तान प्राती सिद्यासी व इग्रजासी लडाई आहे. सिद्यानी ते इग्रज जेर केले आहेत. दुसरे इग्रजाचे लश्करात महर्गता आहे. व कलकतेकर

सुभा मारला गेला म्हणौन त्या इग्रजानी सिद्यासी सलूकाचा पैगाम केला यैसे वर्तमान आहे. मागती तिकडील वर्तमान आलिया लेखन केले जाईल. शृत होये. दरबार वगैर जाला होता. माली व मुलकी वगैर कामकाज जाले. शृत होये. छ ६ रोज मगलवार हैदर नायेकाची पत्रे आली होती. वर्तमान यैकिले की, नाईक माार यानी लडाईत इग्रज सिकस्त केले. नाईक माार चिनापटनाकडे जाणार. हे वर्तमान पूर्वीचे विनंतीपत्रात लेखन केले होते. त्याज-वरून शृत जाले असेल. प्रस्तुत नाईक माार याची आनिक पत्रे आली वर्तमान यैकिले की, इग्रज सिकस्त होऊन चिनापटनाकडे गेले. नाईक माारही इग्रजाचे पाठीमागे कूच करून चिनापटनाकडे गेले. प्रस्तुत नाईक माार इग्रजावर गालिब आहेत यैसे वर्तमान आहे. मागती तिकडील वर्तमान आलिया लेखन केले जाईल. शृत होये. राजश्री हरीपंत नानाचे घरास गेले होते. नानाचा व हरीपताचा खि(ल)वत जाला. भाव यैकिल्यात आला की उदईक दसऱ्यास डेरे बाहेर करनार कारन की फौज वगैर जमा जाली पाहिजे. दुसरे, राजश्री बाजीपताची तलेगावाकडे बोरघाटाकडे रवानगी करावी या अर्थी खिलवत जाला उदईक दसऱ्यास डेरे बाहेर करनार. शृत होये. होलकराकडील पाराजीपत येथे आले होते. त्यांसमागमे होलकरास वाफगावी सागून पाठविले की तुम्ही आपली फौज वगैर जमा करून दसऱ्यास बाहेर निघावे. त्याजवरून होलकर फौज वगैर जमा करून दसऱ्यास डेरे बाहेर करून निघनार. बाहेर निघाल्याचे वर्तमान आलिया लेखन केले जाईल. शृत होये. छ ७ रोज बुधवार दसरा म्हणौन मोहर्ते करून अस्तमानी श्रीमताचे डेरे पुन्याबाहेर गारपीराजवल केले. डेरे बाहेर केले कारन की फौज वगैर जमा जाली पाहिजे. या-करिता सरकारचे डेरे बाहेर जाले. प्रस्तुत डेरे बाहेर दिल्हे. पुढे कारभारी काये निश्चये करून बाहेर निघतील. निघाल्यास लेखन केले जाईल. शृत होये. दसऱ्याचे सिलगनास श्रीमत व नाना वगैर मुतसदी वगैर बाहेर निघाले होते. सिलगन समारंभे करून श्रीमत वगैर मुतसदीसहित वाड्यात आले. श्रीमतास नजर नानानी वगैर

मुतसदी मडलीने केली. तमाम लोकानी दसऱ्याच्या नजरा केल्या. प्रहररात्रपरियेत लोकाच्या नजरा वगैर जाल्या. उपरातिक श्रीमत संधेस घरात गेले. नाना वगैरही आपले घरास गेले. शृत होये. छ ८ रोज गुरुवार राजश्री गनेशपंत बेहरे खानदेशात आहेत. त्यास आज्ञा पाठविली की तुम्ही कोडाईबारीकडे जाणे. त्यानी लिहून पाठविले की फौज वगैर पाठऊन द्यावी. आज्ञाप्रमाणे कोडाईबारीकडे जाऊ. त्याजवरून गनेशपताकडे फौजेची नेमणूक करून पाठविनार. फौजेची नेमणूक करून पाठविल्यास लेखन केले जाईल शृत होये. राजश्री कृष्णरावजीचे चिरजीव नवरात्राचे उछवास बारामतीस गेले आहेत. दसरा जालिया रावजीचे चिरजीव येथे येणार शृत होये. काल दसऱ्याचे मोहर्ते डेरे बाहेर गारपीराजवल जाले. पुढे कारभारी वगैर डेरे दाखल जाल्यास लेखन केले जाईल डेरे मात्र बाहेर मोहर्तेकरू दिल्हे, शृत होये. तमाम सरदारास व सिलेदारास पत्रे पाठविली की सरकारचे डेरे बा

पुरवनी २.

हेर जाले. सत्वर जमा व्हावे. याअन(व)ये तमाम लोकास पत्रे पाठवितात. शृत होये. दसऱ्यास डेरे बाहेर करून हरीपतानी डेरे दाखल व्हावे यैसा निश्चये जाला होता. ते रहित होऊन डेरेच मात्र बाहेर दिल्हे, हरीपंत गावातच आहेत. डेरे दाखल जाले नाहीत. दाखल जाल्यास लेखन केले जाईल. शृत होये. नानाचा व हरीपताचा नित्य ख(ल)वत होत असतो. भाव यैकिल्यात आला की फौज वगैर जमा जालिया बाहेर निघावे, इग्रजाचे पारपत्य करावे, पुढे दौलतीचा बदोबस्त करावा, याअनवये खिलवत होत असतो. शृत होये. पुढे जे प्रसगाचे वर्तमान ध्याना(स) येईल ते सेवेसी लेखन केले जाईल. शृत होये. छ २६ माहे रमजानचे आज्ञापत्र सरकारचे डाकेसमागमे सादर जाले ते छ ५ माहे मारी सेवकास पावले. पावोन बहुत संतोश जाला. सदैव याचप्रकारे आज्ञापत्रे सादर करनार स्वामी समर्थ आहेत. शृत होये. मौजे भालगाव प्रा राताजन येथे बलवतराव सेव(का)कडून होते, त्याचा मारा पाटलानी केला, त्याचे पारपत्या-

विशई सरकारचे इनायेतनामे नवाब तहवरजग व जोरावरजग बाहादूर वगैर यास सादर जाले पाहिजेत म्हणौन पूर्वी येकदोन विनंतीपत्री लेखन केले होते. त्याचे उतर सादर जाले की, येज्यमानसाहेबास ज्यहाननसी केल्यावाचून कैसे इनायेतनामे सत्वर होतील. ज्यहान(न)सी करून इनायेतनाम्याविशई उतर लिहून पाठऊ म्हणौन आज्ञापिले. त्यास ब्राह्मनाया अभिमान धरून येज्यमानसाहेबास अर्ज करून सरदारास इनायेतनामे पाटलाचे वगैर पारपत्याविशई सादर करनार स्वामी समर्थ आहेत. सर्वस्वे वसीले व मुरबी व मायेबाप स्वामी आहेत. सेवकाचा अभिमान धरून, ब्राह्मन मारला गेला आहे, त्याचे साहित्याविशई इनायेतनामे विनंती पूर्वी केल्याप्रमाणे सादर करून पाठविणार स्वामी समर्थ. खानदेशप्राती सेवकाची जागीरीची खेडी आहेत. त्यास गनेशपंत व सरसुभे यानी गावापासून यैवज घेतला येविशई पहिले विनंतीपत्री लिहिले होते. यैवज माघारा ये या-करिता कारभाऱ्यास इनायेतनामे पाठवावे. त्याचे उतर सादर जाले की, रा। कृष्णरावजी येथे येणार. त्यास समक्षच सागू. मग इनायेत-नामे कोन्हास पाठवावे. त्यास राव मा।र तेथे आले आहेत. त्यास समक्ष ताकी(द) जाली पाहिजे की, नानास लिहून यैवज माघा(रा) देवणे. याप्रमाणे त्यास सागितले पाहिजे अन नानास व हरीपतासही इनायेतनामे सादर जाले पाहिजे. ध्यानास आणून इनायेतनामे सादर करनार स्वामी समर्थ आहेत. सदैव आज्ञापत्री परामृश होत असावा बहुत काये लिहिणे, कृपालोभ किजे हे विज्ञाप्ती.

---

**A. R. No. 118**

१० शवाल ११९५ हिजरी
२९ सप्टेंबर १७८१

पैा छ १७ माहे शवाल संन ११९५ हिजरी रोज शेनिवार साइं-काल डांकेवर मा। दारोगा हरकारा.

श्रीनिवास

पोष्य हैबतराव गोपाळ सां। नमस्कार विनती उपरी. येथील

वर्तमान छ १० शवाल आश्विन शुध द्वादसी शनिवार दोन प्रहर दिवस-पर्यंत मो। पुणें स्वामीचे कृपेकरून क्षेम जाणून स्वानंद लेखनाज्ञा केली पाहिजे विशेष पूर्वी छ ९ माहे मा।री प्रातःकाली हुजूर अर्जी व अखबार डांकेवर पाठविली. ते दारोग्याचे विद्यमानें हुजूर गुजरून पत्रें स्वामीस पावलीं असतील. त्या उपरी यैकिलें व प्रत्यक्ष वर्तमान पृथक पत्रीं लिहिलें आहे त्यावरून श्रुत होईल. हरीपंत फडके डेरे दाखल जाहल्यावितरिक्त फौजेचा जमाव व सर्वत्रांवर दाब पडणार नांहीं याकरितां बालाजीपंताचे सलाहानुरूप छ ९ शवाल शुक्रवारीं प्रथम प्रहर रात्रीस राजश्री बालाजीपंतापासून हरीपंतानी रुखसत घेतली. त्या उपरी उभयतां बइतिफाक पंतप्रधानांसमीप गेले. व प्राथःकाळची साहा घटका रात्र शेष राहिले ते समईं निरोपास येऊं म्हणोन विनती केली की श्रीमंतानीं मान्य करून आज्ञा केली कीं साहा घटका रात्र राहील ते समई आम्ही जाग्रत होऊं किंवा करणें व हरीपंतानी रुखसतीकरितां यांवें. त्या प्रा। साहा घटका रात्र बाकी राहिली ते समईं श्रीमंत आपण जाग्रत जाहले व हरीपंतास बोलाऊन आणून रुखसत केलें. पंत मा।र डेरे दाखल जाहले या उपरी दिपावली-पर्यंत फौज जमा होईल. त्यानंतर बाजी गोविंद व विसाजी आपाजी उभयतांसमागमें फौज देऊन गुजरात प्रांतास रवाना करणार किंवा जातीनें हरीपंत जाणार निश्चय अद्यापि जाहला नांहीं. सेवेसी श्रुत होय, बहुत काय लिहिणं, हे विनती.

---

पै।। छ १७ शवाल संन ११९५ हिजरी रोज शेनिवार साइकाली डांकेवर मा। दारोगा.

श्रीनिवास

अखबार पुणें अज इ।। छ ९ माहे शवाल लगायत छ १० माहे मा।र सन ११९५ हिजरी शनिवार.

करनल गाडर डबईस राहून बडोद्यास फतेसिंग गाइकवाडाकडें ज्वाबसालास वकीलास पाठविलें आहे. व मिस्तर हिस्तैनास चेत-

सिंगानें दस्तगीर केलें. व हैदर नायकाची व जनराल कूटची लढाई कंचीसमीप छ १२ रमजानीं जाहली. त्या लढाईंत जनराल मार पसपा होऊन चिनापटणास गेला. व खान मस्तूर कंचीसमीप येऊन उतरला. याकरितां करनल गाडर वगैरे समग्र इंगरेजांचे सरदार घाबरे व बेदिल जाहले आहेत म्हणोन येथील कारपरदाजांचे जुबानीं चर्चा व छ ७ माहें मार दसऱ्याचे दिवसीं श्रीमंत पंतप्रधानांचे डेरे गारपीरासमीप जाहले. यावितरिक्त अवांतर वर्तमानासहित छ ९ माहे मारीं डांकेवर हुजूर व स्वामीचे सेवेसी पत्र पाठविलें तें पाऊन वर्तमान श्रुत जाहलें असेल. त्या उपरी नवल विशेष प्रत्यक्ष व यैकिलें वर्तमान सेवेसी लिहिलें असे.

करनल गाडराचे चितांत फतेसिंग गाइकवाडानें दाहा हजार-पर्यंत फौज ठेऊन माहदाजी सिंद्याचे तंबीकरितां जांवें किंवा खानदे-शांत मुलक काबीज करावा याकरितां रदबदली बहुत मुबालग्यानें करितो. परंतु गाइकवाड मार कबूल करीत नांहीं म्हणोन पूर्वील अखबारेंत वर्तमान लिहिलें आहे. येथील कारपरदाजानीं गोविंदराव गाइकवाड याची सरदारी उभी करावयाची तजवीज करून फते-सिंगाची जागीर तगीर करून गोविंदराव गाइकवाडास सनदा देणार व फतेसिंगाचा सिलसिला कागदपत्राचा कारभाऱ्यासीं आहे. व गाइकवाड मार याचे बोलण्याचा खुलासा यैसा जे आपण चिता-पासून श्रीमंताचे लक्षांत आहोंत. बडोदें वगैरे दरोबस्त आमची जागीर इंगरेजांचे कबज्यांत सांपडली आहे. याकरितां समयोचित यांसी यैक्यता करून आपले जागीरीचा बचाव करून राहिलों आहोंत जे दिवसीं पंतप्रधानांची फौज सुरतेसमीप येऊन इंगरेजांकडील तसरूफी मुल्क सोडवील ते दवसीं आम्हीं श्रीमंताकडील सरदाराचे शरीक व रफीक होऊं. याप्रमाणें उजरख्वाहीनें वकीलासीं गाइक-वाड मार बोलत आहे. सारांश, येथील कारपरदाजाचे मतें या समईं कलकतेवाला मिस्तर दस्तगीर जाहला व हैदर नाईक इंगरे-जांवर गालिब. याकरितां गुजरातेंत मातबर फौजा पाठऊन मुलुक सोडवावा. या मोहिमेस मातबर सरदार गेल्यावितरिक्त मोहीम

सर होणार नांहीं. म्हणून बालाजीपंत व हरीपंत डेरे दाखल होणार हें खबर छ ४ माहे मारचे अखबारेंत लिहिलें होतें. त्या उपरी कारपरदाजानीं तजवीज केली कीं बाजी गोविंद यांसमागमें फौज देऊन रवाना करावें. पुन्हां बालाजीपंताचे व हरीपंताचे विचारानें ठराव जाहला कीं, हरीपंत डेरे दाखल जाहल्यावांचून लोक व फौज जमा होणार नांहीं. याकरितां पंत मारनुलेनीं डेरे दाखल व्हांवें हा निश्चय जाहला.

२

पुरवणी अखबार. छ १० माहे शवाल सन ११९५ हिजरी. छ ९ शवाल आश्विन शुध येकादसी शुक्रवारची तीन प्रहर रात्र जाहल्यानंतर साहा घटका रात्र शेष राहिली ते समईं राजश्री हरीपंतानीं श्रीमंत पंतप्रधानांचा निरोप घेऊन डेरे दाखल जाहले. कांही दिवस मुकामात करून फौज जमा जाहल्यानंतर हरकत करावी व मोहीम रूबकार होईल त्याप्रमाणें अज्म करावा म्हणोन कारभाऱ्यांचे तजवीजीचा निश्चय जाहला आहे.

छ १० माहे मारीं हरीपंताचे डेऱ्यांचे गिर्दनवाह खासे स्वारांची दाहा घोडीं व पागा व सिलेदार पंचेवीस येणेप्रमाणें लाहान मोठीं पनासपर्यंत घोडीं जमा आहेंत. प्रतिदिवसीं सें पनास लोक येतात. या उपरी जें वर्तमान होईल तें सेवेसी सूचना लिहीन हें विनती.

पैा छ १७ शवाल संन ११९५ हिजरी रोज शेनिवार साइंकाली डांकेवर मा दारोगा हरकारा.

---

**A. R. No. 119** — १० शवाल ११९५ हिजरी

२९ सप्टेंबर १७८१

पैा छ १७ माहे शवाल संन ११९५ हिजरी रोज शेनिवार साइंकाली डांकेवर मा दारोगा हरकारा.

श्री शंकर

विनंती विज्ञापना यैसी जे यथील कुशल ता छ १० माहे शवाल मुा पुणे स्वामीचे कृपावलोकणेकरून येथास्थित जाणौन

स्वानद लेखनाज्ञा करीत असिले पा विशेष येथील वर्तमान छ ९ माहे मार रोज शुकरवारी प्राथःकाली विनंतीपत्र सरकारचे डाकेसमागमे सेवेसी रवाना केले ते पावोन सविस्तर वर्तमान शृत जाले असेल. तदनतर यथील वर्तमान दसऱ्यास बुधवारी श्रीमताचे सरकारचे डेरे बाहेर गारपीराजवल जाले. हरीपतानी त्याच दिवसी डेरे दाखल व्हावे यैसा निश्चये पूर्वी होता. ते रहित होऊन डेरेच मात्र बाहेर दिल्हे. अन हरीपतही डेरे दाखल होनार. हे वर्तमान विनंतीपत्री लेखन केले होते त्याजवरून ध्यानास आले असेल. राजश्री नाना व हरीपंत याचा खिलवत जाला. निश्चये ठैरला की मागील साहा घटका रात्री हरीपतानी डेरे दाखल व्हावे. सरकारचे डेरे बाहेर जाले. ते हरीपतानी डेरे दाखल व्हावे म्हणौन जाले. तिसरे प्रहरी हरीपताचा पेशखाना बाहेर डेऱ्यास गेला. मागील साहा घटका रात्र राहता छ ९ रोज शुक(रवा)री माहे मारी रा हरीपत डेरे दाखल जाले. कारन की फौज वगैर जमा जाली पाहिजे म्हणौन हरीपंत डेरे दाखल जाले. तमाम सरदारास व सिलेदार वगैर यास पूर्वी पत्रे लिहिली होती की सत्वर यावे. आताही सर्वास पत्रे लिहि-तात की हरीपत डेरे दाखल जाले, सत्वर जमा व्हावे. शृत होये. वदता होती की, नानाही डेरे दाखल होनार. त्यास नाना काही डेरे दाखल जाले नाहीत. निश्चये जाल्यास लेखन केले जाईल. हरीपत मात्र डेरे दाखल जाले. येथून खडकीचा पूल कोसभर आहे तेथे हरीपत मुकाम करून राहानार. फौजही जमा व्हावयास महिना दीड महिना पाहिजे. याकरिता हरीपंत खडकीवर मुकाम करून राहानार. प्रस्तुत हरीपत पुन्याबाहेर गारपीराजवल डेरे दाखल होऊन आहेत. येका दो दिवसा येका कोसाचे कूच करून खडकीचे पुलावर मुकामास जाणार. शृत होये. राजश्री विसाजी कृष्ण बिनीवाले यासही डेरे दाखल करावे यैसी यौज्यना जाली आहे. कारन की विसाजीपत नावाचा सरदार आहे. विसाजीपताची उभारनी करून फौज वगैर देऊन गुजरात प्राती विसाजीपतास पाठवावे, प्रसग पडल्यास आनिक कोन्हीकडे पाठवावे यैसी यौज्यना जाली आहे. निश्चये होऊन

विसाजीपंत बाहेर निघाल्यास लेखन केले जाईल शृत होये. राजश्री बाजीपताची रवानगी कोकन प्राताकडे बोरघाटाचे सु

२

पुरवनी

मारे करनार. कारन की इग्रजाची पलटने कल्यानीस आहेत. त्याजवर शह पडावा व कोकन प्राती उपद्रव करावा या अर्थी बाजीपताची रवानगी बोरघाटाकडे कोकन प्राती करनार. निश्चये होऊन वाजीपताची रवानगी केल्यास लेखन केले जाईल. शृत होये. इग्रजावर शह पडावा म्हणौन राजश्री हरीपंत डेरे दाखल जाले. पुढे फौजा वगैर जमा जाल्यावर काये मसलत करून स्वारीचा उद्वोग करतील हे पाहावे. प्रस्तुत हरीपत डेरे दाखल जाले. फौजा वगैरही जमा होनार शृत होये. वाफगावास होलकरही फौज जमा करितात. तेही डेरे दाखल होनार. होलकर डेरे दाखल जाल्याचे वर्तमान आलिया लेखन केले जाईल. शृत होये. हरीपंताजवल फौज जमा जालियावर प्रसगोपात इग्रज वगैरकडे स्वारीचा उद्वोग करनार. प्रसगानसानसार नानाही डेरे दाखल होऊन राहानार यैसे आहे. मग नानाचा निश्चये होऊन डेरे दाखल जाल्यास लेखन केले जाईल शृत होये. कल्यानीस तीनच्यार पलटने होती त्यापैकी कल्यानी व बेलापूर वगैर ठानी आहेत. तेथे ठान्या परत दोनदोन च्यारच्यारसे मणुश राहून बाकी पलटने ममई व वसईकडे गेली यैसी वदता आहे. दुसरे, करनेल गाडर सुरतेस आहे. तो सिद्याकडील इग्रजास मदत जाणार यैसे वर्तमान आहे. मग पलटने वगैर कल्या (णी) हून गेली हे वर्तमान तहकीक यैकिल्यास लेखन केले जाईल. शृत होये. इग्रज यासी काही सलूकाचेही सूत्र लावणार यैसेही वर्तमान आहे निश्चयेरूप यैकिल्यास लेखन केले जाईल शृत होये. प्रस्तुत हरीपंत जलदी करून निघाले म्हणौन लोक बहुत तर्क करितात कारन की करनल गाडर सुरतेस तो काही उज्म करून आला नाही. हरीपत सत्वर निघाले याकरिता लोक तर्क विशेष करितात. शृत होये. पुढे

जे प्रसगाचे वर्तमान ध्यानास येईल ते सेवेसी लेखन केले जाईल. बहुते काय लिहिणे, कृपा लोभ कीजे हे विज्ञाप्ती.

पैा छ १७ माहे शवाल संन ११९५ हिजरी रोज शेनिवार साइंकाली डांकेवर मा़ा दारोगा.

---

A. R. No. 120 — ४ शव्वाल ११९५ हिजरी
३ अक्टोबर १७८१

(पैवस्त) छ २३ शवाल सन ११९५ हिजरी शुक्रवार साइंकाली मा़ा दारोगे हरकारा.

श्रीनिवास

पोष्य हैबतराव गोपाळ साष्टाग नमस्कार विनती उपरी येथील वर्तमान ता़ा छ १४ शवाल अश्विन वद्य प्रतिपदा बुधवारपर्यंत मो़ा पुणं स्वामीचे कृपेकरून क्षेम जाणून स्वकीय कुशलार्थ लेखनाज्ञा करावी विशेष. पूर्वी छ १० माहे मा़ारीं हुजूर अर्जी व अखबार व स्वामीचे सेवेसी पत्र डांकेवर पाठविलें तें पाऊन इकडील वर्तमान श्रुत जाहलें असेल. त्या उपरी छ १४ माहे मा़ारपर्यंत पृथक पत्रीं वर्तमान लिहून डांकेवर पत्रें हुजूर व स्वामीचे सेवेसी पाठविलीं आहेंत. दारोग्याचे विद्यमानें पावतील व लेखनार्थ श्रुत होईल. बहुत काय लिहिणें हे विनती.

---

(पैवस्त) छ २३ माहे शवाल सन ११९५ हिजरी शुक्रवार.

श्रीनिवास

अखबार पुणें अज इा़ा छ १० शवाल लगायत छ १४ माहे मा़ार सन ११९५ हिजरी अश्विन वद्य १ बुधवार.

हरी बल्लाळ फडके छ ९ माहे मार शुक्रवारची तीन प्रहर रात्र गेल्यानंतर श्रीमंत पंतप्रधानांचा निरोप घेऊन डेरे दाखल जाहले, व फतेसिंग गाइकवाडाचे सिलसिल्यावर कोंडाईबारी व सोनगडचे रुखं फौज पाठवावयाची तजवीज येथील कारपरदाजांची आहे. व करनल गाडर डवईत राहून फतेसिंग गाइकवाडाचे इतिफाकाकरितां मध्यस्ताचे विद्यमानें ज्वाबसाल निकडीनें लाविला आहे कीं गाइकवाड मारानें दाहा हजार फौजेनसीं सिपरीकोलारसासमीप इंगरेजांची पलटणें माहदाजी सिंद्यांचे रुखांवर आहेत त्यांचे मदतीस व सिंदे माराचे तंबीस जांवें किंवा खानदेशांत येऊन मुल्क तसखीर करावा. यावितरिक्त अवांतर वर्तमानासहित हुजूर अर्जी व अखबार व स्वामीचे सेवेसी पत्र पाठविलें तें पाऊन वर्तमान श्रुत जाहलें असेल. त्याउपरी वर्तमान यैकिलें व प्रत्यक्ष दफेवार हुजूर व स्वामीचे सेवेसी लिहिलें आहे.

कृष्टणराव बलाळ यांस बमोजिब व रूप इनायतनामा हुजूर रवाना केलें म्हणोन येथील कारपरदाजानीं हैदरअलीखानास पत्रें लिहिली व नूरमा खान व नरसिंगराव याजकडून लिहविलीं हें वर्तमान पूर्वी लिहिलें आहे. सांप्रत खान मारनुलेचीं उतरें बालाजीपंत व हरीपंतास व उभयतां वकीलास आलीं. पत्राचा मार कारपरदाजानीं सेवकास सांगितला नांहीं. खारिज यैकिला जे बालाजीपंतास सरसरी मार लिहिला आहे कीं, कृष्टणराव बलाळ हुजूर बंदगानआलीकडें गेले आहेत. तरी बमोजिब नकशा व करार बंदगानआली इंगरेजांचे तंबीकरितां मुतवजे मोहीम होतील व राव मार याचेविषईं अर्जमारूज करतील व हुजूर मंजूर होईल. कृष्टणराव बलाळ हुजूर जाऊन ज्वाबसाल परस्परें होऊन निश्चय काय जाहला याची इतिला देणे, याप्रकारे लिहिलं आहे, व नूरमा खान व नरसिंगराव यास खान मारानें लिहिलें आहे कीं बंदगानआलीचें जनाबेंत इंगरेजांचे तरफेनें वकील आहे व हुजुरांत इंगरेजांची ज्यानबदारी मंजूर. सांप्रत कृष्टणराव बलाळ हुजूर गेले आहेत. हे बहुता दिवसापासून मध्यस्त व ज्वाबसालाचे बानीकार, हुजूरीहून

जो इरशाद होईल त्याचा रदजवा (ब) राव मारनुलेकडून होणार नांहीं व मर्जी मुबारकेप्रमाणें कबूल करून पंतप्रधानांचे कारपरदाजास लिहतील. कारभाऱ्यास रावजीची खातरदारी जरूर व मुख्तार होऊन गेले असतील यास्तव तुम्हीं बालाजीपंत व हरीपंतास स्पष्ट सांगणं कीं इंगरेजासीं दारमदार सर्वथैव न करावा.

२

(पैवस्त) छ २३ माहे शवाल सन ११९५ हिजरी शुक्रवार.

पुरवणी अखबार पुणें छ १४ शवाल सन ११९५ हिजरी.

इंगरेजांचे कौल कराराचा विश्वास व निश्चय सर्वथैव नांहीं. सांप्रत आम्हांकडील जरब इंगरेजास फार लागली. याकरितां बमय साष्टी वगैरे मकानें घेतलीं तें देऊं म्हणतील तर हीं यैक्यता न करावी कदाचित दारमदार करण्यांतच क्षेम व सलाह दौलत व समयोचित जाणून कारभाऱ्यांचे चितांत श्नेह करावयाचा असलियां आम्हास पूर्वसूचना करणें. आम्हाकडें इंगरेजांचा सिलसिला फार आहे. मिनतवार व आमचे खातरख्वाह व पंतप्रधानांचे मनोदयानुरूप दारमदार केला जाईल. बंदगानआलीचे विद्यमानें इंगरेजांसी दारमदार व श्नेह पंतप्रधानांचे कारभाऱ्यानीं न करावा. हजरत बंदगानआली इंगरेजांचे तंबीकरितां मुतवजे जाहलियां थोडक्या तरदूदींत इंगरेजांची तंबी करारवाकई होईल. सदरहू लिहिल्याप्रमाणें नूरमा खान व नरसिंगराव यानीं बालाजीपंत व हरीपंतास वर्तमान सांगितलें. उभयतानीं उतर केलें कीं इंगरेजांसी दारमदार केल्यापक्षीं हैदरआलीखानाचे इस्तसवाबेनं होईल. व सलूकाविषईं इंगरेजांचा पैगाम आलियां परस्परें शरीक मसलहतांस इतिला करून त्यांचे सलाहानुरूप श्नेह करावा म्हणोन पूर्वींच करार जाहला आहे. याप्रमाणं उभयतां वकीलास सांगितलें व हैदरआलीखानास प्रत्योतर लिहून पाठविलं म्हणोन यैकिलें.

पंतप्रधानांचे कारपरदाजानीं वकीलाकडून हैदरआलीखानास सूचना लिहविली होती कीं बंगाल्यांत फौज पाठवावयाची तजवीज आहे. पंतप्रधानांचे सरकारांत रुपयाची आमदनी थोडकी. वीसपंचवीस लाख रुपयेपर्यंत हैदरआलीखानाकडून मदद जाहलियां फौज रवाना होईल. सदरहू आन्वयानें वकीलांनी खान-माारास लिहिलें होतें हा माार पेशजी आखबारेंत लिहिला आहे. सांप्रत हैदरआलीखानानें वकीलास प्रत्योतर लिहून पाठविलें कीं, बंगाल्यास फौज पाठवावी हे तजवीज बहुत चांगली आहे. खामखा पाठवणें म्हणोन बालाजीपंतास सांगणं व बमोजिब करार साल माारचे पेशकसीबाा रुपये बारा लाख आखर फसल रवी द्यावयाचा करार आहे. बशर्त फौजेची रवानगी बंगाल्यास जाहली तर जे समईं कार-परदाजांस रुपये सापेक्ष होतील ते समईं पाठऊन देऊं. हें वर्तमान नूरमााखान व नरसिंगराव यानीं बालाजीपंत व हरीपंतास सांगितलें उभयतांनी प्रत्योतर केलें कीं दुसाला पेशकसीबाा रुपये चोवीस लाख द्यावे म्हणजे पंचेवीसतीस हजार फौजेची रवानगी बंगाल्यास होईल व इंगरेजांचा मूळ छेद होईल. येविषईं पुन्हां हैदरआलीखानास लिहून उतर सत्वर आणवणं.

अरकाट वगैरे इंगरजांचा तसरूफी मुलक हैदरआलीखानानीं सोडविला आहे. व पूर्वी पंतप्रधानांचा व हैदरआलीखानांचा करार जाहला आहे कीं जो मुलुक तसखीर होईल

३

(पैवस्त) छ २३ शवाल सन ११९५ हिजरी शुक्रवार.

पुरवणी अखबार पुणें छ १४ शवाल सन ११९५ हिजरी. त्यापैकी निमे पंतप्रधानानीं घ्यावा व निमे खान माराचे तसरूफांत राहावा व पंतप्रधानांचे तरफेनें मातबर सरदार फौजेसुधां हैदरआली खानास शरीक लढाईत असावा. याप्रमाणं करार जाहला आहे. यास्तव पंतप्रधानांचे कारभाऱ्यानीं साल मारीं लक्ष्मणराव रास्ते यांचे बिरादरास दोन हजार स्वारानसीं रवाना केलें. ते फौज व सरदार

खान मारनुलेस शरीक जाहले. इंगरेजांकडील तसरूफी मुलुक घेतला त्यापैकीं निमे कराराप्रमाणं पंतप्रधानास द्यावा. यासबब हैदरआली-खानानें वकीलास लिहून पाठविलें. व वकीलानी बालाजीपंतास सांगितलें कीं इंगरेजाकडून जो प्रांत सोडविला आहे त्यापैकीं निमे प्रांतात तुम्ही आपल्या तरफेचे आमील पाठऊन अमल दखल करणं. बालाजीपंतानीं उतर केलें कीं कर्नाटक प्रांती जो मुलुक सोडविला त्याचे यैवजीं धारवाड प्रांती माहाल द्यावे म्हणोन पूर्वी कराराचे समईं आम्ही सूचना केली आहे. सांप्रत आम्हास रुपयाची जरूरी आहे. याकरितां निमे मुल्काचे तसखीसीचा यैवज नख्त रुपये साल मारीं हैदरआलीखानानी आम्हांस द्यावे. पेस्तर सालापासून धारवाड प्रांतीं यैवजी महाल नेमून द्यावे. याप्रा तुम्हीं खान मारनुलेस लिहिणं. आम्हीं कृष्टणराव जोसी यास लिहितों तेही खान मारास सूचना करतील. याप्रा सांगितलें व पत्रें रवाना जाहलीं.

करनल गाडराकडून चिनापटणवाले जनरालास कुमक येणार याकरितां मुंबई व सुरत प्रांतीं फौज पाठऊन इंगरेजास वोढा बसवणं म्हणोन हैदरआलीखानानं येथील कारपरदाजास लिहिलं आहे.

छ १२ रमजानीं जनराल कूटासीं व हैदरआलीखानासीं लढाई जाहली. ते वर्तमान नरसिंगराव वकीलाचे जुबानीं यैकिल्याप्रमाणं पूर्वील पत्रीं लिहिलं आहे. सांप्रत शाहनुरीहून कोण्ही सेवकाचे स्नेहितानीं पत्र पाठविलं त्यांत लढाईचा मार सुचविला तो सेवसी लिहिला असे. बंगाल्याहून हजार तुरक स्वार व हजार गोरे व आठ हजार बारचे जवान, व राजाराम नामे जमीदार पांच हजार काळे प्यादेसहित व शंभर तोफा येणेंप्रमाणं जनरालास कुमक आली. त्याउपरी जनराल कूटासीं व हैदरआलीखानासीं प्रथमतां लढाई जाहली. त्यांत मीर वगैरे सरदार व पांच हजार स्वार व पायंचे मिळोन माणसें ठार जाहलीं. त्याउपरी दुसरी लढाई रमजानची ७ सातवी किंवा बारावे तारीखेस जाहली. त्या लढाईंत दोन हजार स्वार व तीन हजार प्यादे व येकदोघें सरदार कामास आले. मातबर लढाई जाहली.

८

(पैवस्त) छ २३ शवाल सन ११९५ हिजरी शुक्रवार.

पुरवणी अखबार पुणं. छ १४ शवाल सन ११९५.

व इंगरेज व हैदरआलीखान दोघेंही मातबर सरदार व हिमतीचे याकरितां कायम राहिले. इंगरेजाजवळीप तीस हजार बारचे जवान व काले प्यादे व दोन हजार तुरक स्वार व दोनसें तोफा येणेंप्रमाणें जमीयत व चिनापटणाहून च्यार कोस हैदरआलीखानाचे रुखावर मौजे पुनवलीसमीप मुकामात करून राहिला आहे. हैदरआलीखान कंचीसमीप आहे. लढाई दरपेश, यश आपेश ईश्वराचे स्वाधीन. सदरहू शाहनुरीहून वर्तमान आल्याप्रमाणं लिहिलं असे.

राजे चेतसिंग यानें दग्यानें मिस्तर हिस्तैनास दस्तगीर केलें हे वर्तमान येथील कारपरदाजांचे सांगितल्याप्रमाणं व माहदाजी सिंदे व नागपुरीहून वकीलानीं कारपरदाजास पत्रें पाठविलीं त्यांत सार व सावकारी पत्रं आलीं म्हणोन पूर्वीं पयदरपय वर्तमान लिहिलं असे. सांप्रत कासीहून मुजरद कासदाची जोडी आली. व त्याचे जुबानीचं वर्तमान कासदांचे मिरध्यानें बालाजीपंत व हरीपंतास सांगितलें व सेवकानें यैकिलें जे दोनसें प्यादे व च्यार इंगरजांचे सरदार यांस मारून चेतसिंग गंगा पार होऊन रामगडास गेला. त्याउपरी मिस्तर हिस्तैनानं कासीहून कूच करून चिन्हारचे किल्यास कासीहून दक्षणेस आठ कोसी गंगेचे तीरीं इंगरेजांचे तसरूफांत आहे तेथें गेला. चेतसिंगानें दाहा हजारपर्यंत स्वार प्यादे चिन्हारास पाठऊन किल्यास माहासरा केला. व जंगी सरंजाम वगैरे मिस्तर मारानं कलकत्याहून आपले समागमं आणिला होता तो चेतसिंगाचे तसरूफांत आला आहे. मिस्तर मारापासीं जंगी सरजाम नांहीं याकरितां अजीज जाहला होता. याप्रा। वर्तमान कासदांचे जुबानीं यैकिलं.

बंगाल्यास फौज पाठवावी म्हणोन येथील कारभारी मुखेंकडून बोलत आहेत. परंतु तरदूद व उद्योग किमपि दिसत नांहीं.

सुरापूरकर बेडरांचे वकीलानीं बाकी बाा दुसाला पेशकसीचे रुपयाची निशा करून पुन्हा दाहा हजार रुपये नजर देतों म्हणोन करार केला आहे. परंतु पंतप्रधानांचे तरफेचा वकील व पत्रें बेडर माारास पुण्यास येण्याविषईंची आद्यापि गेलीं नांहीत.

हरीपंत छ ९ शवालीं डेरे दाखल जाहले. त्यानंतर छ ११ माहे मारी डेऱ्याची हरकत करून गारपीरासमीपच आहेत. संभर सवासे स्वार व शागिर्दपेशा वगैरे दोनसें पायचे लोक जमीयत डेऱ्यासमीप आहे.

बालाजीपंत मेनवलीस जाणार म्हणोन वदंता. फरूख मिरजा येहतशामजंग निरमलकर यानीं खुषबोईचे पेटारे यथील कारपरदाजास ७ सात पाठविले आहेत.

| बालाजीपंत | हरीपंत | कृष्टणराव | भवानी सिवराम |
|---|---|---|---|
| ३ | २ | १ | १ |

७

येणेंप्रमाणं पाठविले आहेत. खान मारनुलेचे वकीलानं आद्यापि कारपरदाजास पावते केले नांहीत.

---

**A. R. No. 121**

१५ शवाल ११९५ हिजरी
४ अक्टोबर १७८१

(पैवस्त) छ २३ माहे शवाल सन ११९५ हिजरी शुक्रवार साइंकाली मारफत दारोगे हरकारे.

श्री शंकर

विनंती विज्ञापना यैसी जे येथील कुशल ताा छ १५ माहे सवाले मुाा पुणे श्वामीचे कृपावलोकणकरून येथास्तित जाणौन श्वानंद लेखण आज्ञा करीत असिले पाहिजे विशेष. येथील वर्तमान

छ १० माहे मजकूर रोज शणवारी दोन प्रहरा सरकारचे डाकेसमा-गमे विनंतीपत्र सेवेसी रवाणा केले ते पावोन सविस्तर वर्तमान ध्याणास येईल. तदनंतर येथील वर्तमान रा। हरीपंत डेरे दाखल जाले. हे सविस्तर वर्तमान विनंतीपत्री लेखण केले होते. त्याज-वरून श्रुत जाले असेल. हरीपंत पुण्याबाहेर पूर्वेस गारपीराजवल डेरे देऊन मुकाम करून आहेत. पाचच्यारसे स्वारही डेऱ्याजवल आहेत. पूर्वी लोकास पत्रे लिहिली होती की सत्वर येणे. काही काही लोक फौजेचे जमा होतात. महिन्या पंधरा दिवसा (त) फौजही जमा होईल श्रुत होये. संध्याकाली नानाचे वाड्यात दरबार वगैर जाला होता माली व मुलकी कामकाज ज्यारी आहे. श्रुत होये. छ ११ रोज रविवार कल्याणीस दोनतीन पलटणे होती ते वसईस व ममईस गेली यैसे वर्तमान होते. प्रस्तुत वर्तमान आहे की, मागती ते पलटणे कल्याणीस येणार यैसे वर्तमान आहे. करनेल गाडर सुर्तेस आहे तो फतेसिंग गायेकवाडाकडे जाऊन सिंद्याचे शेहचास पलटणे आहेत त्याचे मदतीस जाणार. यैसे वर्तमान होते. त्यास तिकडे मार्ग न चाले म्हणौन करनेल मागती ममईस येणार. यैसी वदंता आहे मागती तिकडील वर्तमान आलियास सेवेसी लेखण केले जाईल. श्रुत होये. कलकतेकर सुभा तो वाराणसीचे राज्याणे मारला. आणिक मोठे मोठे ठाणी त्या प्रांती आसपासी होती. तेथे इंग्रज होते. तेही इंग्रज मारले यैसी वदंता आहे. वारानसीकर राज्याजवल आस-पासचे राजे रजवाडे वगैरे मिलून पंचवीस हजार जमा जाले आहेत. याजकडील बुंधेलेही राज्यास मिलाले आहेत. राजे वगैर मातबर ज्यमाव करून प्रयागास वगैर इंग्रजाचे ठाणी आहेत तेथे उपद्रव करणार यैसे वर्तमान आहे. श्रुत होये. छ १२ रोज सोमवार नाना हरीपंताचे डेऱ्यास गेले होते. नानाचा व हरीपंताचा च्यार घटका खलवत जाला. उप्रातिक नाना आपले घरास आले. खलवतीचा भाव अैकिल्यात आला की फौजा वगैर जमा कराव्या. जमा जाल्या-नंतर काही फौज व आपा बलवंत वगैर बालाघाट व पंचमाहाल वगैर इकडे रवाणा करावे कारण की तिकडील कादार वगैर याजकडील

उठले आहेत. पैकाही सुरक्षित येत नाही. या अर्थी आपा बलवंत वगैर याची रवाणगी त्या प्रांती करावी यैसी योज्यना करितात. दुसरे कारण आहे की राव मजकूर तेथे आले आहेत त्याच्याही बोलन्यात बल पडावे या अर्थी आपा बलवंत वगैर याची रवाणगी पंचमाहाल वगैरकडे करावी यैसी तजवीज करितात. निश्चये जाल्यास लेखण केले जाईल श्रुत होये. प्रस्तुत इंग्रजाचा शह कोकण प्रांती विशष नसता, हरीपंत त्वरा करून बाहेर निघाले. म्हणौन येथील लाहान थोर लोक बहुमुखी वर्तमान बोलतात की येज्यमानसाहेबाचे स्नेह्यात काहीयेक संशय आहे. दरबारी व कारभाऱ्याचे मुखी तो यैकिल्याल नाही परंतु येथे बहुमुखी वर्तमान आहे. यैकिले वर्तमान लिहिले असे श्रुत होये.

छ १३ रोज मंगलवार होलकर वाफगावास आहेत तेही डेरे दाखल होणार. फौज वगैर जमा करितात यैसे वर्तमान आहे. श्रुत होये. कोकण प्रांती बाजीपंत आणा याची रवाणगी करावी यैसी यौज्यणा करितात कारण की कल्याणी वगैरस शह द्यावा यैसे आहे. श्रुत होये. दरबार वगैर जाला होता. विदित होये.

छ १४ रोज बुधवार हैदर नाइकासी व इंग्रजासी चिनापटनाकडे लढाई जाली. काहीयेक हैदर नाईक सिकस्त होऊन माघारी सरले यैसे वर्तमान आहे. मागती तिकडील वर्तमान आलियास लेखण केले जाईल. श्रुत होये. फौज वगैर सत्वर जमा जाली पाहिजे म्हणौन नाना फडनीसही दिपवालीचे संधीस डेरे बाहेर होऊन राहाणार यैसी वदंता आहे. निश्चये जाल्यास लेखण केले जाईल. श्रुत होये. पुढे जे प्रसगाचे वर्तमान ध्यानास येईल, ते लेखन केले जाईल. सदैव आज्ञापत्री परामृश करीत जावा. बहुत काये लिहिणे कृपा लोभ कीजे, हे विज्ञाप्ती.

A. R. No. 122

१६ शवाल ११९५ हिजरी
५ आक्टोबर १७८१

पैाा छ २५ शवाल रविवार सन ११९५ हिजरी, दोन प्रहर मै डांक सरकार.

श्रीनिवास

पोष्य हैबतराव गोपाळ सां नमस्कार. विनती उपरी, यथील वर्तमान ताा छ १६ शवाल आश्विन वद्य ३ त्रितीया शुक्रवारपर्यंत मो पुणें क्षेम जाणून स्वानंद लेखनाज्ञा केली पाहिजे. विशेष, कृपापत्र मेरकूम छ ४ शवाल व रवानगी छ ५ माहे मारचें चिरजीव राजश्री रघोतमराव यांचे पत्रासहित डांकेवर पाठविलें तें छ १६ माहे मारीं सूर्योदईं पाऊन सविस्तारें वर्तमान श्रवणीं संतोप जाहला. राजश्री कृष्टणरावजी हुजूर पावले व शरफ मुलाजमत हासल केली. उभयतां स्वामीं व नवाब मोमुनुदौला बहादरांची व रावजीची भेट जाहली. याचा विस्तार चिरजीवानी लिहिला त्याप्रमाणें कळला व सेवकास जो आनभव आहे त्याची इतिला सर्व स्वामीस. व या राजद्वारीचे ग्रहस्तांचा सांप्रदाय स्वामीस लोपला नांहीं. तत्रापी पंतप्रधानांवर हजरत खुदावंदन्यामतीची कृपा व हुजूरचा नफा व थोरांची परस्परें यैक्यता विशेष व्हावी याची योजना स्वामीसमान सदयहृदय करीत आहेत. सविस्तारें वर्तमान चिरजीव विनती करतील व आखबारेचें वर्तमान-पृथक पत्रावरून सेवेसी श्रुत होईल. हुजूर खारिज वर्तमान मंजूर, याकरितां खारिज शोध करून लिहितों. परंतु कारपरदाजांचा खुलासा विन्हां त्यांची भेट व परस्परे भाषण कळत नांही. याकरितां राजश्री बाळाजीपंताचे दर्शनोतर त्यानीं सांगितल्याप्रमाणें व अवांतर वर्तमान लिहिलें आहे. बहुत काय लिहिणं हे विनती.

पैा छ २५ शवाल रविवार सन ११९५ हिजरी, दोन प्रहर मैं डांक सरकार.

श्रीनिवास

अखबार पुणें अज इा छ १५ शवाल लगायत छ १६ माहे मार सन ११९५ हिजरी. आश्विन वद्य त्रितीया शुक्रवार.

हैदरअलीखानानें बालाजीपंत व हरीपंतास नूरमाखान व नरसिंगराव वकीलास पत्र पाठविलीं. त्याचा खुलासा कृष्णराव बलाळ हुजूर गेले आहेत तरी हजरत बंदगानआलीनीं इंगरेजांचे तंबीस मुतवजे व्हावें. हे सलाहदौलत सर्वत्रांचे उपयोगी. कदाचित इंगरेजांचीं तबी करावी हें मंजूर न जाहलियां दारमदार करा म्हणतील. व पंतप्रधानांचे कारपरदाजास इंगरेजांसी दारमदार करणं प्राप्त होईल तरी अम्हाकडें म्हणजे खान मारनुलेसी जनराल कूट याचा सिलसिला मिनतवार आहे. यास्तव आमचे विद्यमानें करणें. व बंगाल्याचे मोहिमेस पंतप्रधानांची फौज रवाना होईल तरी पेशकसी बाा रुपये आखर फसल रबी द्यावयाचे जे समई सापेक्ष ते समई देऊं व बमोजिब करार इंगरेजांकडील तसरूफी प्रांत सोडविला आहे. त्याचे निमेचे माहालांत पंतप्रधानानी आपले तरफेचे आमिल पाठऊन अमल करावा. व खान मारासी व जनरालासीं लढाई छ ७ रमजानी जाहली. त्याचा मार व कासीहून कासदजोडी पुणेकर ग्रहस्तांची आली. त्याचे जुबानीचें वर्तमान मेस्तर हिस्तैन चिन्हारगडास गेला आहे व चेतसिंगानें माहासरा केला. व इंगरेजांसमीप जगी सरजाम नांहीं. याकरितां अजीज जाहला आहे. यावितरिक्त अवांतर वर्तमानासहित छ १५ माहे मारीं अखबार पाठविली तें पाऊन वर्तमान हुजूर व स्वामीस कळलें असेल. त्या उपरी यैकिलें व प्रत्यक्ष वर्तमान दफेवार हुजूर व स्वामीचे सेवेसी लिहिलं आसे.

कासदाचे जुबानीं कासीचे वर्तमान यैकिल्याप्रमाणें छ १५ माहे मारीं अखबार रवाना केली त्यांत लिहिलें आहे. याहून पूर्वीं

अखबारेंत वर्तमान लिहिलें होतें कीं चेतसिगानें मिस्तर हिस्तैनास दस्तगीर केलें. या वर्तमानास व कासदाचे जुबानी यैकिल्यास अंतर बहुत, याकरितां बळवंतराव वांकडे नामे सावकार कासींत दुकान मातबर व मारनुलेचे भाऊ आहेत, याकरितां वांकडयासमीप सेवकानें आपले गुमास्त्यास पाठऊन वर्तमानाचा शोध घेतला. त्यानीं सांगितलें कीं सागर व मिरजापूर कासीहून वीस व चालीस कोसाचे तफावतीनं आहे. दोन्ही स्थलीं आमची दुकानें व गुमास्ते आहेत. त्यानीं पत्रें पाठविलीं. त्यात मार दोन प्रकारचा. मेस्तर हिस्तैन कासीहून सातआठ कोसी गेला. तेथें चेतसिंग मातबर जमीयतेनसीं जाऊन हिस्तैन मारास दस्तगीर केलें व लढाईत मारला गेला. याप्रमाणें कलमी खबर आली. माहदाजी सिद्याचीं पत्रें व नागपुरीहून पत्रें आलीं त्यांत मार हिस्तैनास चेतसिंगानें दस्तगीर केलें. याप्रमाणें सर्वत्रांचे जुबानी खबर. कासदांचे जुबानीचे वर्तमान बालाजीपंत फड-नवीस यास विचारावयाकरितां छ १६

२

पुरवणी अखबार छ १६ माहे शवाल सन ११९५ हिजरी. माहे मारीं दरबारास गेलों. खिलवतेंत राजश्री बालाजीपंताची भेट जाहली. मिस्तर हिस्तैनास चेतसिगानें दस्तगीर केलें. हें वर्तमान माहदाजी सिद्यानीं व सागराहून बाळाजी गोविंद बुंदेल्यानीं लिहिलें व सावकारांचे गुमास्त्यांची लिहिलीं आलीं. परंतु कासीहून कासद मुजरद आमचे सरकारचे आले. त्याचे जुबानीं व पत्रीं मार आहे कीं मिस्तर हिस्तैन कासीहून पांचसाहा कोसी गेला व चिन्हारगडास जाणार. या संधींत चेतसिंगाची दाहाबारा हजार फौज येऊन माहासरा केला. इंगरेज माराची व चेतसिगाची लढाई होत होती. दस्तगीर केला किंवा लढाईंत मारला गेला, हें वर्तमान कासीहून पत्रें आलीं त्यांत नांहीं. परंतु लढाई शुरू होती. व आम्हाकडील कासद पत्रें घेऊन रवाना जाहल्यानंतर मेस्तर हिस्तैन याची सिकस्त होऊन दस्तगीर जाहला असेल, याकरितां सागरीहून, मिरजा-पुरीहून पत्रें आलीं, त्यांत दस्तगीर जाहल्याचें वर्तमान लिहिलं आलें.

याप्रमाणें कासीकडील वर्तमान बालाजीपंताचे जुबानी यैकिलें. सारांश, मेस्तर हिस्तैन दस्तगीर जाहला किंवा निघोन गेला, या दोन्हींचा निश्चय अद्यापि नांहीं. छ ७ रमजानीं जनराल कूटासीं व हैदरआली-खानासीं लढाई जाहली. त्या लढाईत इंगरेज पसपा होऊन माघारा गेला व खराबी फार जाहली. डेरे दांडे वगैरे लूट जाहली म्हणोन कलमी वर्तमान आलें यैसें बालाजीपंतानीं स्वमुखं सांगितलें.

सिपरीकोलारसेसमीप करनल मरेल माहदाजी सिंद्याचे लढा-ईस मोकाबिल पंधरासोळा पलटणासुधा आहे. हें वर्तमान पूर्वी लिहिलं आहे. सांप्रत बालाजीपंताचे जुबानी यैकिलें कीं गोहदकर जाटाचे मध्यस्तीकरितां इंगरेजानीं यमुनापार जांवें व त्यास माने-मुजाहिम कोण्हीं न व्हांवें याप्रमाणें करार ठरला. व गोहदकर जाट इंगरेजांसी शामील होता, तो अलाहिदा होऊन गोहदेस गेला. अठरा दिवसाचे फुरसतींत करनल मरेलानें यमुनापार निघोन जांवें. करारा-प्रमाणें यमुनापार न गेल्यास माहदाजी सिंदे व जांट वगैरेनी मुतफिक होऊन इंगरेजांस गारत करावें, याप्रमाणें करारमदार गोहदकर जाटासीं व माहदाजी सिंद्यांसी जाहला. व सिंदे मा।राचा सरजाम व तोफा शबखुनाचे लढाईत करनल मरेलानें घेतल्या आहेत, त्या तोफा व सरजाम गोहदकराचे विद्यमानें सिंद्यास माघारा देत होता, तो सिंद्यानीं घेतला नांहीं. याचें कारण यमुनापार पलटणें गेल्यानंतर ताकुब करून इंगरेजांची पलटणें गारत करावीं हे तजवीज माहदाजी सिंद्यांची आहे. सदरहू वर्तमान बालाजीपंताचे जुबानीं व कागज यैकिल्याप्रमाणें लिहिलं असे.

पैा छ २५ शवाल रविवार सन ११९५ हिजरी, दोन प्रहर मै डांक सरकार.

३

पुरवणी अखबार पुणें छ १६ शवाल सन ११९५ हिजरी.

करनल गाडर डबईस आहे म्हणोन पूर्वील पत्रीं वर्तमान लिहिलं आहे. सांप्रत छ मारीं बालाजीपंताचे मुखं यैकिलें कीं करनल गाडर

डबईहून वसई व मुंबईस आला. कासींत मेस्तर हिस्तैन दस्तगीर जाहलां व हैदरआलीखान इंगरेजावर गालिब, हें वर्तमान यैकोन करनल गाडर बेइस्तकलाल होऊन, वसईचा बंदोबस्त पोख्त करावा म्हणोन डबई-हून वसईस आला असेल, याप्रमाणें बालाजीपंतानीं कयास केला आहे. गाडर वसईस आला म्हणोन खारिजहीं चर्चा यैकिली.

कृष्टणराव बलाळ यांचे पुत्र नवरात्राचे उत्साहकरितां बारा-मतीस गेले होते तें छ मारीं रात्रौ पुण्यास आपले हवेलीस आले. या उपरी नवल विशेष जे वर्तमान यैकिल्यांत येईल ते विनती लिहीन हे विनती.

पैा छ २५ शवाल रविवार सन ११९५ हिजरी, दोन प्रहर मै डांक सरकार.

---

A. R. No. 123 २१ शवाल ११९५ हिजरी
१० आक्टोबर १७८१

पैा छ १ माहे जिलकाद संन ११९५ हिजरी रोज शेनिवार डांकेवर मै दारोगे.

श्रीनिवास

पोष्य हैबतराव गोपाळ सां नमस्कार. विनती उपरी येथील वर्तमान ताा छ २१ माहे शवाल, आश्विन वद्य अष्टमीपर्यंत मो पुणें स्वामीचे कृपेकरून क्षेम जाणून स्वानंद लेखनाज्ञा केली पाहिजे. विशेष पूर्वी छ १७ माहे मारीं डांकेवर लिफाफा रवाना केला तो दारो-ग्याचे विद्यमानें सेवेसी पाऊन वर्तमान कळलें असेल. सांप्रतचें वर्तमान पृथक पत्री लिहिलं आहे त्यावरून श्रुत होईल. इंगरेज बदमामली व त्यांची तंबी वाकई करावी हे सलाहदौलत व हा समय इंगरेजांचे

पारपत्याविषई बहुत नादर प्राप्त जाहला आहे. या वेळेस उपेक्ष्या केलियां, करोडो रुपये खर्च केल्यानेंहीं या प्रकारची काबू व समय साधणार नांही. या अर्थी हजरत बंदगानआली इंगरेजांचे तंबीविषई मुतवजे होण्याचा अर्ज कृष्टणराव बलाळ करतील तो मान्य करतील, या प्रकारें कल्पना व कयास येथील कारपरदाज करीत आहेत. सेवसी श्रुत होय. बहुत काय लिहिणें, हे विनती.

---

पैा छ १ माह जिलकाद सन ११९५ हिजरी रोज शेनिवार.

श्रीनिवास

अखबार पुणें अज इा छ १७ शवाल लगायत छ २१ माहे मार सन ११९५ हिजरी, बुधवार.

मेस्तर हिस्तैंन कासीहून निघोन चिन्हारगडचे सुमारें जात असतां, चेतसिंग जमीदार यानें कासीहून सात कोसी गांठ घालून माहासरा घातला व छ ७ रमजानीं हैदरअलीखानासी व जनराल कूटांसी लढाई जाहली त्यांत नुकसानी दुतरफा जाहली. परंतु जनराल मजकूर पसपा होऊन चिनापटणास गेला व सिपरीकोलारसेसमीप करनल मरेल इंगरेज सिंद्याचे रुखास होता तो अजीज होऊन माघारा जातों म्हणोन गोहदकर जाटाचे मारफातीनें करारमदार सिंद्यासी केला व जाट मजकूर इंगरेजापासून अलाहिदा होऊन गोहदेस गेला व करनल गाडर सुरतेहून वसईस आला. याप्रमाणें बालाजीपंत फडनवीसांचे जुबानीं वर्तमान यैकिलें तें छ १७ माहे मारीं डांकेवर पत्रें पाठविलीं. तें दारोग्याचे विद्यमानें पाऊन हुजूर स्वामीचे सेवेसी श्रुत जाहलें असेल. त्या उपरी प्रत्यक्ष व यैकिलें वर्तमान सांप्रत दफेवार लिहून पाठविलं आहे.

करनल गाडर डबईस राहून तेथोन फतेसिंग गाइकवाडाचे साजसेकरितां बडोद्यास गेला होता. माहदाजी सिंद्याचे मुकाबिल्यास जाणें किंवा खानदेशांत प्रांत सोडवणें हे दोन्ही पैगाम फतेसिंगानें कबूल

केले नांहीत. नख्त रुपये पांचसात लाख रुपयेपर्यंत मागत होता. येवि-षई रदबदली फार जाहली. सेवटीं दोन लाख रुपये कबूल केले. त्या उपरी गाडर नाखुसीनें बडोद्याहून पुन्हा डबईस गेला. त्या संधीत कासीकडे हंगामा जाहल्याचें वर्तमान आलें त्यावरून गाडर बहुत बेइस्तिकलाल होऊन सुरतेस गेला. तेथोन मुंबईस जाणार. याप्रमाणें वर्तमान, बडोद्यांत पंतप्रधानांचे तरफेनें फतेसिंग गाइकवाडासमीप अप्रसिध ग्रहस्त आहे, त्यानीं येथील कारभाऱ्यास लिहून पाठविलें म्हणोन यैकिलें. पंतप्रधानाकडील स्नेहाचा सिलसिला फतेसिगानें अंतस्थ बहुत ठेविला आहे.

करनल गाडर सुरतेहून वसईस आला व तेथोन मुंबईस आला म्हणोन येथील मुतसद्याचे जुबानीं व खारिज यैकिलें.

सिपरीकोलारसेसमीप करनल मरेल जमीयतेसुधां होता तो माघारा गेला म्हणोन खारिज यैकिलें.

करनल गाडरानें अहमदाबाद शहरचें ठाणें फतेसिग गाइकवाडाचे स्वाधीन केलें व तेथील लोक आपलेसमीप आणविले व गाइकवाड मारानें पांच लाख रुपये गाडरास दिल्हे हेहीं वर्तमान खारिज यैकिलें.

श्रीनिवास

२

पुरवणी अखबार पुणें छ २१ शवाल सन ११९५.

करनल गाडर वसईस आहे व दोन कासाचे फासल्यानें डेरे दिधले व तोफा व दारू वगैरे जंगी सरजाम कल्याणीस पाठविला व तयारी होत आहे म्हणोन खारिज यैकिलें.

हैदरअलीखानाकडील ताजें वर्तमान आलें नांहीं. इंगरेजांचे तंबीस हजरत बंदगानआलीनी मुतवजे व्हांवें हा मार खान मारनुलेनें नूरमा खान व नरसिंगराव वकील व येथील कारपरदाजास लिहिला होता, याचा तपसील पूर्वील पत्रीं लिहून पाठविला आहे. कृष्टणराव बलाळ यांचे पुत्र गोविंदराव कृष्टण बारामतीहून पुण्यास आल्यानंतर

बालाजी जनार्दन यानीं नूरमा खान व नरसिंगराव यांस दरबारास बोलाऊन आणिलें व गोविंदराव कृष्टण यांचे रूबरू वकीलाकडून वर्तमान पुन्हां बयान करविला.

राजश्री गोविदराव कृष्टण दसऱ्यास बारामतीस होते. मार-नुलेस पालखी द्यावयाचा निश्चय जाहला होता. परंतु हाजर नव्हते याकरितां बारामतीहून येण्याची मार्गप्रतीक्षा होती. छ मारीं पंत-प्रधानानीं गोविंदराव कृष्टण यांस पैठणी मुंडासें व सेला दोन सनगें देऊन पालखी दिधली. सेवेसी श्रुत होय• बहुत काय लिहिणें हे विनती.

पैा छ १ माहे जिलकाद संन ११९५ हिजरी रोज शेनिवार डांकेवर मा दारोगे.

---

**A. R. No. 124**

२२ शवाल ११९५ हिजरी
११ आक्टोबर १७८१

पैा छ १ माहे जिलकाद सन ११९५ हिजरी रोज शेनिवार डांकेवर मै दारोगे.

श्री शंकर

विनंती विज्ञापना यैसी जे येथील कुशल ता छ २२ माहे शवाल मुा पुणे स्वामीचे कृपावलोकणेकरून येथास्थित जाणौन स्वानद लेखनआज्ञा करीत असिले पा. विशेष, येथील वर्तमान छ १७ माहे मार रोज शनवारी प्राथ:काली विनंतीपत्र सरकारचे डाकेसमागमे सेवेसी रवाना केले ते पावोन सविस्तर वर्तमान शृत जाले असेल. तदनतर येथील वर्तमान राजश्री हरीपत डेरे दाखल होऊन आहेत. हजारपाचसे स्वार डेऱ्याजवल जमा होऊन आहेत. लोकास ताकीद करून पाठवितात की सत्वर जमा व्हावे. नित्यशा लोकही से दोनसे जमा होऊन येत असतात. महिन्या दीडा महिन्या फौज जमा होईल.

शृत होये. राजश्री नाना हरीपताचे डेऱ्यास गेले होते. नानाचा व हरीपताचा खिलवत जाला. उपरातिक नाना आपले घरास आले. खलवताचा भाव की, फौज वगैर जमा करून पुढे स्वारीचा उद्योग सत्वर करावा. याअनवये जाला. शृत होये. दरबार वगैर जाला होता. लोकाची देन्याघेन्याची कामे वगैर जाली. शृत होये. छ १८ माहे माार रोज रविवार. करनेल गाडर इंग्रज सुरतेकडे होता. प्रस्तुत वर्तमान आले आहे की गाडर माार ममईस आला. कल्यानीस पलटने होती ते वसईस व ममईस गेली होती. मागती ते पलटने कल्यानीस गाडरानी ममईहून पाठविली. पलटने कल्यानीस आली व गाडरही कल्यानीस येणार. सत्वरच हगामा करणार यैसे वर्तमान आहे. दुसरे वर्तमान आहे की कल्यानीस पलटने याव(या)चे कारन की बेलापूर व कल्यान प्रातात साली तयार जाल्या आहेत, त्या कापून साली तयार करून ममईस नेनार. मागती तिकडील वर्तमान आलिया लेखन केले जाईल. कल्यानीस पलटने आली म्हणौन येथून कोकनप्राती रा बाजीपताची रवानगी करावी यैसी यौज्यना आहे. शृत होये. राजश्री कृष्टणरावजीनी कारभाऱ्यास लिहिले होते की रा हरीपत वगैर यास डेरे दाखल करावे. फौज वगैर जमा करावी. कारन की, येथील जाबसालास बल पडल याअनवये लिहिले होते. म्हणौन यैकिले. त्याजवरून हरीपत सत्वर डेरे दाखल जाले. फौज वगैर जमा जालियावर काही फौज व येखादा सरदार नेमून पंचमाहाल अथवा बेदर प्राताकडे रवाना करनार यैसी यौज्यना करितात. निश्चये होऊन रवाना केल्यास लेखन केले जाईल शृत होये. दरबार वगैर जाला होता. माली व मुलकी वगैर कामकाज जाले. शृत होये. छ १९ रोज सोमवार. श्रीमत परवतीस देवदर्शनास गेले होते. दर्शन करून सध्याकाली श्रीमत आपले वाड्यास आले. शृत होये. राजश्री नाना हरीपताचे डेऱ्यास गेले होते. नानाचा व हरीपताचा येक प्रहरपावेतो खिलवत जाला. उपरातिक नाना आपले घरास आले. खिलवताचा भाव यैकिल्यात आला की गाडर ममईस आला. पलटने वगैर कल्यानीस आली. कदाचित त्याने पुढे बोरघाटाकडे चाल केली तर त्याचे

शहास मातबर फौज पाठविली पाहिजे, याकरिता होलकरास व बाजी-पतास इग्रजाचे शहास कोकनप्राती रवाना करावे. याअनवये खिलवत जाला. आनिक कितीक आपले दौलतीचे बदोबस्ताविषई खिलवत जाला· शृत होये. होलकरही वाफगावास डेरे दाखल होऊन हरीपताजवल येणार. फौज वगैर जमा करनार. होलकर फौजेकरिता काही यैवज मागनार. याकरिता होलकराकडील नारो गनेश दिवान व पाराजीपंत येथे कारभाऱ्याजवल येनार. शृत होये. श्रीमत राजश्री दादासाहेब व फतेसिग गायेकवाडाची फौज व काही पलटने वगैर यैसा ज्यमाव करून कोडाईबारीकडे खानदेशप्राताकडे येणार यैसे व(र्त) मान आहे. दुसरे वर्तमान आहे की गाडर मार यानी कल्यानीस येऊन पुढे चाल केल्यास, तिकडे श्रीमत रा दादासाहेबानी कोडाईबारीकडे चाल करावी यैसा निश्चये जाला आहे म्हणौन वदंता आहे. मागती कल्यानी वगैरकडील वर्तमान आलिया लेखन केले जाईल. शृत होये. छ २० रोज मगलवार· हैदर नायेकासी व चिनापटनकर इग्रजासी लडाई मातबर जाली. नाईक मार याज-कडील मणुशे फार जाया जाली. इग्रज त्यावर काहीयेक गालिब आहेत. यैसे वर्तमान आहे शृत होये. नाईक मार याजकडील वकील कारभाऱ्याकडे आले होते. कारभाऱ्यासी व वकील मार यासी खिलवत जाला. हैदर नायेकास पत्रे लिहिली· शृत होये. राजश्री गोविदराव गायेकवाड दावडीस आहेत. त्याची काही उभा-रनी करावी यैसी यौज्यना करितात. गायेकवाड मार याचे दिवान-गिरीवर रा गनपतराव कोलटकर उभे केले. त्यानी काही साव-कारापासून यैवज घ्यावा, काही यैवज सरकारातून घ्यावा अन गायेक-वाड मार याची उभारनी करून, गुजरातप्राती पाठवावे यैसी यौज्यना करितात· निश्चये जाल्यास लेखन केले जाईल शृत होये. छ २१ माहे मार रोज बुधवार. सिद्यासी व इग्रजासी लडाई हिदुस्तान प्राती आहे. सिद्यानी काही

पुरवनी २

येक इग्रज जेर केले यैसे वर्तमान आहे. मागती तिकडील वर्तमान आलिया लेखन केले जाईल· शृत होये. राजश्री गोविदराव,

कृष्णरावजीचे चिरजीव, बारामतीस गेले होते ते येथे आले. शृत होये. याचे मसलतीचा विच्यार यैकिल्यात आला की हरीपतानी व होलकर वगैर यानी फौज जमा करून असावे. कोकनप्राती व कोडाईबारीकडे पंचमहाल वगैरकडे फौजा रवाना कराव्या. जिकडे मातबर शह पडल्यास तिकडे हरीपतानी शह द्यावा. नानानी पुन्यात राहावे अथवा बाहेर डेरे दाखल होऊन राहावे, यैसा विच्यार यैकिल्यात आहे. कोकनप्राती मातबर इग्रजाची गडबड न जाल्यास हरीपतानी सिधटेकापावेतो जावे यैसीही वदता आहे. शृत होये. पुढे अमवाशास ग्रहन आले आहे म्हणौन नाना दो ती दिवसानी मेणोलीस क्रिष्णातीरास जाणार. ग्रहन करून मागती सत्वरच येनार. हरीपंतही ग्रहनाकरिता तुळापुरास भीमातीरास जाणार यैसी वदता आहे. शृत होये. पुढे जे प्रसगाचे वर्तमान ध्यानास येईल, ते सेवेसी लेखन केल जाईल. सदैव आज्ञापत्री परामृश होत असावा. बहुत काय लिहिणे, कृपालोभ कीजे हे विज्ञाप्ती.

पैा छ १ माहे जिलकाद सन ११९५ हिजरी रोज शेनिवार डांकेवर मै दारोगा.

---

**A. R. No. 125** २४ शवाल ११९५ हिजरी

१३ आक्टोबर १७८१

पैा छ ३ माहे जिलकाद सन ११९५ हिजरी, रोज सोमवार चार घटका दिवस राहता मै डाकेवर मै दारोगा.

श्रीनिवास

पोष्य हैबतराव गोपाळ सां नमस्कार. विनती उपरी, येथील वर्तमान ता छ २४ शवाल, आश्विन वद्य येकादसी शनिवारपर्यंत मो पुणें स्वामीचे कृपेकरून क्षेम जाणून स्वानंद लेखनाज्ञा केली पाहिजे.

विशेष. कृपापत्र छ १८ माहे मारचें चिरंजीव राजश्री रघोतमराव यांचे लिफाफ्यासहित डांकेवर रवाना केलें तें छ २३ शवाली पाऊन बहुत संतोष जाहला. पूर्वी छ २२ माहे मारीं विनतीपत्र डांकेवर रवाना केलें तें दारोग्याचे विद्यमानें पावलें आसेल. सांप्रत इकडील वर्तमान पृथकपत्रीं लिहून सेवेसी पत्रें रवाना केली आहेंत व चिरजीवासही पत्र पाठविलें आहे. विजयादशमीचे दिवसी यजमानसाहबानीं कृपावंत होऊन, चिरजीवास खिताब राय व पांच सदी मनसब इनायत केली म्हणोन कृपापत्रीं लेखनाज्ञा होती. हा सर्व प्रताप स्वामीचा. याचें उतर पृथक विनतीपत्रीं लिहिलें आहे. तें पत्र चिरजीव सेवेसी प्रविष्ट करतील. श्रीमंत पंतप्रधान स्वामीवर यजमानसाहबांची कृपा व मुतवजे आहवाल होणें या उपयोगाचें साहित्य होईल म्हणोन पत्रीं लेखनाज्ञा होती हें वर्तमान बोलण्याचे प्रकरणी राजश्री बालाजीपंत नानासी मीं बोलिलों व हुजूरीहून श्रीमंत राजश्री राजेबाहादर भाऊसाहबांस खिताब बाहादरीचा व नौबत इनायत जाहली व स्वामीस नौबत इनायत जाहली हें वर्तमान सुचविलें. यावरून नानास संतोष जाहला व स्वामीचा स्तव येकनिष्ट व प्रमाणिक व श्रीमंताचे राज्याचे शुभचिंतक म्हणोन फार लोक इंगरेजांचे तबीस हुजूरीचा अज्म व्हावा व यांतच सलाहदौलत. याप्रकारें यथील कारभाऱ्यांचा खुलासा आहे. इंगरेजांसी मुकाबल्यांत इंगरेज अजीज होण्याची सलाह बालाजीपंत नानानी सांगितली. त्याचा विस्तार चिरंजीव राजश्री रघोतमराव यांचे पत्रीं लिहिला आहे. सेवेसी विनती करतील व हुजूर अर्ज करावया योग्य असलियां, स्वामीचे आज्ञेनुरूप करतील. बहुत काय लिहिणें हे विनती.

---

पैा छ ३ जिलकाद सन ११९५ हिजरी रोज सोमवार.

श्रीनिवास

अखबार पुणें अज इा छ २२ शवाल लगायत छ २४ माहे मार सन ११९५ हिजरी, आश्विन वद्य ११ शनिवार.

फतेसिंग गाइकवाडानें करनल गाडराचे मनोदयानुरूप सिपरीकोलारसचे इंगरेजांची कुमक करून माहदाजी सिंद्याची तंबी करावी किंवा खानदेशांत जाऊन मुलुक काबीज करावा, हे दोन्हीं मतलब कबूल केले नांहीत याकरितां गाडर नाखुष होऊन बडोद्याहून डबईस गेला. गाडराची खातरदारी जरूर जाणून, फतेसिंगानें पांच लाख रुपयेपर्यंत देऊन गाडराची फहमायश केली व गाडर माार सुरतेस आला. व तेथोन वसईस आला व डेरे वसईहून दोन कोसावर उभे केले व तोफा वगैरे जंगी सरजाम कल्याणीस पाठविला, हे तहकीक खबर व माहदाजी सिंद्याचे रुखावर इंगरेजांचीं पलटणें होतीं, तें बमोजिब करार यमुनेचे रुखें माघारा गेलीं हे खारिज यैकिल्याप्रमाणें व यावितरिक्त अवांतर वर्तमान लिहून छ २२ माहे मारीं डांकेवर हुजूरअर्जी व आखबार व स्वामीचे सेवेसी पत्र पाठविलें तें पाऊन वर्तमान श्रुत जाहलें आसेल. त्याउपरी यैकिलें व प्रत्यक्ष वर्तमान दफेवार हुजूर व स्वामीचे सेवेसी लिहिलं आहे.

सिपरी व कोलारसेसमीप माहदाजी सिद्यांचे मुकाबिल इंगरेजांचीं पलटणें आहेत. तें बमोजिब करार यमुनेचें रुखें माघारा गेलीं म्हणोन खारिज यैकिल्याप्रमाणें लिहिलें होते. छ २३ रोजी बालाजी जनार्दन यांचे जुबानी व सिंद्याकडील वकीलाचे जुबानीं यैकिलें कीं इंगरेज भरेल वगैरेनी करार आठरा दिवसाचा म्हणजे छ १० शवालीं कूच करून माघारा यमुनातीर कालपीस जांवें म्हणोन केला आहे. त्याप्रमाणें छ १० शवालीं कूच करून जातील म्हणोन माहदाजी सिंद्याची वजिनस पत्रें आलीं. त्यापक्षीं इंगरेजांचीं पलटणें कूच करून माघारा गेलीं हें खारिज वर्तमान गलत आहे.

छ २३ रोजी बालाजीपंतानीं सेवकास तकरार सांगितलें की कासीहून राजे चेतसिंग जमीदाराचें पत्र पंतप्रधानांचे नावचें आलें. त्यांत लिहिलें आहे की मेस्तर हिस्तैनानें आपल्यासी बदमामली केली. याकरितां आम्हीं आपले जबरदस्तीनें त्याचे हमराही लोकांस सजा वाकई पोंहचाऊन रामगडास आलों. हिस्तैन माार बेइस्तकलाल होऊन कासीहून निघोन जात होता. हें वर्तमान कळल्यानंतर फौज पाठऊन

चिन्हारगडासमीप गांठ घातली व हिस्तैन माारास माहासरा केला आहे. याप्रमाणें चेतसिगानें माहदाजी सिंद्यासही लिहिलें होतें. कुमकी फौज पाठवणें म्हणून लिहिलें, त्यावरून सिद्याकडील दोन हजार स्वार व बाळाजी गोविद बुंदेले वगैरे च्यार हजार, येकोन साहा हजार स्वार व प्यादे मिळोन कुमकेस गेले. सिंदे माारानीं कारपरदाजास लिहिलं आहे कीं चेतसिगाचें पत्र आल्यानंतर सागर व मिरजापुरीहून वर्तमान आलें कीं मेस्तर हिस्तैनास चेतसिंगानें दस्तगीर केलें. थेट कासींचें पत्र येऊन वर्तमान कळावयाची इंतजारी आहे. याप्राा बालाजीपंताचे जुबानीं यैकिलें.

२

पुरवणी आखबार छ २८ शवाल सन ११९५ हिजरी, शनिवार.

येथील कारपरदाजाचे चितांत आहे कीं माहदाजी सिद्याचे कुमकेस किवा सुरतप्रांती फौजेची रवानगी करावी. त्यास सांप्रत करनल गाडर वसईस आला व तोफा वगैर जगी सरजामाची तयारी कल्याणीस होत आहे. यावरून येथील कारपरदाजास संशय उत्पन्न जाहला आहे कीं गाडर कोणते रुखें जातो. बोरघांटाचा रुख केल्यास, तेळेगांवीहून त्याचे रुखावर घांटाखालें फौज पाठवणें जरूर. सुरतेकडें गाडरास जावयाचें प्रयोजन नांहीं. तत्रापी गेला तरी सुरतेचे रुखें फौजा पाठवणें लागतील. सिपरीकोलारस किंवा कासीकडील रुख आथवा चिनापटणवाल्याचे कुमकेस गाडर गेला तरी पंतप्रधानांचे तरफेनें मातबर सरदार व दाहापंधरा हजार फौज माहदाजी सिंद्यासमीप पाठऊन देऊन, सिंदे व पंतप्रधानाकडील सरदार मुतफिक होऊन, ज्या ज्या स्थलीं इंगरेजांचे लोक असतील त्यांस खारिज करून, मकानें घेऊन कासीपर्यंत जातील. सदरहू आन्वय कारपरदाजाचे जुबानीं यैकिल्याप्रमाणें लिहिला आहे.

अहिल्याबाईकडें बाबूराव वैद्य गेला होता तो आला व बाई माारकडील कांहीं पैगाम आणिला आहे म्हणोन पूर्वी लिहिलें होतें. या कामाचे उतर प्रत्योतराकरितां तुकोजी होळकराचे कारपरदाज

नारो गणेश व पाराजीपंत छ २२ शवालीं पुण्यास येऊन रो बालाजीपंत व हरीपंतास भेटले व हरीपंतासमीप लश्करांत उतरले आहेत.

शाहजी भोंसले आकोलकोटवाले याचे तरफेचा सरदार उमदा दोनतीनसे स्वारानसीं छ २२ माहे मारीं पुण्यास आला. बालाजीपंत इस्तकबालाकरितां गेले होते.

मालोजी घोरपडे यांसी व कारपरदाजासीं जाहिरा नोकर व खावंदीचा सिलसिला चितांतून परस्परें निफाक आहे. घोरपडे मार यांची खातरदारी व तलबतनखाचे रुपये प्रतिवर्षाप्रमाणें साल मारी देऊन त्याची समजाविश कारपरदाज करीत नांहींत.

पैा छ ३ जिलकाद संन ११९५ हिजरी रोज सोमवार चार घटका दिवस राहता डांकेवर मै दारोगा.

---

**A. R. No. 126**

२५ शवाल ११९५ हिजरी
१४ आक्टोबर १७८१

पैा छ ३ जिलकाद संन ११९५ हिजरी रोज सोमवार चार घटका दिवस राहता मै दारोगा डांकेवर.

श्री शंकर

विनंती विज्ञापना यैसी जे यथील कुशल ता छ २५ माहे शवाल मुा पुणे, स्वामीचे कृपावलोकणेकरून येथास्थित जाणौन स्वानंद लेखनाज्ञा करीत असिले पा. विशेष येथील वर्तमान छ २२ माहे मार रोज गुरुवारी प्राथःकाली विनंतीपत्र सरकारचे डाकेसमागमे सेवेसी रवाना केले ते पावोन सविस्तर वर्तमान शृत जाले असेल. तदनतर यथील वर्तमान राजश्री माधवराव नीलकंठ पुरधरे यास बोलाऊ पाठविले आहे की त्यानी श्रीमताजवल असावे. दुसरे, हरीपंत बाहेर निघाले आहेत, याजवल सरदार म्हणौन राहावे. फौजेचा सलाम मुजरा घेत जावा. म्हणौन माधवराव नीलकठ यास अना-वयास पाठविले आहे. मग ते येतात न येतात हे पाहावे. परंतु

येणार नाहीत यैसे दिसते. कारन की रा वज्याबा अरगलेत आहेत याकरिता येणार नाहीत यैसे आहे. मग आलियावर लेखन केले जाईल. शृत होये. राजश्री नाना हरीपताचे डेऱ्यास गेले होते. नानाचा व हरीपताचा च्यार घटका खिलवत जाला. उपरातिक नाना आपले घरास आले. खिलवताचा भाव यैकिल्यात आला की इग्रज वगैर कल्यानीवर आले. पुढे ते चाल करनार म्हणौन त्याचे पारपत्यास फौजा वगैर रवाना कराव्या. दुसरे, राजश्री कृष्टणरावजीकडे पत्रे वगैर लिहिणार. याअनवये खिलवत जाला. शृत होये. छ २३ रोज शुकरवार इग्रजाची पलटने कल्यानीस आली. वर्तमान आहे की, दोन तीन पलटने कल्यानीहून दोन कोस पुढे विठलवाडीवर आली. करनल गाडर खासा वसईस आहे. तोही वसईहून निघून कल्यानीस येणार. कल्यानीस आलियावर पुढे बोरघाटाकडे उद्योग करनार यैसी वदंता आहे. शृत होये. करनल गाडर वसईस आहे. तीनच्यार पलटने कल्यानी वगैरेस आहेत. आनिक ज्यमाव करून करनल वसईहून कल्यानीस येणार. आलियावर पुढे चाल करनार. त्याजवरून राजश्री बाजीपंत वगैर याची रवानगी करनलचे शहावर करनार. रवानगी केलियावर लेखन केले जाईल. दिपवाली जालिया हरीपतही येक कोसाचे कूच करून खडकीवर मुकाम करनार. कारन की इग्रजावर शह पडावा यैसे आहे. शृत होये. कोल्हारसिपरीवर इग्रज होते त्यासी व सिद्यासी लडाई होती. प्रस्तुत वर्तमान आहे की ते इग्रज जेर जाले. त्यानी काही सिद्यासी दारमदार करून माघारा गेले. परतु त्याचे पाठीमागे सिद्याच्या फौजा लागल्या आहेत यैसे वर्तमान आले आहे. शृत होये. शाहाजी भोसले अकलकोटकर याचे पुत्र येथे आले. कारभाऱ्याच्या व त्याच्या भेटी जाल्या. व श्रीमताची व त्याची भेट होनार शृत होये. दरबार वगैर जाला होता. माली व मुलकी वगैर कामकाज जाले. शृत होये. छ २४ माहे माार रोज शनवार. होलकराचे दिवान रा नारो गनेश येथे आले आहेत. कारन की फौजेचे खर्चाकरिता काही यैवज मागावा येविशई कारभाऱ्यासी रदबदली करितात. लक्ष दोन लक्ष रुपये होलकरास प्रस्तुत खर्चास देनार. नारो गनेश येथून

वाफगावास गेलियावर होलकर डेरे दाखल होऊन हरीपताकडे येणार यैसे वर्तमान आहे. शृत होये. राजश्री कृष्णरावजीनी येज्यमानसाहेबाची मुलाजमत केली व दोनतीनदा खिलवत जाला. बहुतच रहशाचे भाशने जाली यैसे वर्तमान येथे आले. त्याजवरून कृष्णरावजीस पत्रे लिहिनार व येज्यमानसाहेबासही कारभारी अर्ज्या लिहिणार. शृत होये. कृष्णरावजीचे चिरजीवास कारभाऱ्यानी श्रीमताकडून पालखी देविली. शृत होये. नाना ग्रहनाकरिता मेणोलीस जाणार होते. प्रस्तुत जात नाहीत यैसे वर्तमान आहे. गेलियावर लेखन केले जाईल. शृत होये. नाना हरीपताचे डेऱ्यास गेले होते नानाचा व हरीपता (चा) खिलवत जाला. उपरातिक नाना आपले घरास आले. वर्तमान आहे की दिपवाली जाल्यावर नानाही डेरे दाखल होनार. जालियावर लेखन केले जाईल शृत होये. इग्रजाची लाहान पचवीस तीन गलबते वसईस येत होती. वाऱ्याचे तुफान सुटले यामुले त्या गलबतातील पाचच्यार गलबते पान्यात बुडाली यैसे वर्तमान आले आहे. शृत होये. पुढे जे प्रसगाचे वर्तमान ध्यानास येईल ते सेवेसी लेखन केले जाईल शृत होये. छ १४ माहे मारचे आज्ञापत्र सरकारचे डाकेसमागमे सादर केले ते छ २३ माहे मारी पावले. पावोन बहुत संतोश जाला. सदैव याचप्रकारे आज्ञापत्रे सादर करनार स्वामी समर्थ. बहुत काय लिहिणे. कृपालोभ कीजे हे विज्ञाप्ती.

---

**A. R. No. 127** २७ शवाल ११९५ हिजरी

१६ आक्टोबर १७८१

पैा छ ६ माहे जिलकाद सन ११९५ हिजरी, गुरवार दोन घडी दिवस राहता मै डांक सरकार.

श्रीनिवास

पोष्य हैबतराव गोपाळ सां नमस्कार. विनती उपरी येथील वर्तमान ता छ २७ शवाल, आश्विन वद्य चतुर्दसीपर्यंत मो पुणें,

स्वामीचे कृपेकरून क्षेम जाणून स्वानंद लेखनाज्ञा केली पाहिजे. विशेष पूर्वी छ २६ माहे माारीं हुजूरअर्जी व अखबार व स्वामीचे सेवेसी विनतीपत्र डांकेवर रवाना केलें, तें दारोग्याचे विद्यमानें हुजूर व स्वामीस पाऊन वर्तमान श्रुत जाहलें असेल. त्यानंतर यैकिलें वर्तमान पृथक पत्रीं लिहून सेवेसी व हुजूर सांप्रदायाप्रमाणें पत्रें पाठविलीं आहेंत. सुरापूरकर बेडराचे वकील आले आहेत व श्रीमंत पंत-प्रधानांचीं पत्रें व कारकून समागमें नेऊन सुरापूरकरास श्रीमंत पंत-प्रधानांचे भेटीस आणनार हें वर्तमान पूर्वी दोनतीन वार हुजूर व सेवेसी लिहिलं आहे. सांप्रत यैकिलें कीं पत्रें सिध होऊन वकीलाचे स्वाधीन जाहलीं व छ १ किंवा दुसरे जिलकादीं पुण्यांहून स्वार होऊन जाणार. वकील स्वार होऊन गेल्यानंतर हुजूरचे अखबारेंत लिहीन. प्रस्तुतचे अखबारेंत वर्तमान लिहिलं नांहीं. रियासती कामाचा बंदोबस्त प्रथम जबरदस्ती. दुसरा मार्ग, काबू पाहून बंदोबस्त करावा. सांप्रत कृष्टणरावजी हुजूर आले आहेत. रावजीचे बोलण्यांत हुजूर-चे दौलतख्वाह व दूरअंदेश सलाहकार यकता आपण आहोंत व याच-प्रमाणें अर्जमारूज केला असेल व करतील. परंतु दुनवी मकार हिला रावजीस बहुत हिफज आहे. गोविंदराव तरी निवड उभयतां सांप्रतचे प्रसगी आले आहेत. ज्यांत हुजूरचे कामाचा बंदोबस्त व रफा होय, त्याप्रमाणें समयोचित सलाहवक्त जाणून हुजूरचे मसीर व बानीकार करारमदार करतील व करावा, यैसें सेवकाचे कयासांत येत आहे. बहुत काय लिहिणे हे विनती.

---

पैाा छ ६ जिलकाद सन ११९५ हिजरी, गुरवार दोन घटका दिवस बाकी मै डांक सरकार.

श्रीनिवास

अखबार पुणें अज इाा छ २५ शवाल लगायत छ २७ माहे माार सन ११९५ हिजरी, आश्विन कृष्टण मंगळवार.

सिपरीकोलारसेसमीप इंगरेजांची पलटणें माहदाजी सिंद्यांचे मुका-

बिल्यास आहेत· त्यानीं गोहदकर जाटाचे मारफतीनें करार केला आहे कीं अठरा दिवसांत छ १० शवालपर्यंत कूच करून माघारा यमुनातीरास जाऊं म्हणोन बाळाजीपंताचे जुबानीं यैकिलें व करनल गाडर सुरतेस येऊन तोफा वगैरे जगी सरंजाम कल्याणीस पाठविला आहे. गाडर मार कोणते रुखं हरकत करितो याचा निश्चय कळल्याप्रमाणें पंतप्रधानांचे कारभारी फौजेची रवानगी करनल गाडराचे रुखावर किंवा माहदाजी सिंद्याचे कुमकेस पाठवणार· याजवितरिक्त अवांतर वर्तमानासहित छ २५ माहे मारीं अखबार व अर्जी हुजूर व स्वामीचे सेवेसी पत्र डांकेवर रवाना केलें तें दारोग्याचे विद्यमानें पाऊन वर्तमान श्रुत जाहलें असेल. सांप्रतचें यैकिलें व प्रत्यक्ष वर्तमान लिहिलं असे.

सिपरीकोलारसेसमीप करनल मरेल इंगरेजांचा सरदार पलटनासुधां आहे. त्याचा व माहदाजी सिंद्याचा करार अठरा दिवसानंतर माघारा यमुनातीरास इंगरेजानीं जावें म्हणोन गोहदकर जाटाचे विद्यमानें करार जाहला होता. सांप्रत माहदाजी सिंद्याची पत्रें येथील कारपरदाजास आलीं· त्याचा खुलासा हरीपंताचे जुबानीं व खारिज यैकिला कीं इंगरेजानीं माघारा जातों म्हणोन करार सिंद्यासी केला होता तो दगाबाजीचा केला. प्रस्तुत माघारा जात नांहींत· अठरा दिवसाचे फुरसतींत रसद वगैरे सरजाम पोख्त केला व सांप्रत लढाईस मुस्तैद जाहला आहे. सिदे मारानी बुनगें अलाहिदा करून जरीदा जाहले व दसऱ्यानंतर कूच करून इंगरेजांचे मुकाबिल्यास जाणार.

कासीकडील खबर पूर्वीं लिहिल्याप्रमाणें गोरनर मेस्तर हिस्तैन यास चिन्हारगडासमीप चेतसिगानें माहासरा केला आहे म्हणोन कलमी खबर कासीहून आली. व सागर मिरजापुरीहून वर्तमान आले की गोरनर मिस्तरास चेतसिगानें दस्तगीर केलें· कासीहून दुसरी पत्रें तहकीक बातनींची अजीपर्यंत आली नांहींत.

हैदरअलीखानाकडून ताजी खबर आली नांहीं.

बालाराव, सिंद्याचे दिवाण, काहले व आजारी होते. सबब लष्करीहून उजनीस आले. तेथें शात जाहले म्हणोन तहकीक खबर आली.

छ २६ माहे मारी पंतप्रधानांची स्वारी पर्वतीस गेली होती. हरीपंत व कृष्टणराव बळवंत हमराह होती. दरवेशानी वाघ धरून आणिले. त्यापैकीं येके वाघास खांबास जंजीर बंद करून त्याजवर हाती घातले. दाहाबारा हाती हमला करून पळाले. दोन हाती शेर होते. यानीं वाघाचे पोटावर पाय देऊन वाघास मारले. पंत-प्रधानांची स्वारी हवेलीस आली. हरीपंत डेऱ्यास गेले.

(अपूर्ण)

---

**A. R. No. 128**

२८ शवाल ११९५ हिजरी
१७ आक्टोबर १७८१.

पैा छ ६ माहे जिलकाद सन ११९५ हिजरी रोा गुरवार, वख्त दोन घडी दिवस बाकी मै जोडी डांक सरकार.

श्री शंकर

विनंती विज्ञापना यैसी जे यथील कुशल ताा छ २८ माहे शवाल मुाा पुणे, स्वामीचे कृपावलोकणेकरून येथास्थित जाणौन स्वानंद लेखनआज्ञा करीत असिले पाा. विशेष, येथील वर्तमान छ २५ माहे मार रोज रविवारी प्राथःकाली विनंतीपत्र सरकारचे डाकेसमागमे सेवेसी रवाना केले, ते पावोन सविस्तर वर्तमान शृत जाले असेल. तदनतर यथील वर्तमान राजश्री नाना हरीपताचे डेऱ्यास गेले होते. नानाचा व हरीपताचा खिलवत जाला. उपरातिक नाना आपले घरास आले. खिलवतीचा भाव यैकिल्यात आला की, कल्या-नीस पलटने आली. गाडर वसईस आहे. तोही कल्यानीस येणार. त्याचे शहावर फौज पाठवावी. दुसरे कितीक आपले दौलतीचे बदोबस्ताविशई खिलवत जाला. शृत होये. होलकर वाफगावाहून डेरे दाखल होऊन हरीपताकडे येणार. परतु होलकराचे दिवान

नारो गनेश येथे कारभान्याजवल यैवज मागावयास आले आहेत. यास यैवज दिल्यानतर होलकर डेरे दाखल होऊन हरीपताकडे येणार यैसे वर्तमान आहे. शृत होये. छ २६ रोज सोमवार. राजश्री हरीपंत डेरे दाख(ल) जाले म्हणौन करनेल गाडर इग्रज सुरतेहून वसईस आला. वसईस आलियानतर गाडर मार याने वसईचे बाहेर डेरा दिल्हा. तीनच्यार पलटने कल्यानीस पाठविली. पुढे तो डेरे दाखल होऊन कल्यानीस येणार. कल्यानीस आलियानतर ज्यमाव करून बोरघाटाकडे यणार. यैसे वर्तमान आले आहे. पलटने वगैर कल्यानीस आली. गाडरही वसईहून कल्यानीस येणार. म्हणौन त्याचे शहावर येथून रा बाजीपंत वगैर यासमागमे फौज देऊन रवाना करावे यैसी यौज्यना आहे. शृत होये. येका दो दिवसानी हरीपंत येका कोसाचे कूच करून खडकीचे पुलावर मुकाम करनार. तले-गावचे रुखावर यैसे आहे. कूच केलिया लेखन केले जाईल. शृत होये. राजश्री बाजीराव बरवे व सटोजी भोसले वगैर हे श्रीमत राजश्री दादासाहेबाजवल आहेत. त्यास वर्तमान येथे आले आहे की रा बाजीराव बरवे व सटोजी भोसले वगैर दोनतीन हजार फौज व तीन च्यार पलटने या सरजामानसी सुरतेहून निघून कोडाईबारीकडे येतात. कोडाईबारी चहडून खानदेशात येणार यैसे वर्तमान आले आहे. त्याजवरून कारभान्यानी यौज्यना केली आहे की रा गनेशपंत बेहेरे खानदेशप्राती आहेत, त्याजकडे फौज पाठऊन कोडाईबारी-कडे रवाना करनार. फौज वगैर जमा जालियानतर रवाना करतील यैसे आहे. शृत होये. राजश्री गोविदराव गायेकवाड याची उभारनी करून फौज वगैर देऊन गुजरात प्राती रवाना करणार हे पूर्वी लेखन केले होते, त्याजवरून शृत जाले असेल. गायेकवाड मार याचे दिवानगिरीवर रा गनपंतराव कोलटकर उभे राहिले. त्यानी काही लक्ष दोन लक्ष रुपये सावकारापासून घेऊ(न), काही लाख पनास हजार रुपये सरकारातून देऊन गायेकवाड मार याची उभारनी करून, फौज वगैर देऊन, गुजरात प्राती रवाना करावे यैसी यौज्यना आहे. उभारनी करून रवाना केल्यास लेखन केले जाईल. शृत होये. दरबार वगैर

जाला होता. माली व मुलकी वगैर कामकाज जाले. शृत होये. छ २७ रोज मगलवार. भडोचकर इग्रज दोनतीन पलटनानसी वसईस गाडराकडे मदतीस येणार यैसे वर्तमान आहे. शृत होये. कोल्हार-सिपरीस हिदुस्तान प्राती इग्रज आहेत. त्यासी व सिद्यासी लडाई आहे. काहीयेक ते इग्रज जेर जाले. जेर होऊन माघारा गेले. त्याज (स) मागमे सिद्याची फौज लागली आहे यैसे वर्तमान आहे. मागती तिकडील वर्तमान आलिया लेखन केले जाईल. शृत होये. पुन्यातील सावकार गुजरातीच आहेत. त्याच्या दुकाना ममईस व सुरतेस आहेत. इग्रजाचे बिघाडामुले ममईचा व सुरतेचा माल येथे येत नाही व येथील माल तिकडे जात नाही व हुडचा वगैर होत नाही. यैसे पाचच्यार वर्शे जाले आहे. कारभाऱ्यानी चौक्या वगैर ठेऊन हुडी वगैर होऊ देत नाहीत. चोरून हुडी केली त्यास सिक्षा करितात. यामुले गुजराती सावकार आज अवघे बाहेर निघून गेले. मग त्याची काये समजुती करून आनतील हे पाहावे. शृत होये. दसऱ्याचे दिवसी येज्यमानसाहेबानी कृष्णरावजीचा बहुत सन्मान केला. मोत्याची कठी वगैर इनायेत केली यैसे वर्तमान आले आहे. शृत होये. पुढे जे प्रसगाचे वर्तमान ध्यानास येईल ते सेवेसी लेखन केले जाईल. शृत होये. बहुत काये लिहिणे. कृपालोभ कीजे हे विज्ञाप्ती.

---

**A. R. No. 129**

३ जिलकाद ११९५ हिजरी

२१ आक्टोबर १७८१

पैा छ ११ माहे जिलकाद संन ११९५ हिजरी रोज आदित्यवार डाकेवर मै दारोगा.

श्रीनिवास

पोष्य हैबतराव गोपाळ सां नमस्कार. विनती उपरी येथील वर्तमान ताा छ ३ जिलकाद, कार्तिक शुध रविवारपर्यंत मो पुणें

स्वामीचे कृपेंकरून क्षेम जाणून स्वानंद लेखनाज्ञा केली पाहिजे. विशेष कृपापत्र छ १८ शवालचें पाठविलें तें छ २९ माहे मारीं पाऊन संतोष जाहला. विनतीपत्र पूर्वी छ २८ शवालीं पाठविलें तें दारोग्याचे विद्यमानें पाऊन वर्तमान हुजूर व सेवेसी श्रुत जाहलें असेल. सांप्रत छ ३ जिलकादपर्यंत पत्रें लिहून सांप्रदायाप्रमाणें हुजूरअर्जी व अखबार व पृथक पत्रीं हिदवींत राजकी वर्तमान लिहून डांकेवर सेवेसी पाठविलीं आहेत. दारोग्याचे विद्यमानें हुजूर व स्वामीचे सेवसी पत्रें पावतील. चिरजीव राजश्री राय रघोतमराव यांचे नांवचा लिफाफा सेवेसी पाठविला, तो चिरजीवास पावेल. सृष्टीचा कारभार सर्व काबूची आहे. इंगरेज बदमामली व सांप्रत माहदाजी सिंद्यांसीं इंगरेजानीं करार केला होता कीं अठरा दिवसांत माघारा जातों. व त्या संधीत गला व जगी सरजाम जमा करून, पुन्हा बदकौलीची गोष्ट सांगतात कीं सुरतेस जातों, मार्ग देणें. त्यास यथील मंडली बेइमान व काबूची. यांस इंगरेज गुरू भेटले आहेत. पूर्वी रुकनदौला मरहुमानी स्वामीस पुरंदरास पाठविलें ते समईं आपणासीं काय सलूक जाहला व त्या उपरी कृष्टणरावजी शहरास येऊन मिनतवार सतरा लाखाची जागीर दिधली. येथील मंडलीची रीती सर्व स्वामीस विदित आहे. प्रसगोचित चिरजीव विनती करतील व कांहीं मार हुजूर विनती करावयाचा असलियां स्वामीस श्रुत करून आज्ञेप्रमाणें यजमानसाहेबांचे सेवेसी विनती लिहिल्यांत येईल. हरकारे मुलाजम सरकार सेवकाचे तैनाती दाहा जोड्या. यांचा सालझाड्याचा हिशोब पूर्वी सेवेसी पाठविला आहे. त्याचे पावतीचें उतर प्राप्त जाहलें नांहीं. यास्तव विनती जे कृपा करून हिशोब पावल्याचें प्रत्योतर पाठविलें पाहिजे. सविस्तारें वर्तमान चिरजीव सेवेसी विनती करतील. बहुत काय लिहिणें हे विनती.

---

श्रीनिवास

अखबार पुणें अज इ॥ छ २८ शवाल लगायत छ ३ जिलकाद, रविवार कार्तिक शुध ५.

सिपरीकोलारसेसमीप इंगरेजांची पलटणें आहेत. त्यानीं गोहदवाल्याचे मारफातीनें करार केला होता कीं छ १० शवालपर्यंत माघारा यमुनातीरास जातों, तोपर्यंत परस्परें मुजाहिम न व्हावें. सिंद्यानीं कबूल केला. इंगरेजानीं अठरा दिवसाचे अवकाशांत गला वगैरे सरजाम करून पुन्हा लढाईस सिध्द जाहले. व सुरतेस जावयाकरितां मार्ग देणें म्हणोन पैगाम केला म्हणोन व अवांतर वर्तमानासहित हुजूरअर्जी व अखबार व स्वामीचे सेवेसी पत्र पाठविलें तें पाऊन वर्तमान श्रुत जाहलें असेल. त्या उपरी प्रत्यक्ष व यैकिलें वर्तमान दफेवार लिहिलं असे.

सिपरीकोलारसासमीप इंगरेजांची पलटणें आहेंत. त्यानीं सिवाजी विठल यांचे विद्यमानें माहदाजी सिंद्यास सांगोन पाठविलें कीं माघारा यमुनातीरास जातों म्हणोन तुम्हासीं करारमदार करून आम्हीं आपले सरदारास लिहून पाठविलें. त्याचा ज्वाब आला कीं सिंदे यासीं लढाई हरगिज न करणें. व पंतप्रधानांचे तालुकियास घांसलकडीचाही उपसर्ग लागू न देतां बतरीक सवदागर सुरतेस जाणें. खावंदाचा उदुलहुकुम करावयाचा सांप्रदाय नाहीं. यास्तव आम्हीं सुरतेस जातों, तुम्हीं मुजाहिम न होणें. याप्रमाणें बदमामली व बदकौलीची गोष्ट यैकोन, माहदाजी सिंदे पुन्हा लढाईस मुस्तैद जाहले आहेत म्हणोन खारिज वर्तमान यैकिलें.

करनल गाडर वसईस आहे व जंगी सरजाम कल्याणीस पाठविला आहे. हें वर्तमान पूर्वील पत्रीं लिहिलें आहे. सांप्रत यैकिलें कीं जंगी जाहाजांची तयारी गाडर मार करीत आहे. तळेघोसांळेसमीप पंतप्रधानांकडील लोकासीं व हबसियासीं कांहीं करारांत तफावत आला. यास्तव लढाई सुरू आहे म्हणोन वर्तमान यैकिलें.

हैदरअलीखान कंचीसमीप चिनापटणवाले इंगरेजांचे मुकाबिल्यास मुस्तैद जंग आहे. व हजरत बंदगानआलीनीं इंगरेजांचे तंबीस मुतवजे मोहीम व्हावें म्हणोन बालाजीपंत वगैरे कारपरदाजास लिहिलं आहे. मुधोजी भोंसल्यानीं कायद्याप्रमाणें पंतप्रधान व येथील कारपरदाजांस दसऱ्याबाा वस्त्रें सुतरस्वारासमागमें पाठविलीं आहेंत.

छ २८ शवालीं सूर्यग्रहणाचा नेम जोस्यानी सांगितला. त्यावरून सर्व जन व बालाजीपंत व हरीपंत मुठा नदीचे तीरीं डेरे होऊन स्नान व दानार्थ बसले होते. वीस घटका दिवसानंतर स्पर्श व चोवीस घटकानंतर मुक्त म्हणोन संकेत होता. चोवीस पंचेवीस घटकापर्यंत स्पर्शाची मार्गप्रतीक्षा केली. त्यानंतर स्नान व दान न करीतां भोजन करून शहरांत आले.

श्रीनिवास

२

पुरवणी अखबार पुणें छ ३ जिलकाद सन ११९५ हिजरी

करनल गाडरानें कल्याणीस जगी सरंजाम पाठविला वजगी जाहाजांची तयारी करितो. याकरितां येथील कारपरदाजानीं तजवीज केली आहे कीं तळेगांवास दोनतीन हजार गाडदी व पांच तोफा व सखाराम येशवंत पानसे निा तोफखाना यांस पाठऊन द्यावें.

सुरापूरकरांचे वकील पंतप्रधानांचे पत्रासहित येकादोन दिवसां पुण्याहून सुरापुरास जाणार. पंतप्रधानांचे तरफेनें माधवराव सदासिवाकडील कारकून जाणार आहे. सेवेसी श्रुत होय. हे विनती.

पैा छ ११ माहे जिलकाद संन ११९५ हिजरी रोज आदित्यवार.

---

**A. R. No. 130** — ७ जिलकाद ११९५ हिजरी
२५ आक्टोबर १७८१

पैा छ १५ माहे जिलकाद सन ११९५ हिजरी रोज शेनिवार डांकेवर मै दारोगा.

श्रीनिवास

पोष्य हैबतराव गोपाळ सां नमस्कार. विनती उपरी. येथील वर्तमान ताा छ ७ माहे जिलकाद, कार्तिक शुध नवमी गुरुवारपर्यंत मो पुणें स्वामीचे कृपेकरून क्षेम जाणून स्वानंद लेखनाज्ञा केली

पाहिजे विशेष. पूर्वी छ ८ माहे मारीं हुजूरीअर्जी व अखबार व स्वामीचे सेवेसी पत्र डांकेवर पाठविलें तें पाऊन वर्तमान श्रुत जाहलें असेल. त्या उपरी नवल विशेष यैकिलें वर्तमान पृथक पत्रीं सविस्तारें लिहिलें आहे. व हुजूरअर्जी व अखबार लिहून डांकेवर पत्र व अर्जी व अखबारेचा लिफा(फा) रवाना केला. दारोग्याचे विद्यमानें हुजूर व स्वामीचे सेवेसी पत्रें पावतील. इंगरेजांचे मोहिमेंत हैदर-अलीखानांस सफर व लढाई तूल पडली. परंतु नफा व साहबहिमत याची प्रसित्ध जाहली व इंगरेजानीं खुष्कींत प्रवेश केला आहे त्यांची तंबी व्हावी हा यैन खुलासा खान मा़राचा होता. परंतु पंतप्रधाना-कडील प्रतिवर्षी वेध, याकरितां लाइलाज होता. पंतप्रधानाचा दारमदार जाहल्यानंतर खान माारानें अज्म केला व अद्याप मोहीम सरीर व लढाई करीत आहे व प्रांत बहुत संपादिला. पंतप्रधानांची इप्तदायपासून नुकसानीं. साष्टीचा किला घेतला. त्या उपरी जंबूसर वगैरे माहाल व बारा लाख रुपये करनल इपटैनचे विद्यमानें कारपरदाजानीं दिल्हे. त्या उपरी अहमदाबाद व गुजरात प्रांत गेला व सिबंदीचे तह हरखर्चांत आले. यास्तव येथील कितेक दूरअंदशा करणाऱ्यानी केला आहे कीं जातीनें मातबर व पोख्त जंगी सरजाम ज्याजपासीं आहे तो इंगरेजांसी बार येईल. दुसऱ्याचे कुमकेची आशा करून इंगरेजांसीं बिगाड केल्यास परिणाम ठीक नांहीं. यैकिली चर्चा सेवेसी लिहिली आहे. बहुत काय लिहिणें हे विनती.

---

पैाा छ १५ माहे जिलकाद सन ११९५ हिजरी रोज शेनिवार.

श्रीनिवास

अखबार पुणें अज इाा छ ४ जिलकाद लगायत छ ७ माहे मार सन ११९५ हिजरी, गुरुवासर.

करनल गाडर वसईस जंगी जाहाजांची तयारी करितो व तळेगांवास पंतप्रधानांचे तरफेनें सखाराम पानसे व गाडदी व कांहीं तोफा जाणार. तळेघोंसांळ्यासमीप हबसी यांची व पंतप्रधानाचे जमीयतेसीं लढाई

जाहली. हबसी गालिब जाहले व सिपरीकोलारसेसमीप इंगरेजांचीं पलटणें आहेंत त्यानीं माहदाजी सिंद्यांसीं पैगाम केला आहे कीं आम्हास सुरतेस जावयाचें प्रयोजन आहे. मार्गांत सदराह व मुजाहिम न होणें. परस्परें लढाई करावयाचें कारण नांहीं. पंतप्रधानांचे तालुकियास किमपि उपसर्ग न देतां बतरीक सवदागर आम्ही जातों. यावितरिक्त अवांतर वर्तमानासहित हुजूरअर्जी व अखबार व स्वामीचे सेवेसी डांकेवर छ ४ माहे मारीं पत्रें रवाना केलीं तें पाऊन वर्तमान कळलें असेल. त्या उपरी प्रत्यक्ष व यैकिलें वर्तमान दफेवार हुजूर व स्वामीचे सेवेसी लिहिलं असे.

सुरतेंत वलंदेजांची कोठी होती, ते इंगरेजानीं जप्त केली. हें वर्तमान पूर्वीं लिहिलें होतें. सांप्रत येथील कारभाऱ्यांसमीप सुरत व वसईची बातनी आली आहे कीं वलंदेजानीं फरासीसांसी साख्त करून उभयतां इतिफाकानें जंगी जाहाजांची तयारी करून, आपले विलायतीहून चवदा जाहाजें निघालीं त्यापैकीं साहा जाहाजें सुरतेसमीपचे दरयात नमूद जाहलीं आहेंत. व कांहीं जाहाजें गोव्यास आलीं व कांहीं वसईसमीप नमूद जाहलीं आहेंत. अद्यापि लढाईस मुकाबिल नांहींत किंवा कोणते इराद्यानें, आले आहेत याचाही निश्चय नांहीं.

कल्याणींत इंगरेजांचीं पलटणें आहेंत त्या सरदारापैकीं कल्याणीहून कोसावर विठलवाडीसमीप कांहीं जमीयत व येके सरदार आला आहे म्हणोन खारिज यैकिलें. या दिवसांत साली सिध जाहल्या आहेत. गला जमा करावयाची तजवीज आहे. बिरेवाडीनजिक तळेघोसांळें येथें हबसीयासीं व पंतप्रधानांचे लोकासीं लढाई जाहली म्हणोन पूर्वील पत्रीं लिहिलें आहे. सांप्रत यैकिलें कीं पंतप्रधानाकडील गाड्यांचा जमादार नथेखान नामे ठार जाहला. व तीन निशानें गाड्यांची हबसीयानीं नेलीं म्हणून खारिज यैकिलें. सुरापूरकर बेरडाचे दरखास्तीनुरूप पुण्यांस येण्याविषईं पंतप्रधान व कारभाऱ्यांचीं पत्रें बेरड मार याचे वकीलांचे स्वाधीन केलीं व माधवराव सदासिव या कामाचे बानीकार आहेत. याकरितां पंतप्रधानांचे तरफेनें माधवराव यानीं आपले तरफेचे ग्रहस्तांस समागमें दिधलें.

वकील पुण्याहून स्वार होऊन गेले. माधवरायांचे तरफेचा ग्रहस्त येकादोन दिवसानंतर जाणार.

२

पुरवणी अखबार छ ७ जिलकाद सन ११९५ हिजरी.

करनल गाडर वसईस आला आहे म्हणोन पूर्वील पत्रीं लिहिलें आहे. सांप्रत हरीपंताचे मुखें चर्चा यैकिली कीं गाडर मार सुरतेंत आहे म्हणोन कोण्हीं ग्रहस्तानी सांगितलें. त्यास वसईस येऊन तेथील बंदोबस्त करून पुन्हां सुरतेस गेला असेल व सांप्रत सुरतेंत आहे म्हणोन यैकिलें हैदरअलीखानाकडील या दिवसांत नवल विशेष वर्तमान आलें नांहीं व सिद्याकडीलहीं कांही बातनी कळली नाही. सेवेसी श्रुत होय हे विनती.

पैा छ १५ माहे जिलकाद संन ११९५ हिजरी रोज शेनिवार डांकेवर.

---

A. R. No. 131

८ जिल्काद ११९५ हिजरी
२६ आक्टोबर १७८१

श्री शंकर

विनंती विज्ञापना यैसी जे येथील कुशल ताा छ ८ माहे जिलकाद मुा पुणे, स्वामीचे कृपावलोकणकरून येथास्तित जाणौन स्वानंद लेखणआज्ञा करीत आसिले पाहिजे. विशेष, येथील वर्तमान छ ४ माहे मजकूर रोज सोमवारी प्राथकाली विनंतीपत्र सरकारचे डाके-समागमे सेवेसी रवाणा केले ते पावोन सविस्तर वर्तमान ध्याणास येईल. तदणंतर येथील वर्तमान कोकणप्रांती कल्याणीस इग्रजाची दोन पलटणे आहेत. येक पलटण कल्याणीपुढे दीढा कोसावर आहे व पंचवीस तीस तोफाही तेथे आहे. करनैल गाडर वसईस आहे. प्रस्तुत इंग्रज कोकणप्रांतीच्या साली ज्याहाजात भरून ममईस नेतात. श्रीमंता-कडील फौज वगैर येईल म्हणौन इंग्रजाणी येक पलटण कल्याणीपुढे ठेवले आहे. सालीचा हांगाम जाल्यानंतर गाडर मजकूर पलटणा-सहित कल्याणीस येणार. आलियानंतर पुढे बोरघाटाकडे चाल

करणार यैसे वर्तमान आहे. त्याजवरून येथून कारभाऱ्याणी दोन आडीच हाजार गारदी बोरघाटाकडे रवाणा केले. राजश्री भवाणी सिवराम व पानशाकडील लोक व काही तोफा रवाणा करनार, श्रुत होये. राजश्री सखाराम पानसे मोहोर्त करून डेरे दाखल जाले. हरी-पंताजवल उतरले आहेत, श्रुत होये. हैदर नाइकाकडील वकील नानाकडे आले होते. नानासी व नाईक मजकुराकडील वकीलासी च्यार घटका खलवत जाला. नाईक मजकुराकडील श्रीमंतास व कारभाऱ्यास वस्त्रे आली आहेत. वस्त्रे येकादो दिवसा गुजरानार, श्रुत होये. दरबार वगैर जाला होता. माली व मुलुकी कामकाज ज्यारी आहे, विदित होये. छ ५ रोज मंगलवार. नवाब ज्याबितजंग बाहादूर मरहूम याचे पुत्राची वस्त्रे पूर्वी श्रीमंतास व कारभाऱ्यास आली होती त्याची मुबादल्याची वस्त्रे येथून श्रीमंताची व कारभाऱ्याची निर्मळेस पाठविली, श्रुत होये. सिंद्यासी व इंग्रजासी हिंदुस्थानप्रांती लढाई आहे. प्रस्तुत वर्तमान आहे की ते इंग्रज महर्गतीमुले जेर जाले. जेर होऊन माघारा गेले. त्याचे पाठीमागे सिंदे लागले आहेत. यैसे वर्तमान आले आहे. मागती तिकडील वर्तमान आलिया लेखण केले जाईल, श्रुत होये. हैदर नाइकासी व इंग्रजासी चिणापटणाकडे लढाई मातबर जाली. वर्तमान आहे की उभयेपक्षी कायेम राहिले. परंतु आंतस्ते वर्तमान आहे की काहीयेक नाईक मजकूर सिकस्त होऊन माघारा कोस दोन कोस आले, यैसे वर्तमान आहे. मागती तिकडील वर्तमान आलिया लेखण केले जाईल, श्रुत होये. छ ६ रोज बुधवार. रा गोविंदराव गायेकवाड याची उभारनी करितात. त्यास सरकारा-तून लाख पणास हाजार रुपये द्यावे. व लाख दोन लाख रुपये त्याणी नवे दिवाण गणपतराव कोलटकर उभे केले आहेत, त्याणी द्यावे. आणि फौज ठेऊन गुजराथप्रांती जावे. हे वर्तमान पूर्वीचे विनंतीपत्री लेखण केले होते, त्याजवरून श्रुत जाले आसेल. प्रस्तुत गाइकवाड मजकूर दावडीस आहेत. दोनेक हाजार फौज त्याणी ठेवली. आणि कही फौज ठेवितात यैसे वर्तमान आले आहे, श्रुत होये. नाना हरी-पंताचे डेऱ्यास गेले होते. नाना व हरीपंत व कृष्णरावजीचे चिरंजीव

या त्रिवर्गाचा खलवत जाला. कृष्णरावजीकडील पत्रे आली होती ते नानाणी व हरीपंताणी वाचली. त्याची उतरे रावजीकडे लिहिणार व येज्यमाणसाहेबास पत्रे व अर्ज्या लिहिणार, या आनवये खलवत जाला, यैसे यैकिले. दुसरे कितेक आपले दौलतीविशई खलवत जाला. उप्रांतिक नाना आपले घरास आले. येकादो दिवसा नाना हरीपंताचे डेऱ्यास जात आसतात. खलवत होत आसतो. प्रस्तुत हरीपंताचे डेऱ्याजवल दोनेक हाजारपावेतो फौज जमा जाली आहे. पुढे लोकही वरचेवर जमा होतात, श्रुत होये. छ ७ रोज गुरुवार. हैदर नाइकासी व फरासीस फिरंग्यासी पहिले राजकारन जाले होते की वीस लक्ष रुपये तुम्हास देतो. तुम्ही आमची मदत करून इंग्रजाचे पारपत्य करावे व इंग्रजाची सवस्थाणे व बंदरे घ्यावी. येविशई येथून कारभाऱ्याचेही संमत हैदर नाइकासी होते. त्याजवरून हैदर नाइकाणी फरासिसास कराराप्रो यैवज दिल्हा, यैसे वर्तमान यैकिल्यात आले. प्रस्तुत वर्तमान आले आहे की, फरासिसाची दाहापाच ज्याहाजे जंगी मातबर, त्याचे बंदराकडून सुर्तेस आली. मार्गी जाताणी ममईस त्याणी पाचच्यार गोले डागले आणि सुर्तेकडे गेले. पुढे सुर्तेस मोर्चे लावनार. ज्याहाजे सुर्तेजवल उभी आहेत, यैसे वर्तमान येथे आले आहे. त्याजवरून कारभाऱ्याणी खानदेशप्रांती गणेशपंतास पत्रे लिहिली आहेत की, सुर्तेकडे फरासिसाची ज्याहाजे आली, यैसे वर्तमान यैकिले आहे. त्यास सुर्तेकडे मणुशे पाठऊन बातमी आनवणे. बातमी गणेशपंताकडील आलियावर लेखण केले जाईल. प्रस्तुत तो वर्तमान आहे की फरासिसाची ज्याहाजे सुर्तेस आली. सुर्तेस उपद्रव करनार यैसी वदंता आहे. मागती तिकडील वर्तमान आलियास लेखण केले जाईल श्रुत होये. कृष्णरावजीकडील पत्रे वरचेवर येत्यात. बहुत रहशाची भाषणे होत्यात. याआनवये पत्रे येत्यात, यैसे अैकिल्यात आले, श्रुत होये. वर्तमान आहे की, दो चौ दिवसानी हरीपंत येका कोसाचे कूच करून खडकीचे पुलावर मुकाम करणार. कूच केल्यावर लेखण केले जाईल, श्रुत होये. माहे मजकुरी शुध त्रयोदसीस नानाही डेरे देऊन बाहेर राहानार

## पुरवणी दुसरी २

यैसी वदंता आहे. निश्चये होऊन निघाल्यास लेखण केले जाईल श्रुत होये. श्रीमंत वाड्यात घोडे वगैर फिरवीत आसतात, श्रुत होये. होलकराचे दिवाण नारो गणेश येथे आले आहेत. कारण की, फौजेच्या खर्चाकरिता काही यैवज मागतात. त्याजवरून त्यास कारभारी लाख दीड लाख रुपये देणार. यैवज दिल्ह्यावर नारो गणेश वाफगावी होल्कराकडे जाणार. उप्रांतिक होलकर डेरे दाखल होऊन हरी-पंताकडे येणार यैसी वंदता आहे, श्रुत होये. प्रस्तुत इंग्रजाचा शह कोकणप्रांती विशष दिसत नाही, यैसी वदंता आहे. त्यामधे फरासि-साची ज्याहाजे सुर्तेकडे आली. सुर्तेस उपद्रव करणार, यैसे वर्तमान आहे. त्याजवरून कारभारी आपले ठिकाणी बहुत संतोष आहेत. मागती इंग्रजाकडील वर्तमान येईल ते लेखण केले जाईल, श्रुत होये. मुतसदी मंडली व पागेचे कारकूण वगैर याजवर च्यार लक्ष रुपयाची पटी केली आहे. मग निश्चये होऊन पटी केल्यास लेखण केले जाईल श्रुत होये. दरबार वगैर जाला होता. माली व मुलुकी कामकाज ज्यारी आहे. पुढे जे प्रंसगाचे वर्तमान ध्याणास येईल ते सेवेसी लेखण केले जाईल, विदित होये. परस्परे वर्तमान यैकिले की उभयेता स्वामीस येज्यमाणसाहेबाणी साहेबनौबत दसऱ्यास देऊन सर्फराज केले. हे वर्तमान यैकोण बहुत संतोष जाला, तो पत्री कोठवर ल्याहावा. ईश्वर आपल्यास मुबारक करो. सेवकलोकाची इछा हेच की दिवसानदिवस स्वामीचे उर्जीत व्हावे. बहुत काल सलामती करावी हेच मागने. रात्रदिवस ईस्वरापासी आहे. सदैव स्वामीचे शुभचिंतन करितो. स्वामीही माझे चिरजीवाप्रमाणे चालवितात. सर्व प्रकारे दिवसानदिवस माझे उर्जीत करणे स्वामीचे चरन आहेत. सदैव आज्ञापत्री परामृश होत असावा. बहुत काये लिहिणे. कृपालोभ कीजे हे विज्ञाप्ती.

**A. R. No. 132**

११ जिल्काद ११९५ हिजरी

२९ आक्टोबर १७८१

पैा छ १९ जिलकाद सरकारच्या डांकेबराबर अली, विद्यमान दारोगे हरकारे, सन ११९५ हिजरी.

श्रीनिवास

पोष्य हैबतराव गोपाळ सां नमस्कार. विनती उपरी येथील वर्तमान ताा छ ११ जिलकाद, कार्तिक शुध त्रयोदसी इंदुवासरपर्यंत मो पुणें, स्वामीचे कृपेकरून क्षेम जाणून स्वानंदवैभव लेखनाज्ञा केली पाहिजे. विशेष कृपापत्र छ २८ शवालचें पाठविलें तें छ ८ माहे मारीं प्राथ:काळीं पाऊन संतोष जाहला व चिरजीव राजश्री राय रघोतम-राव यांना लिफाफा पावला. पूर्वीं छ ८ माहे मारीं हुजूरअर्जी व आखबार व स्वामीचे नांवचें पत्र डांकेवर रवाना केलें तें दारोग्याचे विद्यमानें हुजूर व स्वामीस पाऊन वर्तमान कळलें आसेल. सांप्रतचें वर्तमान पृथक पुरवण्यापत्रीं लिहिलं आहे, त्यावरून सेवेसी श्रुत होईल. इकडील ग्रहस्तांची चाल व वचनाची प्रामाणिकता व निस्पृहता दाख-वणें व स्वकार्याचे काबूची हे रीत सर्व स्वामीस विदित. संमध पडल्यास उपाय नांहीं. ज्यासमई ज्यासीं जैसी गांठ पडेल त्याप्रमाणें निर्वाह करावा लागतो. सविस्तारें वर्तमान उदईक छ १२ मगलवारीं लिफाफा डांकेवर रवाना करितों. तो डांकेवर स्वामीस पावेल.त्यांत चिरजीवाचे नांवचे पत्राचा लिफाफा आहेत. स्वामी चिरजीवास देतील. पत्रांतील मार सविस्तारें चिरजीव हुजूर समयोचित व स्वामीचे सेवेसी विनती करतील. बहुत काय लिहिणें, हे विनती.

---

पैा छ १९ जिलकाद.

श्रीनिवास.

अखबार पुणें अज इाा छ ८ शुशवार जिलकाद, लगायत छ ११ माहे मार इंदुवासर सन ११९५ हिजरी.

सुरत व वसई व मुंबईचें बंदराचे सुमारानें समुद्रांत फरासिसांची

जाहाजे हरयेक बंदरास तीनच्यारप्रमाणें दुरोन दिसतेंत म्हणोन येथील कारपरदाजांसमीप खारिज बातनी आली आहे. जाहाजें जंगी किंवा सवदागरी याचा निश्चय नांहीं. वलंदेजांची कोठी सुरतेंत होती, ते इंगरेजानी जप्त केली. याकरितां वलंदेजानी फरासिसांस कुमकेस आणिलें, म्हणोन खारिज वर्तमान यैकिलें, तें व यावितिरिक्त अवांतर वर्तमान सुरापूरकर बेडरांचे वकील पंतप्रधानांची पत्रें सुरापूरकरानें पंतप्रधान व येथील कारपरदाजांचे भेटीस येण्याविषईं घेऊन गेले. म्हणोन पूर्वी हुजूरअर्जी व आखबार व स्वामीचे सेवेसी पत्र पाठविलें, तें पाऊन वर्तमान कळलें असेल. त्या उपरी प्रत्यक्ष वर्तलें व यैकिलें वर्तमान हुजूर व सेवेसी दफेवार लिहिलं आसे.

गोरनर मेस्तर हिस्तैन चिन्हारगडांत आहे व चेतसिग जमीदारांचा माहासरा मजबूत आहे, म्हणोन कासीची कल्मी खबर व माहदाजी सिंद्यांचे लिहिण्यांत गोरनरास चेतसिगानें दस्तगीर केलें, म्हणोन छ ११ माहे मारीं बालाजीपंत व हरीपंताचे जुबानी यैकिलें.

माहदाजी सिंद्यांची पत्रें छ ९ जिलकादीं बालाजीपंतास आलीं. पंत मारनुलेचे जुबानीं यैकिलें कीं करनल मेवर इंगरेज जमीयतेसुधां सिपरीकोलारसेसमीप आहे. व सिवाजी विठल यांचे विद्यमानें सिंदे मजकुरांसीं पैगाम केला आहे कीं कासीकडें गडबड जाहली. याकरितां कराराप्रमाणें माघारा कूच केलें नांहीं व आपले सरदारास पत्र लिहिलें आहे. त्याचें उतर आल्यानंतर कूच करून यमुनापार जातों. माहदाजी सिंदे कालीसिंदेसमीप फौजेसुधां मुकाबिल लढाईस आहेत. याप्रकारें कारभाऱ्यांचे जुबानीं व खारिज यैकिलें. मेवर इंगरेजानें माहदाजी सिंद्यास पैगाम केला आहे कीं विलायतवाल्यांचे हुकमाप्रमाणें आम्हीं सुरतेस जातों. तुम्हीं मुजाहिम न होणें. व परस्परें लढाईचें प्रयोजन नांहीं. बतरीक सवदागर आम्हीं जातो, यावरून इंगरेज हरामजादे व बदकौली बेइमान म्हणोन सिंदे मार जरीदे होऊन लढाईस मुस्तैद आहे.

हैदरआलीखान चिनापटणाहून दाहा कोसी करनल कूटाचे मुकाबिल आहे. इंगरेजांची जुरत लढाईची होत नांहीं. व बेइस्तकलाल

जाह्ले आहेत व नाईक मारासीं स्नेहाचा पैगाम पुरवाजिदीनें करितात. परंतु हैदर नाईक कबूल करीत नांहीं म्हणोन बालाजीपंत व हरीपंत व हैदरखानाचे वकीलांचे जुबानीं यैकिलें.

---

पैा छ १९ जिलकाद.

२

पुरवणीं आखबार छ ११ जिलकाद सन ११९५ हिजरी.

फरासीसांचे विलायतीहून मुसा मूती फरासीस गोव्यास आला आहे. व घोडीं वगैरे सरजाम व राहदारीचें दस्तक पाठऊन देणें म्हणोन पंतप्रधानांचे कारपरदाजांस लिहून पाठविलें. त्यावरून राहदारीचें दस्तक व स्वारीस दोन घोडीं व बदरकयास माणसें देणें म्हणोन कोकणचे कमाविसदारास लिहून पाठविलें व दस्तक व जासूद मुजरद पुण्याहून पाठऊन दिधले. फरासीस मार सत्वरच येईल म्हणोन बालाजीपंतानी सांगितलें.

सुरापूरकराचे वकील पंतप्रधानांचीं पत्रें घेऊन गेले व पंतप्रधानांचे तरफेनें वकील माघाहून जाणार म्हणोन पूर्वील पत्रीं लिहिलें होतें. छ ९ माहे मारी राघोपंत नामे वकील पंतप्रधानांचा गेला.

फरासीसाकडील जाहाजें वसई, मुंबई व सुरतेस समुद्रांत नमूद जाहलीं आहेत म्हणोन पूर्वीं लिहिलं आहे. सांप्रत बालाजीपंताचे जुबानीं यैकिलें कीं जाहाजें जंगी आहेत. आद्यापि इंग्रजाचे बंदरावर चालून येत नांहीत. आपले सरदाराचे आज्ञेप्रमाणें वर्तणूक करतील. खारिज यैकिलें कीं फरासीसांची चोर जाहाजें आहेत. इंगरेजांची च्यार जाहाजें सवदागरीपैकीं तीन किरान्याचीं, नारेळ वगैरे जिनस व येक नख्त रुपयाचें, येणेंप्रमाणें च्यार जळमार्गे जात होतीं. फरासीसांकडील जाहाजें मुंबई व वसईसमीप नमूद जाहलीं होतीं. त्या जाहाजवाल्यानीं इंगरेजांचे जाहाजास सदराह जाहले त्यापैकीं येक जाहाज नख्त रुपयाचें होतें. तें काबू पाहून माघारा मुंबईस आलें व तीन जाहाजें किरान्याचीं फरासीसानीं धरलीं व इंगरेजाकडील लोकास कैद केलें. व

गोवे बंदराचे रुखं गेले. गोवेवाल्यानीं आश्रय दिधला नांहीं. याक- रितां तेथोन हैदरअलीखानाचे तालुकियांत जाणार म्हणोन खारिज यैकिलं.

छ ९ माहे माारीं पंतप्रधान व बालाजीपंत व हरीपंत पर्वतीस गेले होते.

अमृतराव पेंठें जोगाईचे आंब्यास यात्रेस गेले होते ते यात्रा करून पुण्यास आले. सेवेसी श्रुत होय हे विनंती.

---

A. R. No. 133 — १२ जिल्काद ११९५ हिजरी

३० आक्टोबर १७८१

पैाा छ २० जिलकाद सरकारच्या डांकेबराबर आली, विद्यमान दारोगे हरकारे सन ११९५ हिजरी.

श्रीनिवास

पोष्य हैबतराव गोपाळ साष्टांग नमस्कार. विनंती उपरी. येथील वर्तमान ताा छ १२ जिलकाद, कार्तिक शुध चतुर्दसी भौमवासरपर्यंत मो पुणें स्वामीचे कृपेकरून क्षेम जाणून स्वानंदवैभव लेखनाज्ञा केली पाहिजे विशेष. छ ११ माहे माारीं डांकेवर विनतीपत्र पाठविलें तें दारोग्याचे विद्यमानें सेवेसी पावलें असेल. चिरंजीव राजश्री राय रघोतमराव यानीं छ २८ शवालीं पत्र पाठविलें त्याचें उतर सरसरी लिहिलें होतें, याकरितां सांप्रत तपसीलवार लिहिलें आहे व कांही पुरवण्या स्वामीचे सेवेसी पावत्या करावयाच्या त्या माारांची माहितगारी चिरंजीवास आहे. यास्तव चिरंजीवाचे पत्रांत मलफूफ करून सेवेसी पाठविल्या आहेत. चिरंजीव सेवेसी प्रविश्ट करतील व पृथक माार त्यांस लिहिला आहे तो विनंती करतील. त्यापैकीं हुजूर अर्ज करावया योग्य जे आज्ञा स्वामी करतील, त्याप्रमाणें हुजूर व नवाब मोइनुदौला बाहादरांस अर्ज करतील. बहुत काय लिहिणें हे विनंती.

---

पैा छ २० जिलकाद.

श्रीनिवास

पुरवणी आखबार पुणें छ १२ जिलकाद सन ११९५ हिजरी.

गोरनर मेस्तर हिस्तैन कासीहून निघोन चिन्हारगडाचे आश्रयास गेला. व राजे चेतसिंग जमीदारानें माहासरा केला आहे म्हणोन तहकीक कलमी खबर आली. त्यानंतर बाळाजी गोविंद वगैरेची कुमकी फौज च्यार हजारपर्यंत चेतसिंगास गेली. त्यानंतर जमीदार मारानें दाहा हजारपर्यंत स्वार प्यादे जमा करून इंगरेजांस खारिज केलें. प्रयागांत इंगरेजांचे सरदारासमीप तीन पलटणें व च्यार तोफा आहेत तो चेतसिंगावर चालून आला. कासी व प्रयागचे माबैन जमीदार मारांसी व इंगरेजांसी लढाई मातबर जाहली. दुतरफा बहुत लोक ठार व जखमी जाहले. त्यानंतर इंगरेज पसपा होऊन माघारा प्रयागचे किल्याचे आश्रयास गेले म्हणोन सागरीहून बालाजीपंतास खबर आली. ते बालाजीपंताचे जुबानीं यैकिल्याप्रमाणें सेवेसी लिहिली असे हे विनती.

---

**A. R. No. 134** १२ जिल्काद ११९५ हिजरी

३० आक्टोबर १७८१

पैा छ २० जिलकाद सन ११९५ हिजरी.

श्री शंकर

विनंती विज्ञापना यैसी जे येथील कुशल ताा छ १२ माहे जिलकाद मुा पुणे स्वामीचे कृपावलोकणकरून येथास्तित जाणौन स्वानंद लेखणआज्ञा करीत आसिले पाहिजे. विशेष, येथील वर्तमान छ ८ माहे मजकूर रोज शुक्रवारी प्राथकाली विनंतीपत्र सरकारचे डाकेसमागमे रवाणा केले, ते पावोण सविस्तर वर्तमान ध्याणास येईल. तदनंतर येथील वर्तमान, कार्तिकमास म्हणौन राजश्री हरीपंत येथून कोसा

दीढा कोसावर बाग आहे तेथे भोज्यनास गेले होते. भोज्यण करून उप्रांतक आपले डेऱ्यास हरीपंत आले, श्रुत होये. हरीपंताचे डेऱ्याजवल दीडदोन हाजार स्वार जमले आहेत. वरचेवर लोकास बलाऊ पाठवितात, जमा होतील. परंतु तीन वर्षे फौजेच्या लोकास नालबंदी वगैर नाही. रोजमुरे मात्र थोडेबहुत पावले. यामुळे लोकही आपले ठिकाणी आजुर्दा आहेत. त्याजवरून लोकाचीही काही वाट करणार यैसे मानस आहे. परंतु पैक्याचा तोटा आहे. थोडीबहुत लोकाची समजूती करून लोक जमा करणार यैसे आहे, श्रुत होये. दरबार वगैर जाला होता विदित होये. छ ९ रोज शनवार. फरासीसाची ज्याहाजे मातबर दाहाबारा आपले बंदराकडून येऊन सुर्तेकडे गेली. सुर्तेस उपद्रव करनार यैसे वर्तमान येथे आले होते. त्याजवरून सविस्तर वर्तमान पूर्वीचे विनंतीपंत्री लेखण केले होते. त्याजवरून श्रुत जाले असेल. प्रस्तुत वर्तमान आहे की फरासीसाची च्यारपाच मनोरे, ज्याहाजापेक्षा थोर, आपले बंदराकडौन सुरतचे बंदराकडे इंग्रजाचे तालोक्यात आली. इंग्रजाकडील सवदागरी ज्याहाजे कोणीकडून येत होती ते फरासीसानी दोनतीन ज्याहाजे लुटली. फरासीसाची मनोरे ज्याहाजे सुर्तेहून पंचवीस तीसा कोसावर येकदोन दिवस होती. सुरत वगैरस कोठे उपद्रव न करता कोणीकडे बंदरास मुलुकगिरीस गेली. फरासीसाची ज्याहाजे सुरतचा शेहे सोडून गेली, यैसे वर्तमान आहे. मागती तिकडील वर्तमान आलियास लेखण केले जाईल, श्रुत होये. फरासीसाकडील वकील गोव्यांकडून येथे येणार यैसे वर्तमान आहे. आलियावर लेखण केले जाईल, श्रुत होये. येकादसी म्हणौन श्रीमंत व नाना परवतीस दर्शेनास गेले होते. दर्शेण करून संध्याकाली श्रीमंत व नाना आपले घरास आले, श्रुत होये. हैदर नाइकाकडील वर्तमान आहे की नाईक मजकुरासी व इंग्रजासी चिणापटणाकडे लढाई सुरू आहे. इंग्रजाचा ज्यमाव विशेष आहे. लढाई होऊन उभयेपक्षी कायेम राहातात यैसे वर्तमान आहे, श्रुत होये. छ १० रोज रविवार. कल्याणीस इंग्रजाची पलटणे दोनतीन आहेत. करनैल गाडर वसईस आहे. गाडर मजकूर ज्यमाव करून कल्याणीस येणार यैसी वदंता आहे.

त्याजवरून याणी घाट वगैरचे बंदोबस्तीस गारदी वगैर पाठविले आहेत. मागून भवाणी सिवराम वगैर रवाणा करणार. मागती इंग्रजाकडील वर्तमान आलिया याजकडील कोन्ही सरदार रवाणा जालिया लेखण केले जाईल, श्रुत होये. नाना कार्तिकमास म्हणौन बागांत भोज्यनास गेले होते. भोज्यण करून मागती घरास आले. पोर्णिमेपावेतो तीनच्यार दिवस लागोपाठ नाना बागात भोज्यनास जाणार, श्रुत होये. नाना हरीपंताचे डेऱ्यास गेले होते. दोनतीन घटका खलवत जाला. उप्रांतिक नाना आपले घरास आले. खलवतीचा भाव यैकिल्यात आला की रा कृष्णरावजीकडील पत्रे आली होती या आनवये खलवत जाला. पत्राचा भाव यैकिल्यात आला नाही. कलल्यावर लेखण केले जाईल, श्रुत होये. ज्यफरुदौला बाहादुर मरहूम याचे पुत्रास वस्त्रे मुबारकबादीचे श्रीमंताची व कारभाऱ्याची उदईक सांडणीस्वारासमागमे रवाणा होणार, श्रुत होये. छ ११ रोज सोमवार. हपशानी कोकनप्राती उपद्रव माडला आहे. म्हणौन पाचच्यारसे गारदी वगैर रवाना केले, शृत होये. भोसल्याकडून नागपुराहून श्रीमतास वगैर वस्त्रे येणार व भोसले डेरे दाखल होनार यैसे वर्तमान आहे, शृत होये. राजश्री सटोजी भोसले व बाजीराव बरवे वगैर श्रीमत रा दादासाहेबाजवल आहेत. त्यास सटोजी भोसले वगैर ज्यमाव करून कोडाईबारीकडे येणार यैसे वर्तमान आहे, शृत होये. येथून नारो गनेश वाफगावास गेलियावर होलकर डेरे दाखल होनार यैसे वर्तमान आहे, शृत होये. पुढे जे प्रसगाचे वर्तमान ध्यानास येईल ते सेवेसी लेखन केले जाईल. बहुत काय लिहिणे, कृपालोभ कीजे हे विज्ञाप्ती.

---

**A. R. No. 135**

१६ जिल्काद ११९५ हिजरी

३ नोव्हेंबर १७८१

श्रीनिवास

पोष्य हैबतराव गोपाळ सां नमस्कार विनती उपरी, येथील वर्तमान ता छ १६ जिलकाद कार्तिक वद्य त्रितीया शनिवारपर्यंत

मु।। पुणें, स्वामीचे कृपेकरून क्षेम जाणून स्वानंद लेखनाज्ञा केली पाहिजे. विशेष विनतीपत्रें पूर्वीं छ १२ व छ १३ जिलकादीं डांकेवर पाठविलीं ते पाऊन सविस्तारें वर्तमान कळलें असेल. कृपापत्रें दोन येक छ ६ जिलकादचें जासुदां समागमें व दुसरें डांकेवर छ ८ माहे माारचें येणे प्रमाणें पाठविलीं, तीं छ १६ व छ १७ रोजीं पाऊन संतोष जाहला. सांप्रत छ १३ माहे माारापासून छ १६ पर्यंत येथील आखबार व राजकी वर्तमान सांप्रदायाप्रमाणें हुजूर अर्जी व आखबार व स्वामीचे सेवेसी पृथकपत्रीं वर्तमान लिहून, चिरंजीव राजश्री राय रघोतमराव यांचे नांवचे लिफाफ्यासहित डांकेवर पत्रें रवाना केलीं आहेंत. दारोग्याचे विद्यमानें हुजूर अर्जी व आखबारेचा लिफाफा व स्वामीचे सेवेसी लिफाफा पावता होईल. अखबारेवितरिक्त कांहीं नवीन कल्पना ध्यानास आली तें वर्तमान चिरजीवास लिहिलें आहे. सेवेसी विनती करतील. बहुत काय लिहिणें हे विनती.

---

श्रीनिवास

अखबार पुणें, अज इा छ १२ जिलकाद लगायत छ १६ माहे माार, शनिवार दिवारात्र सन ११९५ हिजरी.

गाडर वसईहून सुरतेस गेला व प्रयागांत इंगरेजांचीं पलटणें होती त्यांसी व राजे चेतसिंग जमीदार कासीकरासीं लढाई मातबर जाहली. उभयपक्षीं लोक ठार व जखमी बहुत जाहले. परंतु इंगरेज पसपा होऊन पुन्हा प्रयागास गेले म्हणोन येथील कारपरदाजांचे जुबानीची खबर. यावितरिक्त अवांतर वर्तमानासहित हुजूर अर्जी व आखबार व स्वामीचे सेवेसी पत्र पाठविलें तें पाऊन वर्तमान कळलें असेल. त्याउपरी जाहलें व यैकिलें वर्तमान तपसील व दफेवार लिहिलें असे. प्रयागांत इंगरेजांची पलटणें होतीं. त्यांसीं व व चेतसिंगासीं लढाई जाहली. हें वर्तमान कारपरदाजांचे जुबानीं यैकिल्याप्राा पूर्वील पत्रीं वर्तमान लिहून पाठविलें आहे. त्याउपरी खारिज तहकीक यैकिलें

कीं मेस्तर गोरनर हिस्तैन चिन्हारचे गडांत मजबूतीनें आहे. प्रयागांत व अंतर्वेद प्रांतीं इंगरेजांचीं पलटणें होतीं. तें मुतिफक होऊन चेतसिंगावर चढाई करून आलीं. जमीदार मार मुकाबिल लढाईंत बहुत कायमीनें लढला. परंतु आखरश जमीदारांची सिकस्त बेतऱ्हा होऊन पळोन रामगडास गेला. व रामगडीं कायम न राहतां बेस्तइकलाली व बेहिमतीनें विजयगडास कोहिस्तान व मवाश्यांत गेला म्हणोन सावकारी बातनी आली. व सिंद्याकडील पत्रांतहीं खुफिया चेतसिंगांचे सिकस्तीचें वर्तमान आलें. जाहिरा इंगरेजांसी व पंतप्रधानासीं बिगाड इंगरेजांची सिकस्त प्रसिध्द करावी म्हणोन येथील कारपरदाजानी बरखिलाफ वर्तमान प्रसिध केलें होतें. त्याप्रमाणें पूर्वील पत्री लिहिलें. सांप्रत चेतसिंगांचे सिकस्तीचें वर्तमान मातबराचे जुबानीं यैकिल्याप्रमाणें लिहिलें असे. येथें कासीकर कितेक आहेत त्यांचीं घराऊं पत्रें आली त्यांत स्पष्ट मार लिहिला आहे कीं चेतसिंगाची सिकस्त जाहली. व रामगड किंवा विजयगडास गेला व कासीचे दरोबस्त प्रातांत इंगरेजांचा आमल कारारवाकई जाहला. शुजाउदौला मरहूमाचा पुत्र जगलीमिरजा आमानी आसफुदौला इंगरेजासी इतिफाकानें आहे म्हणून बजिनस पत्रें आलीं.

गाडर वसईहून सुरतेस गेला.' हे कलमी तहकीक वर्तमान येथील कारपरदाजांचे जुबानी यैकिल्याप्रा पूर्वी लिहिलें होतें. सांप्रत खारिज वर्तमान यैकिलें की गाडर सुरतेहून पुन्हा मुंबईस आला व च्यार पलटणे जमीयत पनवेलीहून तीन कोस बोरघांटचे रुखं आली म्हणोन खारिज यैकिलें. येथील कारभाऱ्यांचे जुबानीं तहकीक नांहीं.

दुर्गेजी भापकरास यथील कारपरदाजानी पत्रें पाठविलीं आहेत कीं पांच हजारपर्यंत फौजेची निगाहदास्त करणें.

२

पुरवणी आखबार पुणें, छ १६ जिलकाद सन ११९५ हिजरी. व गणेशपंत बहिरे व तुम्ही बइतिफाक कोंडाईबारीचे रूखें सुरत प्रांती जाणें. दुर्गोजीचा पुतन्या शाहजी, भापकराचा पुत्र कडोजी, दुर्गोजीचे तरफेनें येथें च्यारपांच महिने आहे. पंचेवीस हजारपर्यंत रुपये दुर्गोजीस पाठऊन दिल्हे. याउपरी पंतप्रधानांचे सरकारातून रुपये मिळाले तरी दुर्गोजी भापकर फौज ठेवील. सुष्क गोष्टी व उमेदवारीची आशा सांप्रत येथील कारपरदाज सर्वत्रांस दाखवीत आहेत. या भुलथापेवर दुर्गोजी भापकर फौज ठेवीत नांहीं.

फतेसिंग गाइकवाडावर दाब बसावायाकरितां गोविंदराव गाइकवाडाची उभारणी करावी. हा असल खुलासा येथील कारपरदाजांचा. परंतु गोविंदराव गाइकवाडास दाहावीस लाख रुपये कर्ज लोकाचें देणें व संग्रही दाहा घोड्याहून आधिक नांहींत. कोण्हीं कारभारी मुख्तार करून द्यावा. व त्यानें दोन तीं लाख रुपये गोविंदराव गाइकवाडास देऊन सरदारी उभी करावी, हे योजना आहे. त्यास गाइकवाडास कोण्ही दिवाण मिळत नांहीं व सरदारीची उभारणी होत नांहीं.

तळेगांवास कांही गाडदी व पानस्याचे बंधू सखारामपंत यांस पाठवावयाची योजना येथील कारपरदाजांची आहे. हें वर्तमान पूर्वीं लिहिले आहे त्यास गाडदी व तोफा तळेगांवास पाठवितों म्हणोन शोहरत घातली आहे. परंतु रवानगी आजीपर्यंत जाहली नांही. येथील कारभाऱ्यांचा सांप्रदाय पुरती डोईस जखम लागल्यावर सावध व्हांवें, म्हणजे गाडकर किंवा अन्यत्र इंगरेजांची पलटणें घांटापर्यंत येतील ते समई फौज व गाड्याची रवानगी करतील यैसें यांचे साप्रदायावरून दिसतें.

मुसा मूती फरासीसांचे तरफेचा वकील गोव्यास आला होता. तो बमोजिब तलब येथील कारपरदाज छ मारीं पुण्याहून पांचे कोसी

वेळूस आला म्हणोन यैकिलें. छ १७ माहे माार रविवारीं उदईक पुण्यास येणार.

मुंबईहून कांही जिनस खरीद फरोख्तचा न आणावा व आणील त्यापासून गुन्हेगारी घेऊन पारपत्य करावें याप्रमाणें येथील कारपरदाजांनीं सर्वत्र बोहरी व बजाज वगैरेस ताकीद केली आहे. ताकीद केली आसतां कोण्ही बेपारी चोरून कांही जिनस मुंबईहून आणितो त्याची बातनी कारपरदाजास कळल्यापक्षीं सिक्षा करून रुपये नागवण पुष्कळ घेत आहेत. सांप्रत पंढरपुरीं कोण्हीं सावकारानें रेसीम खरीदी करून आणिलें. हें वर्तमान कारभाऱ्यास कळल्यानंतर पंचेवीस गाडदी पंढरपुरास पाठविले व घर जप्त करून सावकारास पुण्यास आणविलें आहे.

---

३

पुरवणी आखबार पुणें, छ १७ जिलकाद सन ११९५.

बाबूराव वैद्य वकील निाा पंतप्रधान कारपरदाजाचे तरफेनें महेश्वरास अहिल्याबाईकडें गेला होता तो माघारा आला. व बालाजीपंतासीं व वकील माारासीं खिलवत जाहली व नारो गणेश व पाराजीपंत दिाा तुकोजी होलकर पुण्यास आले आहेत. हें वर्तमान पूर्वी लिहिलें आहे. त्यास बाबूराव महेश्वरीहून आला, व अहिल्याबाईचा पैगाम येथील कारपरदाजास व कारपरदाजांचा पैगाम बाईस जो जाहला त्याची कयफियत खारिज यैकिली, ते लिहितों. पंतप्रधानांचे कारभाऱ्यानीं बाबूराव वैद्यास अहिल्याबाईकडें पाठविलें व पैगाम केला कीं, पंतप्रधानांचे दौलतीचे खांब सिंदे व होळकर, व उभयतांचे भरवसियावर व अनकूळतेनें दक्षण हिंदुस्तान काबीज जाहली. सांप्रत सरदार मुल आम्हीं कारभारी युक्तीप्रयुक्तीनें आजी आठ वर्षे काररवाई करून दौलतेचा आब रक्षिला. परंतु घरचा फितूर व इंगरेजांसीं स्पर्धा व दरसाल लढाई व मुलुक तमाम गेला. सांप्रत या सरदारींत रुपयाची कमती बहुत आहे. या

समई मदद केल्यास फार उपयोगी पडेल. तरी पंचेवीस लाख रुपये बतरीक दस्तगर्दा किंवा कर्ज हसना देणें म्हणोन पैगाम केला. याचें उतर अहिल्याबाईनें केलें कीं सांप्रत सरदारीचे कामावर तुकोजी होळकर कायम आहे. ज्याजकडें माहाल व सरदारी दोन्ही कामें ज्याचे स्वाधीन आहेंत त्यानें रुपये द्यावे व त्यास रुपये मागावे, बशर्त सरदारी आपल्या स्वाधीन करावी व जागिरीत दखल दुसऱ्याचा नसावा. याप्रमाणें तह ठरल्यास रुपये आपण देऊं म्हणोन बाईनें उतर केलें. याचा मजहला दोन महिने पडला आहे. सेवटीं अहिल्याबाईनें माहदाजी सिंद्याचे मारफातीनें बाबूरायाचे जुबानीं बालाजीपंत व हरीपंतास सांगून पाठविलें कीं, सरदारीचें काम तुकोजी होळकराकडील काढून अहिल्याबाईस सरदारी सांगावी. व माहालाती जागीरीचा बंदोबस्त तुकोजी होळकरानीं करून सरदारीचे खर्चास जो रुपया लागेल तो द्यावा. किंवा सरदारी तुकोजी होळकरानी करावी व माहाल मुलुक बाईचे स्वाधीन करावा. बाईनें सरदारीचे खर्चास जो रुपया लागेल तो द्यावा या बशर्तीनें पांचसात लाख रुपये अहिल्याबाई पंतप्रधानास देणार व नारो गणेश सांप्रत तुकोजी होळकरांपासी दिवाण आहेत, यांसी व बाईसी यैक्यता नांही याकरिता नारो गणेशांची तगीरी येशवंतरावदादानी गंगोबातात्याचे पुत्रास दिवाणी द्यावी हे बाईचें मानस. याविषईंची रदबदली व ज्वाबसाल दरपेश आहे. तुकोजी होळकर माजी होऊन सरदारीचें काम अहिल्याबाई जातीनेच अटोपील. तरी या कामाचे बंदोबस्तास बहुत दिवस प्रयत्न व खटपट करणें लागेल. या प्राा बखेडा पडला आहे.

---

४

पुरवणी आखबार पुणें, छ १६ जिलकाद सन ११९५ हिजरी.

माहदाजी सिंदे अहिल्याबाईचे पक्षावर व पुण्यांत सिंदे मााराचे तरफेनें रामजी पाटील सिंदा आहे. तो व बाबूराव वैद्य अहिल्याबाईचे तरफेचा ज्वाबसाल करीत आहेत. हरीपंत व विसाजी अपाजी नारो

गणेशाचे इतिफाकानें तुकोजी होळकराकडून ज्वाबसालास मुकदम बालाजीपताचे विचारानें सरदारी किंवा माहाली काम, दोन्हीपैकीं येक काम अहिल्याबाईस सांगावें व दाहा लाख रुपयें बाईपासून घ्यावे. तुकोजी होळकरास कबूल न जाहल्यास माहदाजी सिंद्याची आजुरदगी व सरकारची नजर बुडते याकरितां बहुत युक्तीप्रयुक्तीनें नारो गणेश व पाराजीपंतास समजाऊन सांगत आहेत. परंतु तुकोजी होळकरास ह्या दोन्हीं शकला मान्य पडत नांहींत. दरोवस्त सरदारी व जागीर माधवराव मुतवफीनीं आपल्यास दिधली आहे. त्याप्रमाणें बहाल व करार ठेविलियानें आपण नौकरींत हाजर आहोंत. नौकर ठेवणें नसलियां दोन्ही कामें बाईचेच स्वाधीन करणें. व नारो गणेशास माजी करून येशवंतरावदादाजीस दिवाणगिरी देणें. हेही सर्वथैव कबूल नांहीं. हरीपंत फडके जाहिरा तुकोजी होळकराचा पक्ष दाखवितात परंतु अंतस्थ बालाजीपंत व हरीपंत येक व सित्धसाधक होऊन कारवाई करीत आहेत या ज्वाबसालाचा मजहला पडला आहे. फैसला व निश्चय जाहला नांहीं. सेवेसी श्रुत होय, हे विनती.

---

५

पुरवणी आखबार, छ १६ जिलकाद सन ११९५ हिजरी.

पंतप्रधानांचे सरकारचा कदीम नौकर पटवेगर, बालाजीपंत मुतवफीपासून नौकर होता. सांप्रत पंतप्रधानांची मोत्याची कंठी व बालाजी जनार्दनांचे स्त्रीचे गळ्यांतील मोत्याचा कंठा पटवेगराकडून गांठविला. पटवेगरानें दाहावीस चौकडे मोत्याचे बश किमतीचे काढून कम किमती मोती कंठी व कंठ्यांत घातली त्याची चौकसी होता पटवेगराचे जिमे चोरी लागली. त्या उपरी तहकीकात करण्यांत कांही मोंती सांपडली. पटवेगरांचें घर जप्त करून मालमालीयत सरकारांत घेतली व पटवेगर कांही दिवस कैदेंत होता. छ १५ माहे मारी हातीचे पांयास बाधून सरे बाजार शहराबाहेर नेऊंन टाकिला. मुलकी कामाचा जो ज़्वाबसाल रूबकार होत आहे त्याचे तडजोडीकरितां बालाजी जना-

र्दन तिसरे चौथे रोजी हरीपंताचे डेऱ्यास जाऊन मसलहत करीत आहेत. या उपरी जें नवल विशेष वर्तमान होईल तें सेवेसी लिहून पाठवीन, हे विनती.

---

A. R. No. 136

१९ जिल्काद ११९५ हिजरी
६ नोव्हेंबर १७८१

श्रीनिवास

पोष्य हैबतराव गोपाळ सांा नमस्कार, विनती उपरी. येथील वर्तमान ताा छ १९ जिलकाद, कार्तिक वद्य षष्ठीपर्यंत मो॥ पुणें, स्वामीचे कृपेकरून क्षेम जाणून स्वानंद लेखनाज्ञा केली पाहिजे. विशेष पूर्वी छ १७ माहे माारी डांकेवर हुजूरअर्जी व अखबार व विनतीपत्र सेवेसी पाठविलें तें दारोग्याचे विद्यमानें पाऊन वर्तमान कळलें असेल. सांप्रत राजकी वर्तमान पृथक पत्री विनती लिहिली त्यावरून श्रुत होईल. हुजूरअर्जी व आखबार सांप्रदायाप्रमाणें पाठविली आहे. राजश्री बाळाजी जनार्दन यानीं डेरे दाखल होण्याविषईं छ २१ माहे माारी मुहूर्त नेमिला होता तो राहिला, मवकूफ केला. आणखीं सुमुहूर्त पाहून सत्वरच डेरे देऊन दाखल होणार आहेत, सेवेसी श्रुत होय. इंगरेज काबूची व कोणते समई काय करतील याची चिंता येथील कारपरदाजांस बहुत आहे. परंतु घांटाखाले फौज पाठऊन कल्याणी वगैरे ठाणीं घेण्याचा मकदूर सर्वथैव नांहीं बहुत काय लिहिणें, हे विनती.

---

श्रीनिवास

अखबार पुणें, अज ग्गा छ १७ जिलकाद लगायत छ १९ माहे माार सन ११९५ हिजरी. कार्तिक वद्य ६ मंगळवार.

चेतसिंग कासीकर जमीदारासीं व इंगरेजांचे पलटणासीं लढाई जाहली. जमीदार मााराची सिकस्त जाहली व पळोन विजयगडाचे

आश्रयास गेला. व तुकोजी होळकरानें फख्त सरदारी करावी किंवा माहालाती काम करावें. दोन्ही कामापैकीं येक काम अहिल्याबाईने करावें व येक तुकोजी होळकरानीं व याचे बंदोबस्ताचे बशर्तीवर पांचसात लाख रुपयेपर्यंत पंतप्रधानास बाई मारीने नजर द्यावे, या ज्वाबसालाचे फैसल्याकरितां नारो गणेश व पाराजीपंत निा होळकर पुण्यास आले आहेत व रामजी पाटील व यशवंतरावदादाजी, गंगोबातात्याचा पुत्र, हे बाईचे तरफेनें उतर प्रत्योतर करीत आहेत म्हणोन यावितरिक्त अवांतर वर्तमानासहित हुजरअर्जी व आखबार व स्वामीचे सेवेसी पत्र पाठविलें तें पाऊन वर्तमान कळलें असेल. त्यानंतर प्रत्यक्ष व यैकिलें वर्तमान दफेवार लिहिलें आहे.

मुसा मूती फरासीसाकडील वकील पुण्याहून पांच कोसी वेळूस आला म्हणोन पूर्वील पत्रीं लिहिलें होते. छ १८ माहे मारीं पुण्यास आला. मुसा बरने फरासीस नामे पंतप्रधानांचे सरकारांत नौकर आहे. तो बतरीक इस्तकबाल गेला होता. चितामण दीक्षित नामे बालाजी-पंताचे आकरब मुसा मूतीचे ज्वाबसालाचे बानीकार आहेत. मारनुले समागमें सरजाम

| पालख्या दोन | घोडी | शागीर्दपेशा व बदुखीचे बार |
|---|---|---|
| २ | ५ | |
| फरासीस गोरे | याबू थोर | मिळोन जवान |
| ५ | १ ४ | ५० |
| | ५ | |
| संदूक टिन हरयेकास च्यार माणसे बार घेणार | | बेगारीचीं वोझी |
| | | ५० |
| बैल बारबरदारीचे | | राहुटी व पाल |
| ४ | | १ |

भवानी पेंठेंत मनसारामाचे बागांत उतरला आहे. सदरहू प्रा असबाब आहेत. फरासीस मार विलायतवाल्याचे तरफेनें पैगाम घेऊन आला आहे कीं विलायतीहून हजार गोरे घेऊन यतों. सरासरी

तीस रुपये दरमाहा प्रा तीस हजार रुपये दरमाह व सरदारीचे खर्चास दाहा हजार व तोफखान्याचे सरजामास दाहा हजार, येणेंप्रमाणें पनास हजार रुपये दरमाह देत जावा व येक मकान द्यावें. बशर्त या कराराचे फरासीसाची जमीयत विलायतीहून आणवितों. दोन लाख रुपये नख्त द्यावे. ते रुपये मुशाऱ्याचे करारान वजा करावे व बाद तंबी इंगरेजाचे जागीर वगैरे देऊन हजार गोरे व पांच हजार बार दरमाही नौकर ठेवावे. याप्रमाणें येथील कारपरदाजांसी बोलणार, म्हणोन खारिज यैकिलें. फरासीस माराची व बालाजीपंताची भेट जाहली नांहीं. छ २० माहे मारीं मुसा मूतीस भेटीस बोलावणार. पंतप्रधानांची भेट घेऊन बालाजीपंताची भेट घेईल. पूर्वी सन ११९० हिजरी सालांत पुरंदरास फरासीसाचा वकील आला होता त्याच तऱ्हेचा सांप्रतचा वकील दिसतो.

विसाजी कृष्टण बिनीवाले सरदार कदीम, मोरो बाबूराव यांचा शरीक जाहला होता. सबब नागवण घेऊन जागीर जप्त केली व खाननिसीन केला. सांप्रत विसाजीपंतावर कारपरदाजांची कृपा आहे. जागीर बहाल करून पुन्हां सरदारी सांगणार.

करनल गाडर मुंबईस आला व जंगी सरजामाची तयारी करितो. दंगा करून यक ब यक घांटावर येईल या सबब बोरघांटावर हजार गाडदी व हजार स्वार घांटाचे बंदोबस्तीस पाठवावे म्हणोन कारभाऱ्यांची तजवीज आहे. व बालाजी जनार्दन यांचे डेरे बाहेर होऊन सत्वरच डेरे दाखल होणार. दोनच्यार मुहूर्ते नेमिली आहेत. निश्चय होईल, आमलांत येईल त्याप्रमाणें विनती लिहील.

## २

### पुरवणी आखबार, छ १९ जिलकाद सन ११९५ हिजरी.

येहतशामजंग फरूख मिरजा यांची जागीर हुजूरीहून बाहाल जाहली. त्याचे मुबारकबादीचा खिलअत पंतप्रधान व बालाजी जनार्दन

व हरीपंत व कृष्टणराव बलाळ यांचे पुत्रानी रावजीचे तरफेची वस्त्रें छ १७ माहे मारीं रवाना केलीं. पंतप्रधानांचे तरफेनें

| | | | |
|---|---|---|---|
| ४ | कारचोबी पारचे | ६ | बालाजीपंताचे तरफेनें पारचे आदद |
| १ | शालजोडी | | |
| १ | किमखाब थान | ६ | हरीपंताचे तरफेचे पारचे |
| १ | सरपेंच मुरसा रकम | | |
| | | ६ | कृष्णराव बलाळ याचे तरफेनें. |

जनराल कूट चिनापटणापुढें च्यार कोस व हैदरअलीखान दाहा कोंसाचे फासल्यानें आहे म्हणोन पूर्वी खबर आली होती. त्यानंतर ताजी खबर खान मारांकडील आली नांहीं.

माहदाजी सिंदे कालीसिंदेसमीप व इंगरेजांची पलटणें सिपरी कोलारसेसमीप आहेत इंगरेजांची फौज गालिब जाहली व चेतसिंग जमीदार कासीकर पळोन गेला हे वर्तमान आल्यानंतर करनल गाडर व करनल मेवर व जनराल कूट वगैरे इंगरेजांचे सरदार ताजा दम होऊन लढाईस मुस्तैद आहेत.

कृष्टणराव बलाळ हुजूर जाऊन शरफ मुलाजमत हासल केल्यानंतर राव मारांची तीनदां पत्रें बालाजीपंतास आलीं. पत्रें आल्यानंतर वाचून पाहून पुन्हा दर जवाब लिहून पाठवावयाचे मसलतींत बालाजीपंत व हरीपंत मुख्य, विसाजी अपाजी आठवले पेशदस्त, हरीपंत व कृष्णराव बलाळाचे पुत्र गोविंदराव शरीक मसलहत असतात.

पंतप्रधानानीं आपले तरफेची अर्जी हुजूर दिलीस व नजफखान व राजे चेतसिंग यांस पत्रें इंगरेजांचे तंबीविषई लिहून छ १८ माहे मारीं रवाना केली.

गाडर मुंबईस आला म्हणोन कारपरदाजांसमीप कलमी वर्तमान आलें नाहीं. खारिज चर्चा यैकली त्याप्रमाणें पूर्वी लिहिलें आहे व सांप्रतही चर्चा सर्वतोमुखीं आहे कीं गाडर मुंबईस आहे.

या उपरी जें नवल विशेष यैकण्यांत येईल तें लिहीन हे विनती.

A. R. No. 137

२३ जिल्काद ११९५ हिजरी
१० नोव्हेंबर १७८१

श्रीनिवास

पोष्य हैबतराव गोपाळ सां। नमस्कार विनती उपरी. येथील वर्तमान ता। छ २३ जिलकाद, कार्तिक वद्य नवमी शनिवारपर्यंत मो। पुणें स्वामीचे कृपेकरून क्षेम जाणून स्वानंद वैभव लेखनाज्ञा केली पाहिजे विशेष पूर्वी छ २० माहे मारीं हुजूर अर्जी व अखबार व स्वामीचे सेवेसी पत्र पाठविलें तें दारोग्याचे विद्यमानें पाऊन वर्तमान हुजूर व सेवेसी श्रुत जाहलें असेल. सांप्रतचे वर्तमान पृथक पत्रीं लिहिलं आहे त्यावरून विदित होईल. करनल गाडर मुंबईहून कल्याणीस आला व पलटणे पनवेल व बेलापुरास पाठविलीं म्हणोन खारिज वर्तमान यैकिलें याचे प्रयोजन इंगरेजांचे तसरुफांत जो प्रांत आहे तो व त्याजवितरिक्त देशांतील साळीचा माल सित्ध जाहला आहे धान्यसंग्रह करावयाकरितां हरकत केली आहे. पंतप्रधानाचे कारपरदाज कोंकणांत फौज पाठवीत नाहींत याचें प्रयोजन अशक्तता इतकेंच ध्यानास येतें. सेवेसी श्रुत होय, बहुत काय लिहिणें, हे विनंती.

---

श्रीनिवास

अखबार पुणें अज इ॥ छ २० जिलकाद लगायत छ २३ माहे मार सन ११९५ हिजरी कार्ति(क) वद्य ९ मुसा मूती फरासीसाकडील वकील छ १८ माहे मारीं पुण्यास आला व करनल गाडर मुंबईस आला. जंगी सरंजामाची तयारी करितो व विसाजी कृष्टण बिनीवाल्यास जातीची जागीर कदीम बहाल जाहली. व यहतशामजंग बहादर फरुख मिरजा निरमलकर यांस हुजूरीहून जागीर बहाल जाहली याची मुबारकबादीचे खिलअत पंतप्रधानांचे तरफेचा व कारपरदाजानी आपले तरफेचे पाठविले यावितरिक्त अवांतर वर्तमानासहित

हुजूर अखबार व स्वामीचे सेवेसी पत्र पाठविलें तें पाऊन वर्तमान कळलें असेल. त्या उपरी खारिज यैकिलें व प्रत्यक्ष वर्तमान दफेवार लिहिलं असे. मुसा मूती फरासीस छ २८ माहे मारीं पुण्यास आला. त्या उपरी कारपरदाजांचे सलाहानें तजवीज ठरली कीं प्रथमतां बालाजीपंताची भेट घ्यावी. त्याप्रमाणें छ २० माहे मारीं चितामण दीक्षित इस्तकबाल जाऊन मुसा मूतीस बमय हमराही व पुण्यांत मुसा वरणे नामें सवदागरीचे कसबावर आहे त्यासहित बालाजीपंताचे हवेलीस घेऊन आले गोविंदराव कृष्टण व कृष्टणराव बळवंत बालाजीपंतासमीप होते. परस्परें भेटी जाहल्या. त्यानंतर क्षेम वर्तमान परस्परें पुसोन मूती मारानें विलायतचे सरदारांचे खलीते तीन बालाजीपंतास दिधले व घडचाल दस्ती बेश किमती बालाजीपंतास दिधलें. अतर पानदान फरासीस मारास देऊन रुखसत केलें. मुसा मूतीस ज्याफत सिधा व नख्त रुपये दोनसे पाठविले.

छ २३ रोजीं मुसा मूती व हमराहीपैकीं येक फरासीस व मुसा वरने सवदागर व चितामण दीक्षित व बाळाजीपंत त्रितीय प्रहर दिवसापासून अस्तमानपर्यंत खिलवतेंत होते. फरासीसाचा खुलासा खारिज यैकिल्या प्रो पूर्वील पत्री लिहिला होता. कृष्टणराव बलाळ बमोजिब इतिला कारपरदाज लिहतील व सेवकासही तहकीक वर्तमान कळल्याप्रमाणें लिहीन. गोविंदराव गाइकवाडानीं दिवाण मुख्तार करून चालीस पनास हजार रुपयेपर्यंत सावकारी कर्ज घेतलें व दोनसे स्वार जमा केले व ज्याबज्या सर्वत्रांस कौल पाठविले कीं आपले जमीयतीसुधां येणें. घोडें व माणूस पाहून बोली करूं. छ २१ माहे मारीं येथील कारपरदाजांचे इतिल्याप्रमाणं गोविंदराव गाइकवाड मौजे खडकी, पुण्याहून दोन कोसी मुला नदीचे तीरीं पुलासमीप येऊन उतरला.

२

पुरवणी अखबार, छ २३ जिलकाद सन ११९५ हिजरी.

समागमें पांचसे स्वार व तीन हाती व दाहा उंट व येंक तंबू व दाहा

राहुटचा येणेप्रमाणें आहेत. छ २२ माहे मारीं राजश्री हरिपंत व कृष्ट-णराव बळवंत पंतप्रधानांचे तरफेनें इस्तकबाल गेले त्या उपरी भेटी जाह-ल्या. नंतर हरीपंत आपले डेऱ्यास गेले व कृष्टणराव बळवंत गोविंदराव यास समागमें घेऊन श्रीमंत पंतप्रधानांचे हवेलीस आले. बालाजी जनार्दन प्रधानासमीप होते. गाइकवाड मार बमोजिब कायदा पंतप्रधान व बाला-जीपंतास भेटले व हमराही लोकांस भेटविलें. त्यानंतर अतर पानदान गाइकवाड मारास देऊन रुखसत केलें. गोविंदराव गाइकवाडास कोंडाई-बारीचे रुखं गुजरातेंत पाठवावयाची तजवीज कारपरदाजांची आहे.

करनल गाडर मुंबईस आला म्हणोन पूर्वील पत्रीं लिहिलं आहे. सांप्रत खारिज यैकिलें कीं गाडर मार कल्याणीस आला. व बेलापुरा-समीप तीनच्यार पलटणें जमीयत आली व नरनाला नामे किला कोंक-णांत आहे तेथील माहासऱ्यास जमीयत पाठवणार. हें वर्तमान कारपर-दाजानीं यैकिल्यानंतर कांहीं फौज व गाडदी तळेगांव व बोरघांटावर पाठवावयाची तजवीज करून सखाराम पानसे यांस छ २१ रोजीं रुखसत केले. मुठा नदीचे संगमासमीप जाऊन उतरले. समागमें दोनसे स्वार व पांच जरब तोफा व दोनसे गाडदी प्रस्तुत आहेत भवानजी भोंसले आकलकोटकर हजार स्वारानसीं पुण्यास आला आहे. कारपरदाजांचे सूचनेनुरूप भोंसले मार सखाराम पानसे याजसमीप जाऊन उतरले सत्वरच कूच करून तळेगांवास जाणार.

सुरत व वसई व मुबईच रुखं समुद्रांत फरासीसाकडील जंगी जाहाजें आलीं. म्हणोन पूर्वीं येथील कारपरदाजांचे जुबानी यैकिल्या-प्रमाणें लिहिलें आहे. सांप्रत खारिज यैकिलें कीं फरासीसाकडील जा-हाजें म्हणोन शोहरत जाहली हे गलत आहे. इंगरेजांची खाली जहाजें समुद्रांत आहेंत. तेच फरासीसाची म्हणोन लोकानी बादवाही शोहरत घातली व इंगरेजांची कमती व इंगरेजांचे शत्रुचा उत्कर्ष येथील कार-परदाजांस इष्ट. याकरितां अफवाई खबरेचे स्थलीं विश्वास धरीत आहेत.

सिपरीकोलारसासमीप मेवर नामे इंगरेज सिंद्याचे मुकाबिल आहे व माघारा जातों म्हणोन सिंद्यासी करार केला होता. सांप्रत येथील कारपरदाजांचे जुबानीं वर्तमान यैकिलें कीं मेवर मारानें कांही करारांत अंतर केलें होते. परंतु माहदाजी सिंदे जबरदस्त व गालिब पाहून पूर्वील कराराप्रमाणें यमुनेचे रुखं दाहा कोस माघारा कूच करून गेला. पुन्हा तहकीक शोध कळल्याप्रमाणें सेवेसी लिहीन.

### ३

पुरवणी अखबार छ २३ जिलकाद सन ११९५ हिजरी.

दुर्गोजी भापकर पांचसातसे स्वारानसी कोंडाईबारीचा घांट उतरून सोनगडचे रुखं गेले. व गणेशपंत बहिरे यांजसमीप हजार बारासे स्वार जमीयत आहे व दरीसमीप होते. सोनगडचे रुखावर इंगरेजांकडील जमीयत नांही. खाली मैदान पाहून गेले. व भापकराचे लष्करांत हमराही लोकांस रोजमरे पावत नाहीत व खर्चाची अडचड फार म्हणोन यैकिलें.

विसाजी कृष्टण बिनीवाले यांस यैसीं हजाराची जागीर कदीम होती ते बहाल जाहली व सनदा देण्याची परवानगी जाहली. साल मारीं पंतप्रधानांचे सरकारांत मामलतदारांची रसद बारापंधरा लाखपर्यंत आलीं व खर्च अद्यापेक्ष्यां अधिक याकरितां बालाजीपंतानीं समग्र कदीम मामलतदार नरसिंगराव मांडवगणे व धोंडो महादेव यांस बोलाऊन हरयेकाचे जातीस माहालांत आमिलाना व तहरीर काय मिळती याचा शोध मामलतदारांचे जुबानीं करून हरयेकाचे मकदुराप्रमाणें नजर रुपये घेत आहेत. नरसिंगराव मांडवगणे यानीं तिरुसष्ट हजार रुपये दिधले व धोंडो महादेवास लाख रुपये मागतात. याज प्रो किते-कानी दाहाबारा हजार रुपये दिधले. चालीस आसामी निवडिली आहे.

हैदरअलीखानाकडील वर्तमान कारपरदाजांचे जुबानीं व कलमी यैकिलें नांहीं. खारिज यैकिलें कीं, जनराल कूट इंगरेज खान मारावर गालिब व लढाई रूबकार आहे.

या उपरी जें वर्तमान नवल विशेष यैकण्यांत व प्रत्यक्ष होईल ते सूचना लिहीन हे विनती.

---

A. R. N. 138

२४ जिल्काद ११९५ हिजरी
११ नोव्हेंबर १७८१

श्री

विनंती विज्ञापना यैसी जे येथील कुशल ताा छ २४ माहे जिलकाद स्वामीचे कृपावलोकनेकरून येथास्थित जाणोन स्वानंद लेखनाज्ञा केली पाहिजे, विशेष. यथील वर्तमान छ २० माहे मजकूर रोज बुधवारी विनंतीपत्र प्रातःकाली सरकारचे डांकेसमागमे सेवेसी रवाना केले ते पावोन सविस्तर वर्तमान विदित जाले असेल. तदनंतर येथील वर्तमान - फरासीसाचा वकील येथे आला आहे हे सविस्तर वर्तमान पूर्वी विनंती-पत्री सेवेसी लेखन केले आहे, त्याजवरून विदित जाले असेल फरासी साच्या वकील नानाचे येथे आला होता. नानाची व वकीलाची भेट जाली. दोन घटका गोष्टी जाहजे वगैरेच्या जाल्या. उपरांतिक वकील मजकूर आपले डेऱ्यास गेले. वकील मजकूर श्रीमंतासीही भेट घेणार. श्रीमंताची व वकील मजकूर यांची भेट जाल्यावर लेखन केले जाईल. फरासीसाची जाहज सुरतेजवळ चंव कोसावर आहेत. आणिकही दाहा पांच जाहजे गोव्याजवल आली आहेत. पुढे ते जाहजे सुरतेकडे जाणार यैसे वर्तमान आहे. मागती तिकडील वर्तमान आल्यास लेखन केले जाईल, श्रुत होये दरबार वगैरे जाला होता. माहाली व मुलकी कामकाज जाले, विदित होये. छ २१ रोज गुरुवार राजश्री गोविदराव गायेकवाड दावडीहून हजार दीड हजार स्वारानसी येथे आले. खडकीचे पुलावर उतरले आहेत. उदईक गायेकवाड मजकूर यांची व श्रीमंताची भेट होणार. गायेकवाड मजकूर यांची उभारणी करून गुजरात प्रांती पाठ-विणार यैसे पूर्वी विनंतीपत्री लेखन केले होते त्याजवरून श्रुत जाले

असेल. गायेकवाड मजकूर यांणी दाहा हजार फौज ठेवावी. काही पैका गायेकवाड मजकूर याणी दिवान उभा करावा. त्यानी द्यावा व कांही पैक्याची यौजना सरकारातून करून त्याची उभारणी करावी त्यांस गुजरात प्रांती पाठवावे, यैसा निश्चये केला आहे. त्यांस गायेकवाड मजकूर याणी दिवान गणपतराव कोलटकर केले आहेत. त्यानी लाख पनास हजाराचा साहुकारा केला. कारभारी याणीही सरकारातून पुरता पैका द्यावा तरी त्यानी नेमल्या प्रो फौज ठेवावी. त्यास प्रस्तुत सरकारात पैक्याची वोढ. अशा वोढीतही लाख पनास हजार रुपये त्यांस देऊन त्यांची उभारणी करून, आणिकही सरकारची फौज देऊन गुजरात प्रांती पाठवावे यैसी योजना केली आहे. प्रस्तुत गायेकवाड मजकूर याणी राऊती दररोज पाव रुपये देऊन, हजार दीड हजार राऊत मेलऊन येथे आले आहेत. पुढे त्यांची सरदारीचा काये बंदोबस्त करून त्याची रवानगी गुजरात प्रांती केल्यास हे सविस्तर ध्यानास आलिया सेवेसी लेखन केले जाईल, श्रुत होये. राजेश्री सखाराम पानसे व शहाजी भोसले यांचे पुत्र वगैरे यांचे कूच आद कोसाचे होऊन संगम उतरून नदीपार मुक्काम जाला. पानसे व शाहाजी भोसले यांचे पुत्र मिळोन पांचसातसे राऊत आहेत. कोकणचे शुमारे तलेगांवास जातात. वदंता आहे कीं इंग्रजाची पलटणे कल्याणीहून पुढे चाल करणार. या अर्थी पानसे वगैरे यांची रवानगी सत्वर जाली आहे. श्रुत होये. होलकरही वाफगावाहून येथे येणार. होळकराकडील दोनतीन हजार फौज व येखादा सरदार राजश्री गणेशपंत बेहरे याजकडे पाठविणार. वर्तमान आहे की गणेशपंत बेहरे कोंडाईबारी उतरून खाले गेले. फौज वगैरे जमा जाल्यानंतर पंत मजकूर सुरतेकडे जाणार कारण कीं फरासीसाची जाहजे सुरतेकडे आली आहेत. त्याणी जाहजातून सुरतेस उपद्रव करावा व इकडून खुशकीतून गणेशपंत वगैरे याणी जाऊन उपद्रव करावा या अर्थी गणेशपंत सुरतेकडे जाणार म्हणोन वदंता आहे. श्रुत होये. होलकराचे दिवाणगिरीस राजश्री नारो गणेश आहेत. प्रस्तुत राजश्री दादाजी गंगाधर याणी सरकारांत नजर कबूल करून दिवाणगिरीचे काम करून अहिल्याबाईपासी राहावे, माली मुकदम्याचे काम करावे, नारो गणेश याणी

होलकरापासी राहून फौजेचा मात्र कारभार करावें अैसी घटवटना होते. मग काये निश्चये होऊन ठरल ते सेवेसी लेखन केले जाईल, श्रुत होये. आमृतसिध्धी योग मुहूर्त चांगला म्हणौन नाना बाहेर डेरे दाखल होणार यैसी वदंता होती. ते रहित होऊन नाना बाहेर निघोन डेरे दाखल जाले नाहीत. आपले वाडयातच आहेत. डेरे दाखल जाल्यास लेखन केले जाईल, श्रुत होये. छ २२ रोज शुक्रवार, कर्णयेल गाडर इंग्रज ममईस आहे. पुढे तो कल्याणीस येऊन पुढे चाल करणार, यैसी वदंता आहे. त्याजवरून पानसे वगैरे यांची रवानगी जाली आहे. आणि कही पथके नेमून रवाना करणार. प्रस्तुत पानसे वगैरे खडकीचे पुलावर आहेत. पुढे कूच करून तलेगावाकडे जाणार, श्रुत होये. प्रातःकाली नाना हरीपंताचे डेरियास गेले होते. उभयेता खलवत जाला. उपरांतिक नाना आपलें घरास आले. खलवतीचा भाव यैकिल्यात आला कीं फौज वगैरे जमा करून येखादा सरदार व गोविंदराव गायेकवाड वगैरे यासमागमे फौज देऊन गुजरात प्रांती रवाना करावे. व काही फौज व येखादा सरदार कोंकण प्रांती तलेगांवकडे रवाना करावें याअन्वये खिलवत जाला, श्रुत होये. राजश्री हरीपंत गोविंदराव गायेकवाड याचे डेरियास गेले होते. त्याच्या भेटी होऊन हरीपंत आपल्या डेरियास आले. संध्याकाली रो गोविंदराव गायेकवाड श्रीमंताचे भेटीस वाडयांत आले होते. नानाही श्रीमंताजवळच होते. श्रीमंताच्या व गोविंदराव गायेकवाड यांच्या भेटी जाल्या. भेटी होऊन गायेकवाड मजकूर दोन घटिका बसले होते. पाने व अतर वगैरे समारंभ होऊन उपरांतिक गायेकवाड मजकूर आपले डेरियास गेले. गायेकवाड यांस आणावयास इस्तकबाल राजश्री आपा बलवंत व माधवराव सदासिव गेले होते. प्रस्तुत गायेकवाड मजकूर हजार बारासे स्वारानसी येथे आले आहेत. पुढे त्याचा काये बंदोबस्त करितील हे लेखन केले जाईल, श्रुत होये. छ २३ रोज शनवार, हरीपंत कूच करून खडकीचे पुलावर जाणार यैसी वदंता आहे. गेल्यास लेखन केले जाईल, श्रुत होये. हैदर नाईकाकडील वर्तमान आंहे कीं इंग्रजासी व त्यासी लडाई मातबर जाली. मनुष्ये बहुत जायां जाली. व येकदोन सरदारही पडले. इंग्रज त्याजवर

गालब आहेत. नाईक मजकुराचे लस्करांत महर्गता फार जाली आहे. इंग्रजानी येकदोन ठाणीही घेतली यैसी वदंता आहे. मागती तिकडील वर्तमान आलियास लेखन केले जाईल, श्रुत होये. फरासीसाचा वकील येथे आला आहे. कारभारी यासी व त्यासी भेट मात्र जाली. पुढे त्यासी व कारभारी यासी खलबत होऊन काये जे वर्तमान होईल ते सेवेसी लेखन केले जाईल, विदित होये. पुढे जे प्रसगाचे वर्तमान ध्यानास येईल [illegible] लेखन केले जाईल. बहुत काय लिहिणे, कृपालोभ कीजे हे विज्ञाप्ती.

---

**A. R. No. 139** २५ जिल्काद ११९५ हिजरी

१२ नोव्हेंबर १७८१

श्रीनिवास

पोष्य हैबतराव गोपाळ सां नमस्कार विनती उपरी, येथील वर्तमान ता। छ २५ जिलकादपर्यंत मो। पुणें स्वामीचे कृपेकरून क्षेम जाणून स्वानंद लेखनाज्ञा केली पाहिजे. विशेष इकडील राजकी वर्तमान पय दरपय डांकेवर लिहून हुजूर व स्वामीचे सेवेसी पाठवितों त्यावरून श्रुत होत आहे. सांप्रत हुजूर अर्जी पाठविली ते गुजरेल. करनल गाडर मुबईस आला व पनवेलीपर्यंत तीन पलटणें जमीयत आली हे वर्तमान येथील कारपरदाजानीं यैकिल्यानंतर सखाराम पानसे यांसमागमें अकलकोटकर शाहजी भोंसल्याची फौज भवानजी भोंसल्यासमागमे आली ते व पांच जरब तोफा व हजार बारासे गाड(दी) देऊन तळेगांवास पाठवायाचा उद्योग केला आहे. प्राचीन कमाविसदारापासून हरयेकाचे रोजगाराप्रमाणें व प्राप्तीनुरूप दांहावीस पना(स) हजारपर्यंत रुपये घेत आहेत. नरसिगराव मांडवगणे यानी साठ हजार रुपयेही दिले. धोंडो माहादेवास लाख रुपये मागत आहेत. कमाविसदार रजावंदीनें रुपये देतात. या वर्षी पंतप्रधानाचे सरकारांत रसद बारा पधरा लाखपर्यंत आली. याकरितां रुपये मिळवावयाचा उपाय अनेक प्रकारचा कारभारी करीत आहेत. राजश्री रावजी हुजूर आले

आहेत. सर्व प्रकारे यजमानसाहबांचे दौलतख्वाह व सलाहकार व राजश्री गोविंदराव भगवंत निवळ आहेत. सहवासेंकरून रीती ध्यानास आली असेल. बरे योग्य जमानेसाज आहेत. राजश्री जिवाजीपंताचा व माझा कामाचे प्रसंगी सहवास नांहीं. परंतु सर्वत्रांचे स्नेहित स्वामीसीं तरी आकृत्रिम स्नेहितपणाची वर्तणूक करीत आहेत. आमचे यजमानसाहबांचे सग्रहीं उमदीं कामें व समग्र प्राप्ती इकडील ग्रहस्तांस जाहलियां यांचा बहुत संतोष व यजमानासमीप यांजपेक्ष्यां दुसऱ्यांचा उरूज नसावा व यजमानसाहबांसमीप पोख्त सलाहकार व हिमतीचा व हौसलेदार कोण्हीच नांहीं हा निश्चय त्रिवर्गांचा आहे बरें. श्री राजश्री रावजीस येश देवो व आमचे येजमानसाहबांस लाभ होऊन श्रीमंत पंतप्रधान स्वामीचे उपयोगी साहित्यांस मुतवजे होत तो अर्थ घडावा हे इछा आहे. बहुत काय लिहिणें हे विनती.

---

**A. R. No. 140**

२७ जिल्काद ११९५ हिजरी
१४ नोव्हेंबर १७८१

पैा छ ५ माहे जिल्हेज सन ११९५ हिजरी, गुरुवार दोन प्रहर दिवस मये दारोगे हरकारे.

श्रीनिवास १/५

पोष्य हैबतराव गोपाळ सांा नमस्कार विनती उपरी, येथील वर्तमान ताा छ २७ जिलकाद, कार्तिक वद्य चतूर्दसी, सौम्यवासरपर्यंत स्वामीचे कृपेकरून वास्तव्य पुणें क्षेम जाणून स्वानंद वृत लेखनाज्ञा करावी. विशेष पूर्वी छ २३ पर्यंत वर्तमान लिहून छ २४ माहे माारीं पत्रें हुजूर व स्वामीचे सेवेसी डांकेवर रवाना केलीं तें सेवेसी पाऊन वर्तमान कळलें असेल. त्यानंतर इकडील वर्तमान प्रत्यक्ष व यैकिलें सांप्रदायाप्रमाणें हुजूरअर्जी व अखबार व स्वामीचे सेवेसी पृथक पत्रीं

वर्तमान लिहिलं आहे त्यावरून श्रुत होईल. येथील कारभाऱ्यांचा सांप्रदाय प्राप्तकर्माचा प्रयत्न करीत आहेत. दूरअंदेशा करून भांवीं होणाराची तडजोड होत नांहीं याचें कारण भांवी होणार निश्चयरूप होईल म्हणोन कयास किमर्थ करावा. अकस्मात परिहार कां न व्हांवें याकरितां पेशबंदीची तरतूद करीत नांहींत. सिपाही लोक हुजराती यांस व नालबंदी व समजाविसीपैकीं येक रुपया दिल्हा नांहीं. समय प्राप्त होईल ते समई देऊं. याकरितां चालढकल करीत आहेत. बहुत काय लिहिणें हे विनती.

---

पैा छ ५ जिल्हेज सन ११९५ हिजरी, गुरुवार.

श्रीनिवास

अखबार पुणें, अज इा २४ जिलकाद लगायत छ २७ बुधवार सन ११९५ हिजरी, कार्तिक वद्य चतुर्दसी.

छ २० माहे माारीं मुसा मूती वकील फरासीस यानें बाळाजीपंताची भेट घेतली व छ २३ रोजी खिलवत पंत माारनुलेसी व फरासीसाचे वकीलासीं जाहली. छ २२ रोजी गोविंदराव गाइकवाड यानी पंतप्रधानाची भेट घेतली व करनल गाडर मुंबईहून कल्याणीस आला व करनलचे गडास माहासरा करणार. पंतप्रधान यानीं सखाराम पानसे दारोगे तोफखाना यांस तळेगांव बोरघांटास जावयाकरितां रवाना केलें. मुळा मुठाचे संगमासमीप जाऊन उतरला व करनल मेवर बमोजिब करार माहदाजी सिंदे यांचे रुखाहून माघारा यमुनातीरास दोन मजली गेला. यावितरिक्त अवांतर वर्तमानासहित छ २४ माहे माारीं हुजूरअर्जी व अखबार व स्वामीचे सेवेसी पत्र डांकेवर पाठविलें तें पाऊन वर्तमान कळलें असेल. त्या उपरी प्रत्यक्ष व यैकिलें वर्तमान दफेवार लिहिलें असे.

करनल मेवर सिपरीकोलारसासमीप माहदाजी सिंद्याचें मुकाबिल्यास होता तो बमोजिब करार तोफा व हाती वगैरे सरंजाम शबखुनांत सिंदे मा।राकडील मेवराकडें सरजाम आला होता तो गोहदकर

जाट व सिवाजी विठल यांचे मारफातीनें माहदाजी सिंद्यास माघारा देऊन, मेवर मार कालपी यमुनातीराचे रुखं दोन मजली माघारा गेला. याप्रमाणें सिंदे मारानी वर्तमान लिहून पाठविलें आहे म्हणोन येथील कारपरदाजाचे जुबानीचें वर्तमान यैकिलें. सिंद्याचे वकील याचे जुबानीं याचप्रा यैकिलें. खारिज चर्चा यैकिली कीं मेवर इंगरेज कांहीं दिवस यमुनातीरीं राहून पुन्हां सुरतेस येणार. काबू पाहून च्यार दिवस दफयुलवक्ती केली आहे.

करनल गाडर मुंबईहून कल्याणीस आला व करनालचे गडास माहासरा करावयाची तजवीज आहे म्हणोन पूर्वील पत्रीं खारिज वर्तमान यैकिल्याप्रमाणें लिहिलें आहे. सांप्रत यैकिलें कीं गाडर मारानें कल्याणीस येऊन बदलापूरपर्यंत पलटणें पाठविलीं व सालीचें पीक तयार जाहलें आहे. साली समग्र कोंकण प्रांतीच्या जमा करून वसई व मुंबईस व कल्याणीस नेऊन जमा करीत आहे व करनालचा किला व पेम बंदर पनवेलीहून तीन कोसाचे फासल्यानें आहे व मकान मजबूत व ठाणें पंतप्रधानांकडील कल्याण व पनवेलीसमीप याकरितां माहासरा करून करनाल व पेम दोन्हीं मकानें घ्यावीं याप्रकारें करनल गाडराची तजवीज आहे म्हणोन खारिज वर्तमान यैकिलें. गाडर मार कल्याणीहून पुन्हां मुंबईस गेला व वसई व पनवेलीस आमदरफ्त करीत आहे म्हणोन यैकिलें.

पैा छ ५ जिल्हेज सन ११९५ हिजरी, गुरुवार.

२

पुरवणी अखबार, छ २७ जिलकाद सन ११९५ हिजरी.

सखाराम पानसे दारोगा तोफखाना यांस बोरघांटाचे रुखें जावयाकरितां रवाना केलें तें पुण्याहून पाव कोस मुला मुठाचे संगमासमीप उतरले आहेत म्हणोन पूर्वी लिहिलें आहे. त्यास भवानजी भोंसले निा शाहजी अंकलकोटवाले यांचे पांचसे स्वार व पानस्यांचे दोनतीनसे स्वार व पांच जरब तोफा छ मारपर्यंत मुकाम मारीं आहेत. गाडराचे हरकतीप्रमाणें

पानसे मा।र कूच करून जातील. रघुनाथराव सुरतेसमीप आहेत म्हणोन पूर्वी खारिज वर्तमान यैकिल्याप्रा लिहिल आहे. सांप्रत खारिज यैकिलें कीं राव मा।र व सटवाजी भोंसले व बाजीराव बरवे वगैरे पांच हजार स्वार व येक पलटण व दाहा जरब तोफासहित सुरतेहून कूच करून वसईस यावयाकरितां नवसरघनदेवी म्हणोन मकान खडकें बोरें सुरतेहून दाहाबारा कास तेथें आले. वसईस जाणार. येथील कारपरदाजांचे जुबानीं तहकीक नांहीं.

कृष्टणराव बलाळ यांचीं पत्रें छ १९ माहे मा।रचीं छ २६ माहे मिनहूस गोविंदराव कृष्टण यासमीप आलीं. मा।रनुलेनीं बालाजीपंतास दाखविलीं व छ २७ माहे मा।र बुधवारी बालाजीपंत हरीपंताचे डेऱ्यास तिसरा प्रहरास गेले. दोन घटका रात्रपर्यंत खिलवत करीत होते. कोण्हीं स्नेहिताचे द्वारें वर्तमान यैकिलें कीं हैदरअलीखान हुजूरचे ताबेदारींत रूजू जाहल्यावितरिक्त इंगरेजांचे तंबीचा अज्म हुजूरीहून होत नांहीं म्हणोन कृष्टणराव यानीं येथील कारपरदाजास लिहिलें आहे. त्यास येथील कारपरदाज हुजूर अर्ज करावयाचा मा।र राव मा।रनुलेस लिहिणार आहेत कीं हैदरअलीखानानें मोतमद हुजूरचें होऊन रुजू राहांवें येविषईं खान मा।रास पत्रें लिहिलीं आहेंत व पुन्हां लिहितों, व निश्चयरूप रुजू होईल. परंतु हजरत बंदगानआलीनीं इंगरेजांकडील मिस्तर ज्यान हालन व नववारद इंगरेजाकडील वकील जो आला आहे त्यास साफ सांगावें कीं सिकाकोली मछलीबंदर तालुका बमये किले सोडणें. न सोडाल तरी तंबी वाकई होईल. व वकीलास रुखसत करून सिकाकोल राजबंदरीचे रुखं मुतवजे मोहीम व्हांवें म्हणजे हैदरअलीखानास यकीन होईल कीं हजरतेनी नकशा केला त्याप्रमाणें इंगरेजांचे तंबीस अज्म जाहले या उपरी आपण हुजूरचे ताबेदारींत कमरबस्ता होऊन रुजूं व्हांवें व होईल. इंगरेजांचे वकीलास हुजूर ठेऊन सिकाकोल वगैरे प्रांत तसखीर करावयाचा अज्म न जाहल्यापक्षीं, खान मा।र वहमनाक अनेक प्रकारचे चिंतात संशय आणील याप्रमाणें कृष्टणराव बलाल यांस कारपरदाज प्रत्योतर लिहिणार म्हणोन यैकिलें,

छ २५ माहे मारीं हैदरअलीखानाचीं पत्रें कारपरदाजास व नूरमाखान व नरसिंगराव यास आलीं. छ मारीं त्रितीय प्रहरीं लक्ष्मणराव रास्ते व उभयतां वकील बालाजीपंतासमीप जाऊन च्यारपांच घटका खिलवतेंत होते. त्या उपरी वकील मार व रास्ते रुखसत घेऊन गेले. हैदरअलीखानाकडील ज्वाबसाली खिलवतेंत कृष्टणराव बलाळ बमोजिब तलब कारपरदाज येत होते. सांप्रत कृष्टणराव यांचे पुत्र गोविंदराव शरीक खिलवत नसतेत. गाह ब गाह बालाजीपंतानीं बोलाविल्यास जात आहेत.

---

पैा छ ५ जिल्हेज सन ११९५ हिजरी, गुरुवार.

३

पुरवणी अखबार, छ २७ जिलकाद सन ११९५ हिजरी.

हैदरअलीखानाकडील वर्तमान व पत्रें येथील कारपरदाजास येक महिना येत नांहींत म्हणोन पूर्वीं दोनतीन अखबारेंत पय दरपय लिहिलें आहे. येथील कारपरदाजानीं खान माराकडील बातनीकरितां जासुदांच्या जोडचा मुजरद रवाना केल्या होत्या. त्या लश्करास न जातां काळहस्तीसमीपचे घांटापासून माघारा परतून पुण्यांस आल्या व छ २५ माहे मारीं नूरमाखान व नरसिंगराव याचे विद्यमानें पत्रें आलीं व खिलवत जाहली. वकीलांस रुखसत केल्यानंतर गोविंदराव कृष्टण यास बोलाऊन नेऊन बालाजीपंतानीं खान माराकडील पत्राचा मार सागितला कीं चेतसिंग जमीदार कासीकर यानें गोरनर मेस्तर हिस्तैन यास दस्तगीर केलें हें वर्तमान यैकिल्याप्रमाणें आम्हीं हैदरअलीखानास लिहिलें हातं. त्याचा दर जवाब पाठविला आहे कीं गोरनरास दस्तगीर केल्याचें पुन्हां तहकीक वर्तमान जें आलें असेल तें लिहून पाठवणें. व हिस्तैन मारास आपल्याकडे आणऊन सख्त कैदेंत ठेवणें इतकाच मार लिहिला आहे. अमुके जागा आपण आहोंत व इंगरेज कोठें आहेत हें कांहीं वर्तमान लिहिलं नांहीं. पत्रें डांकेवर आलीं याकरितां जासुदांचे जुबानीही तहकीक होत नांहीं. याप्रमाणें गोविंदराव

कृष्टण यांस बाळाजीपंतानीं सांगितलें व सेवकानें गोविंदराव यांचे जुबानीं यैकिल्याप्रमाणं लिहिलं आहे. कृष्टणराव जोसी वकील यानें पत्र कां न पाठविलं म्हणोन गोविंदराव यांस पुसिलें. मा।रनुलेनीं उतर केलें कीं पत्रें रवाना करावयाविषईं कृष्टणराव जोसी स्वतंत्र व

-----

पौा छ ५ जिल्हेज सन ११९५ हिजरी, गुरुवार.

४

पुरवणी अखबार छ २७ जिलकाद, सन ११९५ हिजरी.

मख्तार नांहींत. कागद लिहून हैदरअलीखानास वाचून दाखऊन इकडें रवाना करीत आहेत, म्हणोन उतर केलें. पंतप्रधानाकडील जासूदजोडच्या हैदरअलीखानाचे लश्करास कृष्टणराव जोसी वकीलाकडें रवाना जाहल्या होत्या, त्या घाटापर्यंत गेल्या. घांटापासून चिनापटणकर इंगरेजांच्या चौक्या हरयेक जागा मुस्तकीम बसल्या आहेत व हरकारे व कागदपत्र जांऊ देत नांहीत. याकरितां हरकारे मा।र कनोळेस आले व कनोळेंत पंतप्रधानांचे तरफेचा वकील आहे त्याचें पत्र कारपरदाजांस घेऊन छ २४ माहे मा।रीं पुण्यास आले व जुबानीं वर्तमान कारपरदाजांस सागितलें व कनोळकर वकीलानेंहीं अकसर लिहिलं असेल. परंतु कारपरदाजानीं तकयुद बहुत केलीं व वर्तमान प्रसित्धींत आणिले नांहीं. परंतु जासुदांचे जुबानीचें वर्तमान प्रसित्ध जाहलें व खारिज यैकिलें कीं, हैदर नायकास कर्नाटक प्रांतीचे पाळेगर जे शरीक जाहले होते ते समग्र मुतफिक होऊन खान मा।रापासून अलाहिदा होऊन करनल कूट इंगरेजास शरीक जाहले व तीस पलटणें जमीयत इंगरेजांची जमा जाहली. व खान मा।रासीं सफेजंग मुकाबिल लढाई मातबर जाहली. हैदरअलीखानाकडील उमदे सरदार पडले व घोडीं व माणसें पसुमार कामास आलीं. ते समईं मुकाबिल लढाईचा ताब न राहिला व पसपा होऊन माघारा निघाला. इंगरेजानीं ताकुब केला ते समईं तोफा वगैरे जिनसींचा सरंजाम राहिला व इंगरेजांचे हस्तगत जाहला. खान मा।र आरकाटपर्यंत आला. हमराह वीस पंचेवीस हजार फौज जरीदा

आहे. बहिर व बुनगा पूर्वीच अलाहिदा केला होता. इंगरेजानीं पाळे-गरांचे इतिफाकानें तमाम घांट बंद करून रसद बंद केली. खान मााराचे लश्करांत गिरानी बहुत जाहली. रुपयास दीड सेर पीठ जाहलें व लश्करी लोक तमाम बेदिल व पर्जन्याची वृष्टी अतिशय. घोडीं फार जांया जाहलीं. या उपरी क्षेमतेनें घांट चढून जावयाचा संशय खान माारास प्राप्त जाहला आहे म्हणोन खारिज यैकिल्याप्रमाणें लिहिलें आहे. येथील कारपरदाजासमीप तहकीक नांहीं.

बादामीचे किल्यापासून हैदरअलीखानानें आपले लश्करापर्यंत डांक बसविली आहे. त्या डांकेवर पत्रें अजीपर्यंत बादामीस येतात व तेथोन पुण्यास जलदरव हरकारे पत्रें घेऊन येत आहेत. सांप्रत येथील कारपरदाज व नूरमााखान याचे सलाहानें निश्चय जाहला आहे कीं पुण्याहून बादामी येकसेवीस कोस आहे. हैदरअलीखानाकडील येक जोडी व पंतप्रधानाकडील येक जोडी च्यार कोसाचे तफावतीनें बस-वावी. बहुतकरून डांक बसेल. सेवेसी श्रुत होय. या उपरी जें वर्तमान नवल विशेष होईल, तें सेवेसी विनती लिहीन हे विनती.

**A. R. No. 141** २८ जिल्काद ११९५ हिजरी

१५ नोव्हेंबर १७८१

पैाा छ ५ जिल्हेज सन ११९५ हिजरी, गुरुवार.

श्री

विनंती विज्ञापना यैसी जे. येथील कुशल ताा छ २८ माहे जिल-काद, मुाा काा पुनें, स्वामीचे कृपावलोकनेकरून येथास्थित जाणोन स्वानंद लेखन आज्ञा करीत आसिले पाहिजें. विशेष, येथील वर्तमान छ २४ माहे माार रोज रविवारी प्राथःकाली विनंतीपत्र सरकारचे डाकेंसमागमें सेवेसी रवाणा केले ते पाऊन सविस्तर वर्तमान विदित

जालें असेंल. तदनंतर येथील वर्तमानं फरासीसाची ज्याहजें सुरते-
जवल आले आहेत. मागूनही आनिख त्याचे ज्याहजे सुरतेकडे येणांर
यैसे वर्तमान येथे होते. प्रस्तुत वर्तमान आहे कीं फरासीसाची एकदोन
ज्याहजे थोर सुरतचे बंदराकडे आली होतीं. ते ज्याहाजे मागती
माघारा गेलीं यैसी वंदता आंहे. मागंती तिकडील वर्तमान आल्यांस
लखन केले जाईल, श्रुत होये. फरासीसाचा वकील येथे आला आहें.
कारभारी याची व त्याची भेट जाली हे वर्तमान पूर्वी लेखन केले होते
त्याजवरून श्रुत जाले असेंल. वकील माार यानी कारभारी यांसी
पैगामं केला आहे की आम्हांस दाहां पाच लक्ष रुपये खर्चास द्यावें. आम्ही
ज्याहजे वगैर तयार करूनं इगरेजांचे पारपत्य करितो. त्याजवरून
कारभारीही वकील मांार यासी समाधानपूर्वक गोष्टी सांगतात
यैसी परसपरें भाशनें होतांत. पुढे काये निश्चयें होऊन अमलात येंईल
हे ध्याणांस आलिया लेखन केले जाईल, श्रुत होये. छ २५ माहे मांार
रोज सोमवार राजश्री सखाराम पानसें व शाहजी भोसले याचे पुत्र
वंगैर याची रवानंगी कोकन प्रांती तलेगावाकडे जाली आहें. त्यास
पानसें माार वंगैरे येथून दो कोसाचे कूच करून तलेगावाचे शुमारे गेले
श्रुत होये. सुरापूरकरासी व रायेदुर्गकरासी काह्नी हर्शामर्श आहें.
याजकरिता सुरापूरकराचे वकील कारभारी यांसी विनंती करितात
कीं सुरापूरकरास आणून आपणांस भेटवितो. त्याचे साहित्य करून
रायेदुर्गवाल्याचे पारपत्य होये यैसा आर्थ जाला पाहिजे यैसी रदबदली
आहें. मग काये निश्चयें होऊन ठहरल तो ध्याणास आलिया लेखन केले
जाईल, श्रुत होयें. हैदर नाइकाकडील वर्तमान आहे की नाईक माारासी
व इंगरेजांसी चिनांपटनाकडें लडांई मातबंर जाली. नाईक माार सिक-
स्त होऊन माघारां निघालें. मणुशे बहुत जाया जांली. नाईक मााराचे
पुत्रासं जखमा आल्या. त्याचा जावई सावनूरकर वांर पडला यांप्रो
लडाई होऊन नाईक माार माघारा निघालें. इगरेज त्याचा पाठलग
करून आहेत. यैसी वंदता आहें. मागती त्याजकंडील वर्तमान आल्यासं
लेखन केले जाईल, श्रुत होयें. नाईक माार याजकडील वकील नूरखान
वंगैर दरबारासं आले होते. नानांसी व वकील माार यासी खलबत

जाला. खलबतेचा भांव यैकिल्यात आला कीं नाईक मारासी व इगर-जासी लंडाई जाली हे वर्तमान वकीलानी कारभारी यांस सांगितले. आनिख राजकारनी कितेक बोलने जाली. भाशने वगैर होऊन नाईक मारांस पत्रे ल्याहवी यैसा निश्चये ठहरला. त्यास नाईक मारांस पत्रे वगैर लिहिणारं श्रुत होये. दरबार वगैर जाला होता. माली व मुलकीं वगैर कामकाज जालें विदित होये. छ २६ रोज मगलवांर, करनैल गाडर इगरज ममईस आहें. दोनतीन पलटनें कल्यानीस आहेत. गाडर मांर जमांवासहित कल्यानीस येऊन पुढे चाल करणांर. प्रस्तुत वर्तमान आहे की कल्यानीहूनं दोन पलटनें तीनच्यार कोस पुढे चवक्यांवर आलेत कारन कीं कोंकन प्रांतीच्या साली वगैर जमा करूंन ममईस नेतात यैसी वंदता आहे. त्याजवरून पानसे वगैर याची रवानंगी जाली आहें. मागून बाजीपंत वगैर याचीही रवानगी करणांर, श्रुत होये. राजश्री विसाजीपंत बिणीवालें याची उभारनी करितात हे पूर्वी लखन केले होते त्याजवरून श्रुत जाले असेलं. त्यास विसाजीपंतांस काही नूतनं जागीरीचे माही वगैर देऊन उभारनी करूनं त्यास मोहीम सागणांर यैसे आहे, विदित होये. नाना हरीपंताचे डेरियात गेले होते. नानाचा व हरीपंताचा खलबत जालां. भाव यैकिल्यात आला कीं कृष्णरावजीकडे पत्रे लिहिणार. दुसरी वंदता आहे की सोलापूरचा किला व काही माहलं सरकारांत देऊन येजमानसाहेबाचा संतोश ठेवणांर यैसे यैकिल्यात आलें विदित होये. छ २७ रोज बुधवांर, राजश्री मानाजी फाकडें परळीकडें बालेघाटांवर कोठे आहें त्यानी दोनच्यारसे स्वार जमा करून धूंमधाम करितो. येक दुसरे गाव त्यानी मारिले यैसे वर्तमान आहें. श्रुत होये. हरीपंताजवलं आद्याप नेमिल्याप्रो फौज जमा जाली नाही. तमाम लोकांस वगैर पत्रे पाठविली आहेत लोक येणांर. पैक्याची वोढ म्हणोन लोक दरेकसी करून जमा होंणार. प्रस्तुत हरीपंताचे डेऱ्याजवलं दानेक हजार फौज जमा आहें, विदित होये. पुढे जे प्रसगाचे वर्तमान ध्यांनास येईल ते लेखन केले जाईल. बहुत काय लिहिणे कृपालोभ कीजे, हे विज्ञाप्ती.

———

A. R. No. 142

१ जिल्हेज ११९५ हिजरी
१८ नोव्हेंबर १७८१

पैा छ ९ माहे जिल्हेज सन ११९५ हिजरी, सोमवार दोन घटका रात्र, मै जोडी मार, दारोगे सरकारं

श्रीनिवास

पोष्य हैबतराव गोपाळ सां नमस्कार विनती उपरी यथील वर्तमान ता छ १ जिल्हेज, मार्गसीर्ष शुध त्रितीया, रविवारपर्यंत स्वामीचे कृपेकरून पुण्यांत क्षेम जाणून स्वानंद लेखनाज्ञा केली पाहिजे. विशेष, कृपापत्र छ १९ जिलकादचें डांकेवर रवाना जाहलें तें चिरजीव राजश्री राय रघोतमराव यांचे लिफाफ्यासहित छ २८ जिलकादी पाऊन पत्रावलोकानीं संतोष जाहला. इकडील अखबारेसहित छ २८ जिलकादीं अरुणोदईं सेवेसी विनतीपत्र चिरंजीवांचे नांवचे पत्रांसहित व हुजूरअर्जी व अखबार डांकेवर रवाना केली ते दारोग्याचे विद्यमानें हुजूर व स्वामीचे सेवेसी पत्र पावलें असेल. सांप्रत हुजूरअर्जी व अखबार व सेवेसी अखबार पृथक पुरवण्या लिहिल्या तें पत्र दारोग्याचे विद्यमानें पावेल. हुजूरीहून पूर्वी नकशा इंगरेजांचे तंबीचा जाहला व हजरत खुदावंदन्यामत यानीं सिकाकोल राजबंदर प्रांताचे तसखीर करावयाचा अज्म केला म्हणोन जिवाजीपंत सदैव येथील कारपरदाजांस लिहीत होते. परंतु हुजूरीहून दोनतीन वार सेवकास इनायतनामे सादर जाहले त्यांत इरषाद होता कीं सिकाकोल वगैरे प्रांतास हुजूरीहून मोहिमेचा अज्म करावा हा नेम जाहला नांहीं. येणप्रा बालाजीपंतास सागणें. सांप्रत मध्यस्तानी येथील कारपरदाजास सूचना लिहिली आहे कीं इंगरेजाची तंबी करावी व सिकाकोल वगैरे इंगरेजांचे तसरुफी प्रांत तसखीर करावयाविषईं हुजूरीहून निश्चय व करार जाहला होता. येणेंप्रमाणें हजरतेचे जुबान मुबारकेनें साबत केलें. परंतु मर्जी पूर्वील करारावर कायम नांहीं व हैदरअलीखानानें पशकसीबाा रुपये देऊन हुजूर रुजू व्हांवें हे शर्त नवीन उत्पन्न केली

आहे. याप्रमाणें मध्यस्तानीं येथील कारपरदाजास लिहिलं आहे म्हणोन यैकिलें. सेवेसी श्रुत होय. बहुत काय लिहिणे हे विनती.

---

पैाा छ ९ जिल्हेज सन ११९५ हिजरी, सोमवार दोन घटका रात्र मै जोडी सरकार.

श्रीनिवास

अखबार पुणें अज इाा छ २८ जिलकाद लगायत छ १ जिल्हेज सन ११९५ हिजरी, मार्गसीर्ष.

करनल गाडर मुंबईंत राहून बदलपूरपर्यंत पलटणें पाठविलीं व करनाल पेम येथें माहासरा करावयाची तजवीज केली व माहदाजी सिंद्याचे रुखावर मुकाबिल्यास करनल मेवर पलटणासुधां होता तों दोन मजली माघारा यमुनातीर कालपीचें रुखं गेला व हैदरअली-खानासी व इंगरेजांसीं मुकाबिल लढाईंत खान माारांची सिकस्त होऊन पसपा जाहला व हाती व तोफा इंगरेजांचे हस्तगत जाहल्या म्हणोन व यावितरिक्त अंवातर वर्तमानासहित हुजूरअर्जी व अख-बार व स्वामीचे सेवेसी पत्र पाठविलें तें पाऊन वर्तमान श्रुत जाहलें असेल. त्या उपरी प्रत्यक्ष व यैकिलें वर्तमान लिहिलं असे.

हैदरअलीखान व करनल कूट चिनापटणवाला या उभयतांचे लढा-ईंत खान माारांची सिकस्ता बेतऱ्हा होऊन खराबी बंहुत जाहली म्हणोन पूर्वील अखबारेंत वर्तमान लिहिलं आहे. सांप्रतहीं खान माा-रांची सिकस्त व खराबी बहुत जाहली हेच चर्चा सर्वतोमुखी प्रसित्ध आहे. पंतप्रधानाचे कारपरदाजांचे सांगण्यांत खान माारासमीप वकील आहे त्याचें व अन्यत्र कलमी खबर आली नांहीं. बादवाही शोहरतेचा निश्चय होत नांहीं.

रघुनाथराव च्यारपांच हजार फौंज व येकदोन पलटणासुधां नवसरघनदेवीस आले म्हणोन पूर्वीं लिहिलं आहे. सांप्रत खारिज यै-किलें कीं चिंचणी तारापूर वसईहून सोळा कोसाचें फासल्यानें आहे,

तेथें आले व वसईस येणार म्हणोन यैकिलें. कारपरदाजांचे जुबानी तहकीक नांहीं.

वासदें म्हणोन त्र्यबकीहून वीस कोस घांटाखालें कोळ्याचें मकान मवासा आहे तेथें तीन पलटणें जमीयत गाडराची आली व कोळ्याचे इतिफाकानें काबू पाहून घांटावरील कोण्हीयेक गड दग्यानें घेणार म्हणोन खारिज यैकिलें. परंतु धोंडो माहादेव त्र्यंबकचा किलेदार यास नजर मागत होते ते मवकूफ करून गडाचे खबरदारीकरितां सत्वर रवाना करणार आहेत.

करनल गाडराची पलटणें बदलापूर व कल्याणी व पनवेलीस पूर्ववत आहेंत. सालीचा धान्यसंग्रह समग्र आपले मुतसरफी तालुकियांतील केला.

---

पैा छ ९ जिल्हेज सन ११९५ हिजरी, सोमवार दोन घटका रात्र माा दारोगे हरकारे सरकार.

२

पुरवणी अखबार, छ १ जिल्हेज सन ११९५ हिजरी.

रघुनाथराव **वसईस** येणार म्हणोन इस्तहार व करनल गाडर जगी सरजामाची तयारी करितो व मुंबई व कल्याणी व वसईस आमदरफ्त करीत आहे. येकायेकीं घांटावर येईल या अंदेशाकरिता येथील कारपरदाज फौज जमा करितात व समग्र लाहान मोठे सरदारास सत्वर येण्याविषई ताकीदपत्रें पाठविलीं आहेंत.

छ २९ माहे जिलकादीं आनंदराव व लक्ष्मणराव रास्ते याची फौज व गंगाधरराव रास्ते आपले तालुकियांत होते ते दोन हजार स्वारानसीं पुण्यास येऊन मुठा नदीचे तीरीं उतरले व बालाजीपंत व पंतप्रधानांची भेट सांप्रदायाप्रमाणें घेतली.

सखाराम पानसे दारोगा तोफखाना, पुण्याहून पाव कासी उतरले होते ते बमोजिब ताकीद कारपरदाज छ १ माहे मारीं कूच

करून तीन कोस पुण्याहून मौजे खडकीसमीप जाऊन उतरले. तेथो- नहीं कूच करून तळेगांवास जाणार. पानसे मारासमागमें भवानजी भोंसले अंकलकोटवाले हजार स्वार व प्रतिनिधीची फौज दीड हजार व पानस्यांचे जातीची तीनच्यारसे, येणेप्रमाणें व पांच तोफा व हजार बारासे गाडदी तैनात जाहले आहेत. प्रतिनिधीची फाज अद्यापि पानसे मारासमीप गेली नांही.

इंगरेजांचे तंबीचा अज्म हुजूरीहून होत नांहीं व हैदर नाइकानें पेशकसीबाा रुपये देऊन हुजूरचे ताबेदारींत हाजर राहावें हे शर्त नवी दरमियान उत्पन्न जाहली म्हणोन अकसर बालाजीपंत व हरीपंतास मध्यस्तानीं हुजूरचे जमीर मुंबारकेचा खुलासा लिहिला आहे. त्यावरून येथील कारपरदाज बहुत फिकरवंद व छ ३० जिलकादीं हरीपंताचे डेऱ्यास बालाजीपंत तिसरा प्रहरा गेले होते ते प्रहर रात्रीस हवेलीस आले. याचप्राा छ १ माहे मारीं बालाजी- पंत आपले बागांत गेले होते. तेथें हरीपंतही आले व खिलवत जाहली.

तुकोजी होळकर व अहिल्याबाईचा ज्वाबसाल रूबकार याचा तपसील पूर्वी लिहिला आहे. त्यास सरदारी तुकोजी होळकरानी करावी व दरोबस्त माहालांत आमिलाची तगीरी बहाली व जमा- बंदीची तशखीस याचा यख्तियार अहिल्याबाईचा असावा. नारो गणेश दिवाणीवर बहाल व येशवतराव गंगाधर यानी फडनीसी करावी, याप्राा करार जाहला. परंतु साल मारी देशांत व खान- देशापैकीं जागीरीचे माहालांत तुकोजी होळकरांचे मारफातीचे आमिल जाहले आहेत ते बहाल व बरकरार ठेवावे म्हणोन कारपरदाजानीं निश्चय केला आहे. हे तजवीज अहिल्याबाई व माहिदाजी सिंदे यांस पसंद व कबूल जाहली पाहिजे याकरितां पत्रें लिहून पाठविलीं आहेत. तिकडील उत्तराप्राा निश्चय होईल. सेवेसी श्रुत होय हे विनती.

पैा छ ९ जिल्हेज.

श्रीनिवास

पुरवणी

रजाअलीखान, चंदासाहबांचा पुत्र, पुण्यात येऊन राहिला होता तो सांप्रत च्यारपांच महिन्यापासून आजारी होता. छ २९ जिलकादीं समाप्त जाहला. कळावे हे विनंती.

---

A. R. No. 143

२ जिल्हेज ११९५ हिजरी
१९ नोव्हेंबर १७८१

पैा छ ९ जिल्हेज सन ११९५ हिजरी सोमवार दोन घटका रात्र मै जोडी सरकार माा दारोगे.

श्रीशंकर

विनंती विज्ञापना यैसी जे येथील कुशल ताा छ २ माहे जिल्हेज मुाा पुणे स्वामीचे कृपावलोकणकरून येथास्तित जाणौन स्वानंद लेखण आज्ञा करीत आसिले पाहिजे. विशेष येथील वर्तमान छ २८ माहे जिलकादे रोज गुरूवारी प्राथकाली विनंतीपत्र सरकारचे डाकेसमागमे रवाणा केले ते पावोण सविस्तर वर्तमान ध्याणास येईल. तदणंतर येथील वर्तमान करनैल गाडर इंग्रज ममईस आहे. कल्याणीस आला यैसी वदंता आहे. परंतु तहकीक वर्तमान नाही. ममईस आहे हे वर्तमान तहकीक बोलतात. पुढे गाडर मजकूर कल्याणीस ज्यमावाणसी येणार. येऊन पुढे बोरघाटाकडे चाल करनार यैसे वर्तमान आहे. कल्याणीस तीनच्यार पलटणें आहेत त्यापैकी दोन पलटणे पुढे च्यार कोस बोरघाटाचे सुमारे चौक्यावर आली यैसे वर्तमान आहे. वदंता आहे की पुढे पलटणे यावयाचे कारण की इंग्रज कोकण प्रांच्या साली वगैर जमा करितात. कदाचित श्रीमंताची फौज आली तर या अर्थी दोन पलटणे पुढे चौक्यावर पाठविली यैसे वर्तमाने आहे. दुसरे वर्तमान

आहे की साली वगैर जमा न करता कल्याणीहून दोन पलटणे पुढे रवाणा केली ते चौक्यावर आली. मागून गाडर मजकूरही ममईहून कल्याणीस येऊन पुढे चाल करनार यैसी वंदता आहे. मागती तिकडील वर्तमान आलिया लेखण केले जाईल, श्रुत होये. दरबार वगैर जाला होता. माली व मुलुकी कामकाज ज्यारी आहे, श्रुत होये. छ २९ माहे जिलकाद, रोज शुक्रवार, राजश्री गंगाधरराव रास्ते दोनअडीच हाजार फौजेनसी पुण्यास आले. संगमावर येऊन उतरले आहेत. श्रीमंताच्या व कारभाऱ्याच्या व गंगाधरराव रास्ते याच्या भेटी जाल्या. भीटी वगैर होऊन रास्ते आपले डेऱ्यास गेले. रास्त्याची रवाणगी कोकण प्रांती तलेगावाकडे करनार. कारण की इंग्रजाची दोन पलटणे चौक्यावर आली या अर्थी याची रवाणगी करनार. रवाणा कल्यास लेखण केले जाईल, श्रुत होये. वदंता आहे की श्रीमंत राजश्री दादासाहेब सुर्तेहून ममईस आले. ममईहून वसईस येणार व वसईचे ठाणे दादासाहेबास इंग्रज देणार यैसा करार जाला आहे. या अर्थी दादासाहेब वसईस येणार यैसी वंदता आहे. तहकीक वर्तमान आल्यास लेखण केले जाईल, श्रुत होये. रा सटोजी भोसले व बाजीराव बरवे हे दादासाहेबाजवल आहेत. वर्तमान आहे की सटोजी भोसले वगैर दोनतीन हाजार फौजेनसी व त्याच्या मदतीस फतेसिग गायेकवाड याची फौज दोनतीन हाजार आली. येकूण पाचसाहा हाजार फौजेनसी सटोजी भोसले वगैर कोडाईबारीकडे येतात यैसी वंदता आहे. त्याजवरून येथून रा गोविंराव गायेकवाड याची रवाणगी करनार. प्रस्तुत गोविंदराव गायेकवाड याजवल दोनेक हाजार फौज जमली आहे. दाहा हाजार फौज त्यास सागितली आहे. परंतु खर्चायाची बेगमी नाही. मग त्याची खर्चावयाची बेगमी होऊन काये फौज जमून गोविदराव गायेकवाडाची रवाणगी जाल्यास लेखण केले जाईल श्रुत होये. राजश्री परशराम रामचेद्र मिरजकर याजला पत्रे गेली आहेत की फौजेसहित तुम्ही येणे. त्याजवरून परशरामपंत फौजेसहित येथे येणार. आलियास लेखण केले जाईल, श्रुत होये. रा माणाजी फाकडे याणी पाचच्यारसे रावताचा जमाव करून परलीकडे बालेघाटावर धूमधाम करितात यैसे वर्तमान

आहे श्रुत होये. छ ३० माहे जिलकादे रोज शनवार, हैदर नाइकाकडील वर्तमान आहे की नाईक मजकुरासी व इंग्रजासी लढाई मातंबर जाली. नाईक मजकूर सिकस्त जाले. फौजेची खराबी फार जाली. सिकस्त होऊन बेंगरुलाकडे गेले. इंग्रज त्याचा पाठलग करून आहेत. आरकाटचे व गिरीचे ठाणे मागती इंग्रजाणी घेतले यैसे वर्तमान आहे. विदित होये. रा नाना हरीपंताचे डेऱ्यास गेले होते. उभयेताचा ख्रिलवत जाला. भाव यैकिल्यात आला की येज्यमानसाहेबाकडे व कृष्णरावजीकडे पत्रे रवाणा करनार. दुसरे कोकण प्रांती तलेगावाकडे फौजा रवाणा कराव्या या अर्थी खलवत जाला, विदित होये. छ १ माहे मजकूर रोज रविवार, सखाराम पानसे वगैरे येका कोसाचे कूच करून खडकीवर गेले. समागमे तीनच्यार तोफा आहेत. पाचसाहासे स्वार पानसे मजकूर याजसमागमे आहेत. पुढे तलेगावाकडे जातात. कारण की इंग्रजाची पलटणे चौक्यावर आली या अ

## पुरवणी दुसरी

र्थी पानसे वगैर याची रवाणगी जाली व रास्त्याचीही रवाणगी करनार, श्रुत होये. रा हरीपंत येका कोसाचे कूच करून खडकीवर जाणार यैसी वदंता आहे. गेल्यावर लेखण केले जाईल श्रुत होये. रा बज्याबा पुरंधरे वंदणचे किल्यावर आहेत. त्याजला कोकण प्रांतीचे किल्यावर पाठवावे यैसी यौजणा केली होती. त्याजवरून बज्याबाची आजी आबई येथे कारभाऱ्याजवल आली की बज्याबास आणिक कोठे किल्यास न पाठविता ज्या किल्यावर आहेत तेथे असो द्यावे. त्यावरून बज्याबा वंदनच्या किल्यावर आहेत तेथेच आहेत. दुसरे किल्यावर पाठवणे रहित जाले श्रुत होये. फरासीसाचा वकील येथे आला आहे. कारभाऱ्याची मात्र भेट जाली. अद्याप काही बोलणे वगैर जाले नाही, शृत होये. पुढे जे प्रसगाचे वर्तमान ध्यानास येईल ते सेवेसी लेखन केले जाईल शृत होये. छ १९ माहे जिलकादचे आज्ञापत्र सरकारचे डाकेसमागमे सादर केले ते सेवकास पावले. पावोन बहुत संतोश जाला. सदैव याप्रकारे आज्ञापत्रे सादर होत अत असावी. बहुत काये लिहिणे कृपालोभ कीजे हे विज्ञाप्ती.

पैा छ ९ जिल्हेज सन ११९५ हिजरी सोमवार दोन घटका रात्र मै जोडी मा। दारोगे सरकार.

---

A. R. No. 144

५ जिल्हेज ११९५ हिजरी
२२ नोव्हेंबर १७८१

पैा छ १४ जिल्हेज शुक्रवार, सरकारच्या डांकेबराबर विद्यमान दारोग्याचे पत्रे पावली. सन ११९५ हिजरी.

श्रीनिवास

पोष्य हैबतराव गोपाळ साष्टाग नमस्कार विनती उपरी येथील वर्तमान ताा छ ५ जिल्हेज मार्गसीर्ष शुध सप्तमी, गुरुवासरपर्यंत मो। पुणे, स्वामीचे कृपेकरून क्षेम जाणून स्वानंद लेखनाज्ञा केली पाहिजे. विशेष पूर्वीं छ २ माहे मारीं हुजूरअर्जी व अखबार व स्वामीचे सेवेसी पत्र पाठविलें तें पाऊन वर्तमान श्रुत जाहलें असेल. सांप्रत डांकेवर हुजूरअर्जी व अखबार व सेवेसी पत्र पाठविलें आहें तें दारोग्याचे विद्यमानें पाऊन वर्तमान विदित होईल. चिनापटणवाले इंगरेजानें हैदरअली खानास फरारी केलें हें वर्तमान सर्वत्र प्रसिध व काळहस्तीपर्यंत इंगरेजांचा आमल पूर्ववत कायम जांहला हें वर्तमान पंतप्रधानाकडील जासूद मुजरद आले त्यानीं जुबानीं सागितलें. यावरून येथील कारभारी बहुत चिंताग्रस्त आहेत. व या दिवसांत कृष्टणराव बलाळ यांची पत्रें डांकेवर पयहम आलीं. त्या पत्राचा लेखनाभिप्राय मनन केल्यानंतर राजश्री बालाजीपंत प्रथमतां हरीपंताचे डेऱ्यास व बागांत हरीपंतासह खिलवतेकरितां गेले होते. पुन्हां छ २ व छ ३ रोजीं हरीपंताचे डेऱ्यास व बागांत बमय हरीपंत उभयतांच विचार करीत होते. येकांताचा भाव अद्यापि प्रसित्धींत आला नांहीं. कळल्यास लिहीन. बहुत काय लिहिणें हे विनती.

---

अखबार पुणें, अज ह्या छ २ जिल्हेज लगायत छ ५ माहे मार सन ११९५ हिजरी मार्गसीर्ष शुध गुरुवार.

गंगाधरराव रास्ते दोन हजार स्वारानसीं पुण्यास येऊन पंतप्रधान व कारभाऱ्यांची भेट घेतली. व सखाराम पानसे छ १ जिल्हेजीं कूच करून पुण्याहून दोन कोसी खडकीसमीप जाऊन मुकाम केला. रघुनाथराव चिंचणी तारापुरासमीप आले म्हणोन खारिज वर्तमान यैकिलें. त्र्यंबकाचे घांटाखाले वासदेवें मकान आहे तेथें कोळयाची जमीयत व इंगरेजाकडील जमीयत जमा जाहली आहे म्हणोन खारिज यैकिलें. हैदरअलीखानाचे सिकस्तीची खबर पै दर पय यैकिल्याप्रमाणें लिहून पाठविली. यावितरिक्त अवांतर वर्तमानासहित हुजूर अखबार पाठविली ते पाऊन वर्तमान कळलें असेल. त्या उपरी प्रत्यक्ष व यैकिलं वर्तमान दफेवार लिहिलं आहे.

करनल गाडर मुंबईहून कल्याणी व पनवेलीस आमदरफ्त करितो. व जंगी सरजामाची तयारी मुंबई व कल्याणीस होत आहे. याकरितां पंतप्रधानाचे कारपरदाजानीं बोरघांटासमीप फौजा पाठवावयाची तजवीज करून तमाम सरदारास ताकीदपत्रें पाठविलीं कीं बमय सरजाम सत्वर येणें व सखाराम पानसे यांची रवानगी केली हें वर्तमान पूर्वी लिहिलें आहे. सांप्रत वर्तमान खारिज यैकिलें कीं करनल गाडर कल्याणीस येऊन राहिला व तीन पलटणें बदलापुरास कल्याणीहून दोनतीन कोस पुढें रवाना केलीं. गाडर कल्याणीस आल्याची खबर गोविंदराव कृष्टण याचे जुबानी यैकिली. पंतप्रधानांचे कारपरदाजाचे लिहिल्याप्रमाणें तुकोजी होळकरानी छ ३ माहे मारीं वाफगावीहून हरकत करून डेरे दाखल जाहले. त्र्यंबकचे घांटाखालें कोळचांचा हगामा वारद आहे व बोरघांटाकडें गाडराचे येण्याचा कयास. याकरितां दुतरफा जमीयत किती, याची तादाद व हरकत कोणेप्रकारें करितात हें कळल्याप्रमाणें तुकोजी होळकराची रवानगी करावी, हे कारपरदा-

जांची तजवीज आहे. खारिज यैकिलें कीं तळेगांवाचे सुमारें येण्याविषईं तुकोजी होळकरांस कारपरदाजांची सूचना जाहली आहे.

रघुनाथराव चिंचणी तारापुरापर्यंत आले व वसईस येणार म्हणोन खारिज वर्तमान यैकिल्याप्रमाणें पूर्वी लिहिलें आहे. सांप्रत खारिज यैकिलें कीं राव मार वसईस आले. व येथील कारपरदाजाचे जुबानीं यैकिलें कीं पूर्वी फरासीसाकडील जाहाजें नमूद जाहलीं होती. याकरितां कासीकडें चेतसिंगाचा बलवा जाहला होता म्हणोन रघुनाथराव यांचे राहणें सुरतेस सलाहनेक न पाहिली. वसई किंवा मुंबईस राव मारनुलेनीं राहावें याकरितां सुरतेहून रवाना जाहले होते. फरासीसाची जाहजें पुन्हां गेली व चेतसिंग जमीदार कमजोर जाहला. हे वर्तमान हैदर नाइकावर करनल कूट गालब जाहल्याचें वर्तमान यैकिल्यानंतर रघुनाथराव यांस पुन्हां सुरतेस गाडरानें पाठविलें. आश्विनीकुमार तीर्थासमीप जाऊन उतरले म्हणोन कारपरदाजांचे जुबानी यैकिलें.

२

पुरवणी अखबार पुणें, छ ५ जिल्हेज सन ११९५ हिजरी.

जंजिरेकर हबसी यांचा व पंतप्रधानाकडील कमाविसदार तळेंघोसाळें व बिरेवाडीकरासी दारमदार अद्यापि जाहला नांहीं. हजार गाडदी व कोंकणी प्यादे हजारबारासे पंतप्रधानाकडील बिरेवाडीसमीप आहेत. सांप्रत वर्तमान यैकिलें कीं हबसी यानीं साळीचे पिकाचा माल घेऊन आपले तालुकियांतील तमाम रयतीस फरारी होणें म्हणोन सांगितलें. व मातबर जमीयतीसुधां पंतप्रधानांचे फौजेचे मुकाबिल्यास व मुलकाचे ताख्ततराजकरितां येणार म्हणोन खारिज यैकिलें. हैदरअली खानाची सिकस्त होऊन खान मार फरारी जांहला व पाळेगर समग्र खान मारासमीप होते ते इंगरेजांस शरीक जाहले म्हणोन पुण्यांत सावकारी खबर आली. खान माराचें पत्र येथील कारपरदाजास व आपलें वकीलास अद्यापि आलें नांहीं. व पंतप्रधानाकडील वकीलाचेंही पत्र

येत नांहीं. नूरमहमदखानाचा लेंक बागलकोटीं होता तो खान मारा-समीप आला आहे व ही खबर यैकिली कीं हैदरअलीखानाकडील कांहीं नवीन पैगाम घेऊन आला. परंतु तहकीक करीतां नूरमाा खानांचे भेटीस बागलकोटींहून आला आहे.

गोविंदराव गाइकवाड पांचसातसे स्वार व सखाराम पानसे हजारबारासे स्वार व गंगाधरराव रास्ते दोन हजार स्वारानसीं पुण्या-समीप मुकामात करूत आहेत. सखाराम पानसे याचे हमराही गाडदी व स्वारांस रोज(म)ऱ्याबाा रुपये अद्यापि पावले नाहींत. पंतप्रधा-नांचे मुतसद्याकडून रुपये पावल्यानंतर कूच करून तळेगांवास जाणार. गोविंदराव गाइकवाडासमीप कारपरदाज गणपतराव कोलटकर नामे जाहला आहे. तो स्वारास पाव रुपयाप्रमाणें रोजमरा देतो. सातआठसें स्वार जमा जाहले आहेत व उमेदवारी पांचसातसे स्वार आले आहेत. परंतु फतेसिंग गाइकवाडास सिकस्त करून गुजरात प्रांत घ्यावा, ते समईं तलबतनखा मिळेल हे उमेद याकरितां लोक तनखेत नांहीत. पोटभरू व कांहीं गोविंदराव गाइकवाडाचे कदीम रफीक आहेत ते लोक मारनुलेसमीप आहेत.

गंगाधरराव रास्ते फौजेसुधां हाजर आहेत. पंतप्रधानांचे कार-परदाज जे समईं जिकडें रवाना करतील तिकडें बिला उजर जातील.

या उपरी नवल विशेष जें वर्तमान होईल तें सेवेसी विनती लिहीन हे विनती.

मानाजी फांकडा सरगरांचे लेंकासी मुतिफक जाहला व सुपे गांवी राहून पालीम वगैरे माहालांत धामधूम करितो म्हणोन येथील कारपरदाजांसमीप वर्तमान आलें आहे.

A. R. No. 145

६ जिल्हेज ११९५ हिजरी
२३ नोव्हेंबर १७८१

पैा छ १३ जिल्हेज शुक्रवारी सरकारच्या डांकेबराबर पाठविली ते विद्यमान दारोगे पावली, सन ११९५ हिजरी.

श्री

विनंती विज्ञापना यैसी जे येथील कुशल ताा छ ६ माहे जिल्हेज मुा का पुण स्वामीचे कृपावलोकणेकरून येथास्थित जाणून स्वानंद लेखानार्थ आज्ञा केली पाहिजे. विशेषे, येथील वर्तमान छ २ माहे मजकूर रोज सोमवारी प्राथःकाळी विनंतीपत्र सरकारचे डांकेसमागमे सेवेसी रवाणा केले ते पावोन सविस्तर वर्तमान विदित जाले असेल. तदनंतर येथील वर्तमान श्रीमंत राजश्री दादासाहेब सुर(ते)हून ममईस येऊन वसईस येणार यैसी वदंता आहे. हे वर्तमान पूर्वीचे विनंतीपत्री सविस्तर लेखण केले होते त्याजवरून शृत जाले असेल. वर्तमान आहे की श्रीमंत राजेश्री दादासाहेब वसईस आले. करनेल गाडर इंग्रजही वसईस येनार. वसईस आल्यानंतर दादासाहेबास वसईस ठेऊन आपन खांसा कल्यानीस जमावासहित येनार. कल्यानीस वगैर पलटने आहेत. गाडर मजकूर कल्यानीस आल्यानंतर पुढे बोरघाटाकडे चाल करनार यैसे वर्तमान आहे. दादासाहेब वसईस तहकीक आल्याचे वर्तमान आलियां लेखण केले जाईल. परंतु वंदता विशेषे आहे कीं दादासाहेब वसईस आले. शृत होये. दरबार वगैर जाला होता. माली व मुलकी वगैर कामकाज जाले. विदित होये. छ ३ माहे मजकूर रोज मंगलवार राजेश्री नाना हरीपंताचे डेऱ्यास गेले होते. उपरांतिक नाना व हरीपंत स्वार होऊन खलवत करावयास बागात गेले होते. दोनतीन दिवस जाले बागात खलवत करावयास जात असतात. खलवत वगैर बागात होऊन नाना घरास आले व हरीपंत आपले डेऱ्यांस गेले. खलवतीचा भाव यैकिल्यात आला की दादासाहेब वसईस आले. पुढे काये उद्योग करणार यैसी वंदता. दुसरे, हैदर नायेकास इंग्रजानी फारच सिकस्त केले यैसे वर्तमान आहे. त्याजवरून कारभारी

आपले ठिकाणी बहुतच शशांकित की पुढे मसलितीचा डौल कोण्या प्रकारे पडेल. हे कितीक विच्यार ध्याणास आणून उभयेताचे खलवत बहुत निकडीचे येकांतास बागात होतेस्ते याअन्वये खलवतीचा भाव यैकिल्यात आला, शृत होये. फरासीसाचा वकील येथे आला आहे त्यासी व कारभाऱ्यासी येकदोन खलवत जाले. भाव यैकिल्यात आला की या समयात फरासीसानी साहित्य करून इंग्रजाचे पारपत्य करावे यैसे मानस कारभाऱ्याचे. परंतु वकीलाचे बोलणे की आम्हास पैकियाचे साहित्य करावे, येक दुसरे स्थळ राहावयास द्यावे, उपरांतिक आपले साहित्याचा विच्यार घडेल यैसे फंरासीसाचे वकीलाचे बोलणे आहे. प्रस्तुत कारभाऱ्यास पैकियाचे साहित्य करून फरासीसास आणावे, हे गोष्ट होते यैसा प्रकार नाही. कारण की पैकियाची वोढ. याचेच फौजेस पैक्याचे अनकूलता नाही, मग फरासीसास पैका देऊन आणितात हे कलतच आहे. मग काये निश्चये होऊन फरासीसाचे वकीलास सांगतात, हे ध्याणास आलियां लेखण केले जाईल. दुसरे वर्तमान आहे की फरासीसाचा वकील याचा आवभाव मात्र पाहवयास आला आहे. राजकारणही येथास्थित उतरनार नाही यैसीही वंदता आहे. मग काये जे वर्तमान होऊन ध्यानास येईल हे सविस्तर सेवेसी लेखण केले जाईल शृत होये. छ ४ माहे मजकूर रोज बुधवार, सटोजी भोसले व बाजीराव बर्वे वगैर पांचसात हजार फौज व दोनतीन पलटणे या सरंजामानसी कोंडाईबारीखाले नयापूर धायेटे याजवल आले. पुढे ते घाट चढून वरते खांणदेश प्रांती येणार यैसी वंदता आ आहे. त्याचे शाहावर कोंडाई-बारीखाले दुरगोजीबावा भाबकर हजारबारासे रावतानसी आहे व रा गणेशपंत बेहरे दोन हजार फौजेनसी कोंडाईबारीवर साकरीजवल आहेत. गणेशपंतानी येथे कारभाऱ्यास लिहिले आहे कीं फौज वगैर पाठऊन द्यावी (मजकूर फाटला) करावा. दिवसगत कराल्यास सटोजी भोसले वगैर बारी चढून वरते आल्यास पेंच पडेल. यां अर्थी फौज सत्वर पाठवावी. त्याजवरून येथून राजश्री गोविंदराव गायेकवाड वगैर याची फौजेसहित रवानगी करणार. रवाणगी केल्यास लेखण केले जाईल, शृत होये. करनेर गाडर ममईस आहे व श्रीमंत राजेश्री दादासाहेब वसईस

आल्याची वंदता. पुढे काये मसलत करून उद्योग करतील या अर्थी येथून राजश्री बाजीपंतआन्ना व रास्तीयाची वगैर फौज कोकण प्रांती तळेगावाकडे रवाणा करनार यैसी यौजणा आहे. रवाणा केल्यास लेखण केले जाईल, शृत होये. दरबार वगैर जाला होता. माली मुलकी वगैर कामकाज जाले.

## पुरवणी २

शृत होये. छ ५ रोज गुरुवार, वर्तमान आले की होलकर वाफगावा-बाहेर डेरे दाखल जाले· फौजेचे देण्याचा गवगवा आहे. आद्याप त्याची संपूर्ण फौज मिलाली नाही· दोनतीन हजार फौज जमा जाली आहे. होलकर मजकूर येथे येणार· येथे आल्यानंतर त्याची रवाणगी कोणी-कडे करितात हे पाहावे, शृत होये· कारभाऱ्यानी आपले फौजेचे लोकास पूर्वी येकदोन पत्रे पाठविली होती की सत्वर आपले सरंजामानसी यावे. त्याजवरून लोकानी आड घातली आहे की मागील आमची नाल-बंदी वगैर वारून द्यावी. पुढे आमचे नालबंदी व रोजमुरे वगैरचा यैवज दिल्हयास आम्ही येऊ यैसे फौजेचे लोकाचे बोलणे आहे. येथे सरदार वगैर आहेत ते म्हणतात की, मागील व पुढील पैका दिल्हयास लोक येतील. नाहीतर आमचा उपाये काये? लोकाचे वगैर बोलणे याप्रकारचे. हे तो कोणास सध्या पैका देत नाहीत. या आर्थी आद्याप फौज वगैर जमा नाहीं. मग लोकास पैका वगैर देऊन फौज जमा जाल्यास लेखण केले जाईल, शृत होये. हैदर नायेकासी व इंग्रजासी लडाई होऊन नाईक मज-कूर याची सिकस्त जाली. नाईक मजकूर याचे पुत्रास वगैर जखमा आल्या. फौज बहुत गव्हाळच्यांत आली. दुसरे नाईक मजकुरावर इंग्र-जानी छापा घातला. नाईक मजकूर सिकस्त होऊन निघाले. बेगरुला-कडे गेले. इंग्रज त्याचा पाठिलाग करून आहेत. इंग्रजानी आरकाटचे व गिरीचे ठाणे घेतले यैसे वर्तमान आले आहे. मागती वर्तमान आल्यास लेखण केले जाईल, शृत होये. हिंदुस्थान प्रांती सिंद्यासी व इंग्रजासी लडाई होती. प्रस्तुत वर्तमान आहे की सिंद्यानी इंग्रजास बारा लक्ष रुपये देऊन सलूक केला व ग्वालेरचा किला जाटास दिल्हा यैसे वर्तमान आहे.

मागती तिकडील वर्तमान आल्यास लेखण केले जाईल, शृत होये. रा कृष्टणरावजीकडील पत्रे वरचेवर येतात. त्याचे दरजवाबही येथून वरचेवर जातात. त्यातील सविस्तर वर्तमान ध्यानास येत असेल, शृत होये. पुढे प्रसगाचे वर्तमान ध्यानास येईल ते सेवेसी लेखन केले जाईल. बहुत काये लिहिणे, कृपालोभ कीजे हे विज्ञाप्ती.

---

A. R. No. 146 — १० जिल्हेज ११९५ हिजरी
२७ नोव्हेंबर १७८१

पैा छ १८ जिल्हेज मंगलवार अस्तमान सरकारच्या डांकेबराबर आली, ते माा दारोगे हरकारे पावली, सन ११९५ हिजरी.

श्रीनिवास

पोष्य हैबतराव गोपाळ सांा नमस्कार, विनती उपरी, यथील वर्तमान ताा छ १० जिल्हेज, मार्गसीर्ष शुध द्वादसी मंगळवारपर्यंत मोा पुणें, स्वामीचे कृपेकरून क्षम जाणून स्वानंद लेखनाज्ञा केली पाहिजे. विशेष, कृपापत्र छ १ जिल्हेजचे रवानगीचें चिरजीवांचे पत्रासहित पाठविलें, तें छ ८ माहे मारीं पाऊन लेखनार्थ मननें करून चितस्वास्थता जाहली. पूर्वी छ ६ माहे मारीं हुजूरअर्जी व अखबार व स्वामीचे सेवेसी विनतीपत्र चिरजीव राजश्री राय रघोतमराव यांचे नांवचे लिफाफ्यासहित डांकेवर रवाना केलें तें दारोग्याचे विद्यमानें हुजूर व स्वामीचे सेवेसी पावलें असेल. सांप्रत छ १० पर्यंत वर्तमानासहित अर्जी हुजूर व पृथक पत्रीं स्वामीचे सेवेसी वर्तमान लिहिलं आहे, त्यावरून श्रुत होईल. इंगरेजांचे तंबीचा नकशा हुजूरीहून जाहला असतां, सांप्रत हैदरअलीखानाकडील पेशकस येण्याचा व खान मारानें हुजूर रुजुवात आणावी म्हणोन इरशाद नवीन जाहला आहे. यावरून येथील कारपरदाजांनीं कयासानें निश्चय केला आहे कीं हुजूर इंगरेजांचे तंबीचा अज्म सर्वथैव मंजूर नांहीं. पुढें हैदरअलीखानांचे विद्यमानें इंगरेजासी दारमदार करावा किंवा लढाईच कायम ठेवावी येविषईंचा

मनसुबा व विचार बालाजीपंत व हरीपंत करीत आहेत म्हणोन कोण्हीं स्नेहिताचे मुखं वर्तमान यैकिल्याप्रमाणें सेवेसी व हुजूर लिहिलं आहे. बहुत काय लिहिणें, हे विनंती.

------

पैा छ १८ जिल्हेज मंगलवार.

श्रीनिवास

अखबार पुणें, अज इा छ ६ जिल्हेज लगायत छ १० माहे माार सन ११९५ हिजरी, मंगळवार.

येथील कारभाऱ्यांचे लिहिल्याप्रमाणें छ ३ माहे मारीं तुकोजी होळकर डेरे दाखल जाहले म्हणोन वाफगांवीहून वर्तमान आलें. रघुनाथराव चिचणी तारापुरापर्यंत आले होते ते करनल गाडराचे सुचनेप्रमाणें पुन्हां सुरतेस गेले. जंजिरेकर हबसियांनीं पंतप्रधानांचे तालुकियांत धामधूम करावयाची योजना केली आहे. करनल गाडर मुंबईहून कल्याणीस आला म्हणोन खारिज यैकिलें म्हणोन व यावितरिक्त अवांतर वर्तमानासहित छ ६ माहे मारीं अखबार डांकेवर पाठविली ते पाऊन वर्तमान कळलें असेल. त्याउपरी यैकिलें व प्रत्यक्ष वर्तमान दफेवार सेवेसी लिहिलं असे.

छ ७ माहे मारीं हैदरअलीखानाकडील जासूदजोडी नरसिंगराव वकीलासमीप पत्रासहित आलीं. राजश्री बाळाजी जनार्दन यांस खान मारानें खरीता पाठविला तो छ ७ माहे मारीं नरसिंगराव व नूरमा खान उभयतानीं बालाजीपंतास पावता केला व दोनतीन घट्का खिलवतेंत होते. खान माराकडील जासुदांस बालाजीपंतानीं मुंडासें व सेला इनाम दिधला. सेवकानें नरसिंगराव वकीलांचे जुबानीं वर्तमान यैकिलें कीं छ १५ जिलकादचीं पत्रें छ ७ जिल्हेजीं पुण्यास आलीं, त्यातील मार बेमराजपाळ याचे आसऱ्यास जनराल करनल कूट इंगरेज होता. हैदरअलीखानासीं व इंगरेजासीं पंचेवीस कोसाचा फासला असतां छ ५ जिलकादीं येक रात्र व येक दिवस दौड करून इंगरेजासीं गांठ घातली. परस्परें लढाई मातबर जाहली. इंगरेजांची सिकस्त होऊन झाडीचे आसऱ्यास निघोन गेला. हाती व बंदुखा व

डेरे वगैरे सरंजाम इंगरेजांचा खानमाराकडे लुटींत आला याप्रमाणें खान माराचें वकीलाचे जुबानीं वर्तमान यैकिलें. पंतप्रधानांचे वकीलाचीं पत्रें कारपरदाजांस आलीं नांहीत.

माहदाजी सिंदे काळीसिंदीहून पांचसात कोसी कूच करून सिपरी कोलारसचे रुखं गेले व करनल मेवर इंगरज दोन मजली दाहा कोस कूच करुन येमुनातीर कालपीचे रुखं गेला म्हणोन पूर्वीं वर्तमान यैकिलें त्याप्रमाणें हुजूर लिहिलं होतें. सांप्रत सिंद्याकडील कलमी वर्तमान आलें नांहीं.

छ ८ व छ ९ माहे मारीं पर्जन्यवृष्टी विशेष जाहली. गोविंदराव गाइकवाड व सखाराम पानसे मुला नदीचे कांठीं खडकीसमीप उतरले होते. काळी जमीन होती याकरितां चिखल बहुत जाहला. सबब छ १० माहे मारीं सखाराम पानसे यानीं खडकीहून येक कोसाचें कूच करून खरब भूमीवर जाऊन उतरले. करनल गाडराचे हरकतीप्रमाणें पंतप्रधानकडील जमीयत घांटापर्यंत जाईल. गाडर मार कल्याणी व बदलापुराहून पुढें न आल्यास पानसे वगैरे तळेगांवापर्यंतही जातील किंवा न जातील येविषईंचा संशय दिसतो.

छ ८ माहे मारीं बालाजीपंत हरीपंताचे डेऱ्यास गेले होते. येक प्रहर उभयतांचा येकांत जाहला. पुन्हां आपले हवेलीस आले.

छ ९ माहे मारीं पंतप्रधान व बाळाजीपंत व हरीपंत पाषाणास देवदर्शनार्थ गेले होते.

करनल गाडर मुंबईहून कल्याणीस आला व जंगी सरजाम करितो म्हणोन पूर्वीं लिहिलें आहे. सांप्रत विशेष वर्तमान किंवा गाडराची हरकत कल्याणीहून अन्यत्र स्थळांतरास जाहल्याचें वर्तमान आलें नाहीं. सेवेसी श्रुत होय हे विनंती.

---

A. R. No. 147

११ जिल्हेज ११९५ हिजरी
२८ नोव्हेंबर १७८१

पैा छ १८ जिल्हेज मंगलवार अस्तमान सरकारच्या डांकेबराबर पत्रे पाठविली, ते दारोग्याचे विद्यमाने पावली.

श्री

विनंती विज्ञापना यैसी जे येथील कुशल ताा छ ११ माहे जिल्हेज मुा काा पुणं स्वामीचे कृपावलोकनेकरून येथास्थित जाणोन स्वानंद लेखनाज्ञा केली पाहिजे. विशेष, येथील वर्तमान छ ६ माहे मजकूर रोज शुक्रवारी प्रातःकाली विनंती पत्रसरकारचे डांकेसमागमे सेवेसी रवाना केले ते पावोन सविस्तर वर्तमान विदित जाले असेल. तदनंतर येथील वर्तमान राजश्री नाना हरीपंताचे डेऱ्यास गेले होते. उभयेताचा खलबत येकप्रहर पावेतो जाला. उपरांतिक हैदर नायेकाकडील नूरखान वकील यांस बोलाविले. त्यासी व नाना व हरीपंत यासी च्यार घटका खलबत जाला. खलबतीचा भाव यैकिल्यात आला कीं नाईक मजकूर इंग्रजाचे लडाईंत सिकस्त फार जाले. फौज बहुत खराबीत आली, यैसे वर्तमान आले आहे. त्याजवरून कारभारी यासी व वकीलासी भाषणे होत होती कीं नाईक मजकुराची सिकस्त जाली, हे उतम न जाले. पुढे काये तजवीज, यैसी परस्परे भाषणे होत होती. कारभारी याणी वकीलास सांगितले कीं तुम्हीं व आम्हीं नाइकास पत्रे ल्याहावी कीं मागती जमाव करून इंग्रजासी लडाई करावी व त्याचे पारपत्य करावे, हिमत न टाकावी, याअन्वये पत्रे नाइकास ल्याहावी. या आर्थी वकीलासी व कारभारी यासी खलबत जाला. खलबत होऊन नाना आपले घरास गेलें व वकीलही आपले बिऱ्हाडास गेले. श्रुत होये. नाईक मााराचे सिकस्तीचे वर्तमान आहे. त्याजवरून येथे कारभारी आपले ठिकाणी बहुत आंदेशा करून आहेत कीं पुढें प्रसंग कोण्याप्रकारे रूबकार होईल हे न कले. नाईक माार सिकस्त जालियास तिकडील पलटणे दाहापांच ममईकडे उतरल्यास पेंच भारी पडल, यैसे आपले

ठिकाणी विंवंचना करितात, श्रुत होये. दरबार वगैर जाला होता. माली व मुलकी वगैर कामकाज जाले. विदित होये. छ ७ रोज शनवार, कर्णल गाडर इंग्रज ममईस आहे. जमाव वगैर करितात. पुढे ते इकडे उद्योग करणार यैसी वदंता आहे. दुसरी वदंता आहे कीं गाडर मजकूर यांसी कांही स्नेहाचा संदर्भ लाऊन कागदपत्र लिहिणार. यांचे उतर गेल्यावर ते वकील पाठविणार, यैसे वर्तमान आहे आणि त्याजकडील सूत्रही परस्परे येथे आले आहे. बाह्यात्कारे तो यैकिल्यात येत नांही. परंतु आंतस्ते कांही सूत्र आहे यैसे बोलतात. परंतु यांजला त्याचा विश्वास येत नाहीं. इंग्रजाचे मानस कीं स्नेहे करून श्रीमंत राजश्री दादासाहेब यांचा बंदोबस्त करून पूर्वत प्रो त्यास जागीर देऊन येखाद्या स्थली त्यानी सुखरूप असावे. दुसरे हैदरचे पारपत्य करावे. आणिक कितीक राजकारणाचे प्रकार बोलतात यैसे इंग्रजाकडील मुंदे आहेत यैसे आंतस्तें राजकारण आहे म्हणौन यैकिन्यात आले. परंतु याप्रो मुदे हे कबूल करून राजकारण करितील यैसे होणार नाही. कारण कीं त्यांचा यांस विश्वास नांही. मग संकट जाणून कबूल करितील तर न कले. मागती पुरतेपणे याचा शोध करून हे राजकारण आहे किंवा नांही हे ध्यानास आणून लेखन केले जाईल. श्रुत होये. श्रीमंत राजश्री दादासाहेब वसईस आले यैसी वदंता आहे. प्रस्तुत वर्तमान आहे कीं आद्याप ते वसईस आले नाहीत, परंतु येणार. त्याचे वसईस आल्याचे वर्तमान आलिया लेखन केले जाईल, श्रुत होये. दरबार वगैर जाला होता. विदित होये. छ ८ रोज रविवार, कर्णल गाडर ममईस आहे. पुढे तो उद्योग करणार यैसे वर्तमान आहे. त्याजवरून येथून रास्त्याची फौज व बाजीपंत अणां वगैरे यांची रवानगी बोरघाटाचे सुमारे तलेगावास करणार, यैसी योजना आहे. यौजना होऊन रवाना केलियास लेखन केले जाईल, श्रुत होये. हैदरनाईक सिकस्त जाल्याचे वर्तमान आहे. प्रस्तुत वदंता आहे कीं नाईक मारानें आणिक जमाव करून इंग्रजाचे शहावर गेले. परंतु हे वर्तमान येथातथ्य नांही. सिकस्त जाल्याचे वर्तमान विशेष बोलतात व कलमीही खबर आहे. मागती त्याजकडील वर्तमान आलियास लेखन केले जाईल, श्रुत होये.

हिंदुस्थानप्रांती सिंद्यानी काही यैवज देऊन इंग्रजासी सलूख केला यैसे पूर्वी वर्तमान होते. प्रस्तुत वर्तमान आहे कीं सिंद्यानी कांही यैवज न देता जाटाचे विद्येमाने इंग्रजासी सलूख केला यैसी वदंता आहे, श्रुत होये. राजश्री नाना हरीपंताचे डेऱ्यास गेले होते. उभयेताचा खलबत जाला. खलबताचा भाव यैकीन्यात आला कीं इंग्रजाचे मसलती विसी जाला, दुसरे राजश्री कृष्णरावजीकडे पत्रे पाठवावी, तिसरे आपले कितीक दौलतीचे बंदोबस्ताविसी· या अन्वये खिलवत जाला. खलबत होऊन नाना आपले घरास आले, श्रुत होये.

छ ९ रोज सोमवार येकादसी म्हणौन श्रीमंत व नाना व हरीपंत वगैरे दोन तीन हजार फौजेनसी येयून दोन कोस पाशाणास माहादेव आहे त्याचे दर्शनास गेले होते. दर्शन वगैरे करून सायेंकाली श्रीमंत वाड्यात आले व नाना आपले घरास आले. हरीपंत वगैरे परस्परे लस्करात आपले डेऱ्यास गेले, श्रुत होये. राजश्री विसाजी कृष्ण बिनीवाले यास जागीर वगैरे देऊन उभारणी करणार हे पूर्वी लेखन केले होते. त्यास विसाजीपंतास साठ हजाराचा सरंज प्रस्तुत पागा वगैरेस दिल्हा. पुढे आणिक काही खर्चास देऊन फौजेची उभारनी करणार. उभारनी केलियावर त्याची योजना कोणीकडे करितात हे ध्यानास आलिया सेवेसी लेखन केले जाईल, श्रुत होय. परशराम रामचंद्र मिरजकर यांस पत्रें पाठविली आहेत की तुम्ही आपले फौजेसह वर्तमान येणे. त्याजवरून त्यानी उतर लिहिले कीं फौजेचा देण्याचा गवगवा आहे. कांहीं यैवजाची साहिता जाल्यास उतम आहे. सरंजामी हजार दोन हजार फौजे आहे. ते पाठऊन देऊ. विशेष फौज पैक्याखेरीज येत नाहीं याची नेमणूक करून पाठवावी यैसे यानी लिा होते, श्रुत होये. दरबार वगैरे जाला होता. विदित होये. राजश्री हरीपंत डेऱ्यास आहेत. नेमल्या प्रा ो फौज अद्याप जमा नाही. कारण कीं लोकास तीन वर्षे पैका नांही. लोक म्हणतात की मागील पुढील पैका दिल्हृयास येऊ. नाहीतर येणे होत नाही. हे तो आद्याप कोणास पैका देत नाहीत यैसे

आहे. प्रस्तुत हरीपंताजवल दोन हजार स्वार आहेत· रास्ते दोन हजार व गायेकवाड हजार दीड हजार, श्रीमंताजवल व नानाचे नेमणुकेचे लोक वगैर तीन हजार, येकून सा-सात हजार कसर कम फौज आहे. सिवाये दोनतीन हजार गारदी याप्रो ा प्रस्तुत फौज आहे· पुढे जे फौज जमा होईल ते लेखन केले जाईल, श्रुत होये· छ १० रोज मंगलवार अहिल्याबाई होलरीन इचे सूत्र लागले आहे कीं आपले नाताचे नावे सरदारी करावीं व दादाजी गंगाधर याणी दिवाणगिरी करावी· येविसी सरकारात नजंर द्यावी. तुकोजी होलकर याणी मात्र फौज चालवावी· हे राजकारण बाईचे आहे हे पूर्वी सविस्तर लेखन केले होते, त्याजवरून ध्यानास आले असेल· कारभारी याचे मानस कीं, बाई जवलून नजर घेऊन, बाईचे नाताचे नावे सरदारी करून द्यावी· दादाजी गंगाधर याणी दिवाणगिरी करावी· त्याजवरून तुकोजी होलकर आपले ठिकाणी आजुरदा आहेत· वाफगावी बाहेर डेरे दाखल मात्र जाले आहेत· फौज दोनतीन हजार त्याजपासी जमली आहे यैसे वर्तमान आहे मग होलकर माार येथे येतात किवा न येतात हे वर्तमान कलल्यावर लेखन केले जाईल. श्रुत होये· पुढे जे प्रसगाचे वर्तमान ध्यानास येईल ते सेवेसी लेखन केले जाईल. शुत होये· छ ३० माहे जिलकादचे आज्ञापत्र सादर केले ते छ ८ माहे माारी पावले· पावोन बहुत संतोश जाला. सदैव आज्ञापत्री साभाल होत असावा· बहुत काय लिहिणे, कृपालोभ कीजे हे विज्ञाप्ती.

---

**A. R. No. 148** — १५ जिल्हेज ११९५ हिजरी
२ डिसेंबर १७८१

पैाा छ २२ जिल्हेज रविवार दोन प्रहर दिवस आल्यावर सरकारच्या डाकेंबराबर आली ते विद्यमान दारोगे हरकारे पावली, सन ११९५ हिजरी.

श्रीनिवास

पोष्य हैबतराव गोपाळ सांा नमस्कार विनती उपरी. येथील वर्तमान ताा छ १५ जिल्हेज मार्गसीर्ष वद्य द्वितीया रविवारपर्यंत मो

पुणें स्वामीचे कृपेकरून क्षेम जाणून स्वानंद लेखनाज्ञा केली पाहिजे. विशेष कृपापत्र छ ९ माहे मारचें डांकेवर रवाना केलें तें छ १५ माहे मारीं चिरंजीव राजश्री रघोतमराव यांचे पत्रासहित पाऊन सविस्तारें वर्तमान कळलें व संतोष जाहला. पूर्वी छ ११ तारखेस हुजूर अर्जी व अखबार व स्वामीचे सेवेसी विनतीपत्र डांकेवर रवाना केलें, ते दारोग्याचे विद्यमानें पाऊन वर्तमान श्रुत जाहलें असेल. त्या उपरी छ १५ माहे मारपर्यंत येथील वर्तमान पृथक पत्रीं स्वामीचे सेवेसी व हुजूरअर्जी व अखबार लिहून डांकेवर पत्रें रवाना केलीं आहेंत. दारोग्याचे विद्यमानें पत्रें हुजूर व स्वामीचे सेवेसी पावतील. बहुत काय लिहिणें हे विनती.

---

पैा छ २२ जिल्हेज सन ११९५.

श्रीनिवास

पुरवणी श्रीमंत राजश्री नाना स्वामीचे सेवेसी विनती जे सेवकाची प्रकृती अशक्त याकरितां पांचसाहा वर्षापासून चिरंजीव राजश्री राय रघोतमराव यांस येथील दरबारांत रुढीस घातलें. येथील मंडलीची कृपा व स्नेह संपादून अखबारेचे कामावर सरगरम व योग्य जाहले. परंतु, चिरंजीव हुजूरचे नौकरीस योग्य आहेत याची परीक्षा स्वामीसमीप जाहली पाहिजे व येथील कची कयफियत व स्वामीस व स्वामीचे सलाह व आज्ञेप्रमाणें हुजूर अर्ज करावयाकरितां व अखबारेचे खिदमतीवर चिरंजीवाची स्थापना स्वामीचे कृपेंकरून व्हावी यास्तव, हुजूर पाठवावयाचा निश्चय होता. राजश्री कृष्टणरावजी कमाल आरजू हुजूर जाण्यांविषई व इनायतनामा सादर व्हावा म्हणोन प्रयत्न बहुत केला. सेवटीं, चिरंजीवानी हुजूर अर्जमारूज स्वामीचे विद्यमानें करावा हा नेम करून चिरजीवास हुजूर पाठवांवें हा सित्धांत केला. रावजी हुजूर गेल्यानंतर चौथाई वगैरेचा तह होईल व कितेक अर्जमारूज अजराह दौलतख्वाहीचा रावजी करतील व सरकार किफायत होईल, यास्तव चिरंजीव राजश्रीस सेवेसी मार्गस्त केलें.

स्वामीचे कृपेकरून कृष्टणरावजीस हुजूर येण्याविषईं इनायतनामा सादर जाहला. रावजी हुजूर गेले यांत चिरंजीवाचे जाण्याचें सार्थक बाह्यात्कारचें जाह्लें. खांसगत काम स्वामीचे कृपेने व यजमानाचे इनायतीकरून जाह्ल्याचप्रमाणें. चिरंजीव येथून जेष्टमासी गेले त्यास सात महिने जाह्ले. या उपरी हुजूरीहून व आपलेसमीप तें पासून चिरंजीवास रुखसत जाहली पाहिजे हें विनती मान्य व्हावी. चिरंजीवाची कन्येचें लग्न गतवर्षीं राहिलें. या वर्षीं माघ मासीं लग्न करावयाची योजना आहे. माघ मासीं खेडांत लग्न करून पुण्यांस येतील. दोन कामाची विनती केली ते स्वामीचे सेवेसी व हुजूर मान्य व्हावी, हे विशेष इछा. स्वामीसमान मुरब्यांचे योगेंकरून श्री स्वामी पूर्ण करील. चिरजीवांचे रुखसतीविषईं स्वामी असतां मीं अर्जी करावयाचें प्रयोजन नांहीं तत्रापी चिरजीव सेवकाचेच सिलसिल्यावर हुजूर आहेत. याकरितां अर्जी लिहून लिफाफा खुला सेवेसी पाठविला आहे. मुनासिब असल्यास हें अर्जी द्यावी. मुनासिब नसल्यास दुसरी लिहून द्यावी हे विनती.

---

पैा छ २२ जिल्हेज सन ११९५ हिजरी.

श्रीनिवास

अखबार पुणें अज इा ११ जिल्हेज लगायत छ १५ माहे माार सन ११९५ हिजरी, रविवार.

छ ७ माहे माारीं हैदरअलीखानाचीं पत्रें बाळाजी जनार्दन व नूर माा खान व नरसिंगराव वकीलास आलीं. त्याचा खुलासा छ ५ जिलकादीं खान माारासीं व करनल कोट इंगरेजासीं बेमराजपाळ यासमीप लढाई जाहली. इंगरेजांची सिकस्त जाहली व खान मााराची फतें होऊन इंगरेजांकडील हाती व तोफा वगैरे लूट आली, म्हणोन नरसिंगराव वकीलाचे जुबानीची खबर व यावितरिक्त अवांतर वर्तमानासहित पूर्वीं डांकेवर पत्रें पाठविलीं, तें पाऊन वर्तमान श्रुत जाह्लें असेल. सांप्रतचें वर्तमान दफेवार हुजूर व स्वामीचे सेवेसी लिहिलं असे.

हैदरअलीखानाची पत्रें बालाजीपंत व नूरमाा खान व नरसिंगराव यांस छ १४ माहे मारीं पुन्हां आलीं. कृष्टणराव जोसी वकील याची पत्रें बाळाजीपंतास छ मारीं आलीं. लढाईची कयफियत कची लिहिली आहे. दोन हाती व पांच साहा तोफा व नाल वगैरे सरंजाम वेलुरास इंगरेज नेत होते तो समग्र खान मााराकडें लुटींत आला म्हणोन लिहिलें आहे. हैदरअलीखानानें बाळाजीपंतास लिहिलें आहे कीं, माहदाजी सिंदे इंगरेजांचे मुकाबल्यावर मुस्तकीम आहेत त्यानीं इंगरेजांचीं तंबी करारवाकई करावी व हजरत बंदगानआलीचे जनाबेंत कृष्टणराव गेले आहेत त्यानीं हुजूर अर्जमारूज करून इंगरेजांचे तंबीचा अज्म हुजूरीहून होण्याचा निश्चय करावा व तुम्हीं मुंबई व वसई प्रांतीं हंगामा करून गाडराचें पारपत्य करणें. याप्रमाणें लिहिलें आहे म्हणोन येथील दरबारी स्नेहिताचे जुबानीं वर्तमान यैकिलें.

करनॅल गाडर कल्याणीहून पुन्हां मुंबईस गेला व तीन पलटणें कल्याणी बदलापुरासमीप आहेंत म्हणोन खारिज वर्तमान यैकिलें.

माहदाजी सिंदे चंदेरीसमीप आहेत. करनल मेवर आपले जमीयतेसुधां यमुनातीर कालपी अलिकडें वीस कोसपर्यंत गेला म्हणोन वर्तमान यैकिलें.

चेतसिंग जमीदार कासीकर इंगरेजांचे प्रबळतेकरितां कासी प्रांत सोडून रेवामुकुंदपुरीं येऊन राहिला आहे. जमीदार मााराचे तरफेनें वकील माहदाजी सिंद्यासमीप गेला आहे व खानदेश येरंडोळापर्यंत वकील आला आहे. तो पुण्यास पंतप्रधानांचे कारभाऱ्यांकडें येणार. वकील मााराची प्रकृती स्वस्थ नांही. याकरितां येरंडोलीं स्वस्थता होजोपर्यंत राहिला आहे.

---

पैाा छ २२ जिल्हेज.

२

पुरवणी अखबार पुणें छ १५ जिल्हेज सन ११९५ हिजरी.

सखाराम पानसे व गंगाधरराव रास्ते व गोविंदराव गाइकवाड वगैरे पूर्ववतप्रमाणें पुण्यासमीप आहेत. करनल गाडराकडून हरकत

होऊन बोरघांटापर्यंत येईल, तरी येथील कारभारी पंतप्रधानांचे सरदारांची व फौजेची रवानगी करतील.

गोविंदराव गाइकवाडासमीप पांचसातसे स्वार आहेत. त्यास दर स्वारीं च्यार आणे रोजमरा द्यावयाचा करार व फतेसिंग गाइकवाडास खारिज करून गुजरातेंत अमलदखल केल्यानंतर हरयेक स्वार व सरदारांस गांवखेडीं जागीर नेमणूक करून द्यावी. येणेंप्रमाणें बोली लोकांसी केली आहे. गोविंदराव जातीनें मुफलिस. येक पैसा समीप नांहीं व सावकार रजावंद नांहीत. गणपतराव कोल्टकरानीं पनास हजार रुपयें रसद देऊ करून दिवाणगिरी केली व बाजीराव मांदळे व आणखी ग्र(ह)स्तानीं फडनीसीचे कामावर तीस हजार व मुजुमुचे कामावर वीस हजार, येणेप्रमाणें लांख रुपये कबूल करून पंचेवीसतीस हजारपर्यंत रुपये दिधले. गोविंदराव गाइकवाड सरदारीवर कायम होईल याचीं चिन्हें कांहीच दिसत नांहींत. याकरितां, गणपतराव वगैरेनीं हात अखडला व रुपये देत नांहींत. सांप्रत च्यार आणे प्रमाणें स्वारांस रोजमरा मिळत नांहीं. याकरितां लोक बेदिल जाहले आहेत. गणपतराव वगैरे कारभाऱ्यांस बाळाजीपंतानीं ताकीद केली आहे कीं, करारा प्रमाणें लाख रुपये देणें व कारभार तुम्हास करणें नसलियां दुसरे कारभारी कामावर निश्चय होतील. गुजरातेंत अमलदखल जाहल्यानंतर तुमचे रुपये तुम्हास पावतील. सारांश, गोविंदराव गाइकवाडाची सरदारी वाऱ्यावरील आहे. सोंनगडासमीप सटवाजी भोंसले व बाजीराव बरवे व दोन पलटणें इंगरेजांची जमीयत आहे व दुर्गोजी भापकर व गणेशपंत बहिरे दोन हजार स्वारानसीं कोंडाईबारीचे जिल्यांत आहेत म्हणोन यैकिलें. या उपरी जें नवल विशेष वर्तमान होईल तें सेवेसी लिहीन हे विनती.

---

**A. R. No. 149** १६ जिल्हेज ११९५ हिजरी
२ डिसेंबर १७८१

पैा छ २२ जिल्हेज रविवार दोन प्रहर दिवस आल्यावर सरकारच्या डांकेबराबर पावली. विद्यमान दारोगे हरकारे, सन ११९५ हिजरी.

श्री

विनंती विज्ञापना यैसी जे येथील कुशल ताा छ १६ माहे जिल्हेज मुाा काा पुण स्वामीचे कृपावलोकनेकरून येथास्थित जाणोन स्वानंद लेखण आज्ञा करीत असिले पाहिजे. विशेष येथील वर्तमान छ ११ माहे मजकूर रोज बुधवारी प्रा:थकाळी विनंतीपत्र सरकारचे डांकेसमागमे सेवेसी रवाणा केले ते पाऊन सविस्तर वर्तमान विदित जाले असेल. तदनंतर येथील वर्तमान हैदर नाईक यासी व इंग्रजासी लडाई होऊन नाईक मजकूर सिकस्त जाले यैसे पूर्वी वर्तमान होते. मागती नाईक मजकूर याणी जमाव करून इंग्रजासी लडाई घेतली हे वर्तमान पूर्वीचे विनंतीपत्री लेखण केले होते, त्याजवरून ध्यानास आले असेल. प्रस्तुत वर्तमान आले आहे की नाईक मजकूर याणी जमाव करून इंग्रजासी मातबर लडाई घेतली. इंग्रज सिकस्त करून माघारा झाडीत घातले. काही बुणगे वगैर त्याचे लुटले यैसे वर्तमान आले आहे. त्याजवरून कारभारी आपले ठिकाणी बहुत संतोश जाले. हे वर्तमान सर्वत्रास सांगू लागले. परंतु येथील कितीक लोकानी तर्क केले की इंग्रज याचा जमाव तीस हजार मणुशाचा आहे. या सिवाये दोन हजार तुरुक स्वार आहेत. हैदरचाही जमाव विशेषे आहे. मध्ये हैदर सिकस्त होऊंन मागती त्याने जमाव करून इंग्रज सिकस्त केले हे आश्चिर्य आहे. कारण की, इंग्रजाचा जमाव मातबर आहे यैसेही बोलतात. प्रस्तुत कारभाऱ्याचे मुखे वर्तमान आहे की, इंग्रजासी व हैदर नायेकासी लडाई होऊन इंग्रज सिकस्त केले यैसे वर्तमान आहे. मागती तिकडील वर्तमान आल्यास लेखण केले जाईल. शृत होये. दरबार वगैर जाला होता. विदित होये. पूर्वी हैदर नायेकानी यास पत्रे लिहिले होती. त्याचा भाव यैकिन्यात आला की, नाईक मजकूर याणी कारभाऱ्यास येथे लिहिले की, आम्हावर इंग्रजाची मसलत असतां आम्ही तहखर्चात आलो. आमच्या मदतेस तुम्हाकडून मातबर फौज यावी ते न आली. बरे तुम्ही तऱ्ही उद्योग करून तिकडे कोंकणप्रांती इंग्रजाचे पारपत्य करावे, तेही न जाले. भोसल्यासी व तुम्हासी स्नेह अस्ता यैसे असोन बंगाल्याहून इंग्रजाचे पलटने इकडील इंग्रजास मदत आली. त्या पलटनास भोसल्यानी इकडे कैसे

येऊ दिल्हे हे आपूर्व वाटले. असो, सर्व मसलत आम्हावरच आली. आपणाकडून तो काही साहित्य होत नाही. जोकडून आमच्यानें होईल, तो पावेतो धीर धरून लडाई होईल तो करू. लाच्यार जाणून मग आम्हासही इंग्रजासी सलूक करणे प्राप्त होईल. पत्राचे उतर यास लिहिणे बहुत अवघड पडले आहे. मग काये उतर लिहून पाठवितील हे ध्याणास आलिया लेखण केले जाईल. शृत होये. छ १२ माहे मजकूर रोज गुरुवार करनेर गाडर इंग्रज ममईस आहे. वर्तमान आहे की येंदा ते पुढे चाल करीत नाहीत. कारण की, इंग्रजास हैदरची मसलत आहे म्हणून इंग्रजानी तिकडेच लडाई घातली आहे या अर्थी इकडे हे इंग्रज स्वस्थ आहेत. त्याजवरून यांचाही उद्योग दिसत नाही. फौज वगैरसही काही पैका टका देत नाहीत. या अर्थी फौजही जमा होत नाही. दुसरे लोकाचेही मागील नालबंदी वगैर देणे या मुळेही लोक येत नाहीत. त्याजमध्यें स्वारीचाही उद्योग दीर्घसूत्री आहे. प्रस्तुत यैसे वर्तमान आहे. पुढे जे मसलतीचे विचारे स्वारी वगैरचा उद्योग करतील, हे ध्यानास आलिया लेखण केले जाईल. शृत होये. छ १३ रोज शुक्रवार नाना हरीपंताचे डेऱ्यास गेले होतें. उभयेताचे खलवत जाला. खलवत होऊन नाना आपले घरास आले. खलवताचा भाव अैकिल्यास आला की, हैदर नायेकाचे पत्रे आली आहेत त्याचे उतर काये ल्याहावे? नाईक मजकूरचे पत्राचा भाव विनंतीपत्री लेखण केला आहेच. त्याजवरून ध्यानास येईल. पत्राचे उतरे हे काये समजून लिहितील, ध्याणास आलिया लेखणांत येतील. परंतु याजला संशये आहे की, आम्हाकडून मातबर कुमक नाईक मजकुरास न पोहचली. त्याजवरच मसलत पडली. कदाचित संकट जाणून त्याणी इंग्रजासी सलूक केला तरी मसलतीस पेंच पडल यैसे विवंचणेत आहेत. याआन्वये खलवत जाला. शृत होये. कारभाऱ्याचेही विचारांत आहे की, मसलत पाहून, कदाचित इंग्रजाचे सूत्र आले तरी दारमदार करावा. परंतु इग्रजानी दादासाहेबाचा मुदा मातबर घातला तरी काये करावे? मातबर मुदा घातला तर न अैकावे. स्वल्पामध्ये येखादी गोष्ट जाली तर मागील पुढील मसलत पाहून येखादी गोष्ट करावी. परंतु, ही गोष्ट दीर्घसूत्रावर आहे. वदंता आहे की, ममईवाल्याकडून

काही येक सूत्र येनार यैसे आहे· मग येविशीचे काये जे वर्तमान ध्यानास येईल ते लेखण केले जाईल· श्रृत होये· छ १४ रोज शणवार राजश्री कृष्टणरावजीकडील पत्रे आली· पत्राचा भाव काही कलल्यात आला नाही· परंतु कृष्टणरावजीस पत्रें लिहिणार व येजमानसाहेबासही अर्जी लिहिणार· शृत होये· सिंद्यासी व इंग्रजासी सलूक जाला· सिंद्याकडील हाती वगैर इग्रजाकडे लडाईत वगैर होते· त्यास सिद्यानी दोन तीन लक्ष रुा देऊन हाती वगैर सोडून आणिले· त्याचा सलूक जाला यैसे वर्तमान आले आहे·शृत होये·इंग्रजाची पलटने दोनच्यार कल्यानी वगैरवर आहेत·कदाचित ते पुढे येतील या अर्थी रास्तियाची वगैर फौज तलेगावकडे रवाणा करणार यैसी यौजणा आहे· शृत होये· छ १५ रोज रविवार हरीपंत व रास्ते वगैर मिलून साहासात हजार फौज जमा आहे व दोनतीन हजार गारदी आहेत· पुढे जे लोक जमा होतील ते लेखण केले जाईल· परंतु लोकास पैसा देत नाहीत त्या अर्थी लोकही जमा सत्वर नेमल्याप्रमाणें होतात यैसे दिसत नाही· शृत होये· वदंता आहे की दादासाहेब वसईस येनार· आल्याचे वर्तमान येथे आलिया लेखण केले जाईल· पुढे जे प्रसगाचे वर्तमान ध्यानास येईल ते सेवेसी लेखन केले जाईल· विदित होये·छ ९ माहे मारचे आज्ञापत्र सरकारचे डाकेसमागमे सादर जाले ते छ १५ माहे मारी पावले· पावोन संतोश जाला· सदैव याचप्रकारे आज्ञापत्रे सादर करनार स्वामी समर्थ· सेवकाचे गावखेड्यापासून खानदेशचे सुभेदारानी दहक व सुभेपटी म्हणौन यैवज घेतला व गनेशपंत बहेरे यानी घासदाना वगैरे सातसे रुपये घेतले· दुसरे मामलेदाराचे नानाप्रकारे उपद्रव ते काये ल्याहवे· राजश्री कृष्टणराव येथे होते त्यास हें वर्तमान सर्व सांगि(त)ले. त्यानी खानदेशचे सुभ्याचे फडनीस सिवरामपत आहेत त्यास सांगितले कीं, यैवज परतून देणे·परतु ते यैवज परतून देत नाही·नानाप्रकारे गोष्टी सागतात येविशई रावजीचे पत्र आले पाहिजे की, सिवरामपंतानी यैवज घेतला आहे तो परतून देवणे व गनेशपतानी यैवज घेतला आहे तो परतून दवणे· याअन्वये रावजीची पत्रे कारभाऱ्यास व त्याचे पुत्रास आली पाहिजेत· जागिरीस फार उपद्रव देतात· भलताच उपद्रव करून पैका

नेतो· येथे सागावे तर कानावेगले टाकीत, लटकी पत्रे मोठ्या संकटे देतात. येविशई रावजीस पुरती येज्यमानसाहेबाकडून, स्वामीकडून ताकीद जाली पाहिजे· बहुत काये लिहिणे कृपालोभ कीजे हे विज्ञाप्ती.

---

**A. R. No .150** २१ जिल्हेज ११९५ हिजरी
८ डिसेंबर १७८१

पैा छ २१ माहे जिल्हेज सन ११९५ हिजरी, शुक्रवार तीन घटका रात्र मो दारोगे हरकारे.

श्री

विनंती विज्ञापना यैसी जे येथील कुशल ता छ २१ माहे जिल्हेज मुकाम का पुण स्वामीचे कृपावलोकनेकरुन येथास्थित जाणून स्वानंद लेखणआज्ञा करीत असिले पाहिजे. विशेषे येथील वर्तमान छ १६ माहे मजकूर रोज सोमवार प्राथःकाली विनंतीपत्र सरकारचे डांकेसमागमे सेवेसी रवाणा केले ते पाऊन सविस्तर वर्तमान विदित जाले असेल. तदनंतर येथील वर्तमान राजश्री आगाजी सरगर याचे पुत्र व मानाजी फाकडे येकत्र होऊन दोनआडीच हजार फौज जमा करून धामधूम करितात· गाव सिवे मारितात. त्याजवरून माणाजी फांकडे वगैरे यासी व जोरावरजंग बहादुर यासी लडाई जाली यैसे वर्तमान येथे आहे· श्रुत होये· राजश्री नाना फडनीस याचा कोन्ही गोत्रज होता तो शांत जाला म्हणून नानास सुतक आहे· दो चौव दिवसा नानाचे सुतकही मोकळे होईल श्रुत होये. राजश्री हरीपंताचे डेऱ्यास दरबार वगैर जाला होता. उपरांतिक हरीपंतासी व कृष्टणरावजीचे पुत्र गोविंदराव यासीं खिलवत जाला· कृष्टणरावजीकडून पत्रे वगैर आली होती ते हरीपंतास दाखविली. पत्राचे उतरे रावजीकडे लेहून रवाणां करणार· पत्राचा भाव कलल्यास लेखण केले जाईल· विदित होये. छ १७ रोज मंगलवार श्री गणपतीचतुर्थी म्हणून श्रीमंत व हरीपंत वगैर थेवरास गणपतीचे

दर्शणास गेले होते. दर्शण करून संध्याकाळी आले. श्रीमंत आपले वाड्यात गेले. हरीपंत वगैर आपले डेऱ्यास गेले. श्रुत होये. हैदर नायेकासी व इंग्रजासी लडाई जाली. इंग्रज काहीयेक सिकस्त जाले. दुसरे इंग्रजाची रसद वगैर येत होती. त्यात इंग्रजाच्या बायेकाही होत्या. हे बातमी हैदर नायेकास कलल्यावर त्या रसदेवर नाईक मजकुरानी फौज पाठविली. रसदेबरोबर येकदोन पलटने होती. त्यासी व नाईक मजकूर याचे लोकासी लडाई जाली. लडाई होऊन इंग्रजाचे लोक सिकस्त केले. इंग्रजाच्या बायेका तीनच्यार धरून आनिल्या. व दोनतीन हांती पाडाऊ करून धरून आणिले यैसे वर्तमान येथे आले आहे. नाईक मजकूर इंग्रजावर गालिब आहेत यैसे वर्तमान आहे. श्रुत होये. सिंद्यासी व इंग्रजासी हिंदुस्थान प्रांती लडाई होती. प्रस्तुत सिंद्यासी व इंग्रजासी दारमदार होऊन सलूक जाला. हे वर्तमान पूर्वीचे येकदोन विनंतीपत्रीं लेखण केले आहे त्याजवरून ध्यानास आले आसेल. प्रस्तुत इंग्रजासी व सिंद्यासी दारमदार होऊन सलूक जाला यैसी वदंता आहे. मागती तिकडील वर्तमान आल्यास लेखण केले जाईल. शृत होये. छ १८ रोज बुधवार कनैर गाडर इंग्रज ममईस आहे. पांचच्यार पलटने कल्याणी वगैरवर आहेत. वंदता आहे की गाडर मजकूर कल्यानीस येनार. यैसी अंतस्थे बातमी आहे. बाहियात्कारे तो वर्तमान आहे की, गाडर मजकूर उद्योग करून इकडे येत नाही. कारण की, इंग्रजास हैदर नायेकाचा शह मातबर आहे. या अर्थी गाडर मजकूर स्वारीचा उद्योग करीत नाही म्हणून येथे कारभारी आपले जागा स्वस्थ आहेत. फौज वगैरही अद्याप मातबर जमा नाही. स्वारीचाच कोठे उद्योग नाही म्हणून फौजेचे लोकासही पैका देत नाहीत आन फौजही पैक्यावेगली जमा होत नाही. प्रस्तुत हरीपंत व रास्ते वगैर मिलून आठ नव हजार फौज जमा आहे. येथे तो वदंता आहे की, गाडर मजकूर स्वारी करून येत नाही त्याजवरून हेही स्वस्थ आहेत. परंतु आंतस्थे वर्तमान आहे की, गाडर मजकूर याची स्वस्थता पाहून दगा करून कल्यानीस येऊन पलटनासहित येकायेकीच बोरघाटावर येईल. आल्यानंतर याजला गरबड करवील. यैसेही वर्तमान आंतस्थे आहे. प्रस्तुत तो हे कोंकणचे स्वारीविसी स्वस्थ आहेत.

बोरघाटास मात्र याचे दोनतीन हजार लोक व दोन हजार गारदी वगैर आहेत व पानसे तळेगावावर आहेत. पुढे गाडर वगैर कडील वर्तमान आलिया लेखण केले जाईल. शृत होये. राजेश्री परशराम रामचंद्र मिरजकर यास बोलाऊ पाठविले आहे की फौजेसहित येणे. तेही थोडे-बहुत लोकानसी येनार, यैसे वर्तमान आहे· शृत होये. छ १९ रोज गुरुवार, कासीकर राज्यासी व इग्रंजासी लडाई होऊन राजा सिकस्त जाला, तो सिंद्यापासी हजार दोन हजार स्वारानसी आहे यैसे वर्तमान आहे. कासीकर राज्याकडून कोन्ही मातबर मणुश येथे येतो यैसे वर्तमान येथे आले आहे. ते ग्रहस्त बऱ्हानपुरापावेतो आले यैसी वंदता आहे· त्या भल्या मणुशास आणावयास येथून सरकारचा कारकून गेला शृत होये. श्रीमंताचे लग्न माघ मासी करणार यैसी यौजणा आहे. समंध राजश्री परशराम रामचंद्र याचे कंन्येसी अथवा त्रिबकरावमामा याचे नातू अमृतराव याचे कंन्येसी यैसी यौजणा आहे. मग कोणता संमध निश्च-यात आलिया मग लग्नाचा निश्चये होतो अथवा न होतो हे ध्यानास आलियां लेखण केले जाईल· शृत होये. कोंकण प्रांती तळ्याघोसल्या-कडे हफशाने काही उपद्रव मांडला आहे. त्याचे पारपत्यास काही गारदी वगैर पाठविणार·शृत होये. राजश्री हरीपंताचे डेऱ्यास दरबार वगैर जाला होता·विदित होये. छ २० रोज शुक्रवार राजश्री गणेशपंत बेहरे दोनेक हजार फौजेनसी कोंडाइबारीकडे आहेत. राजश्री दुर्गोजी भापकर वगैर पाच सातसे रावतानसी कोंडाईबरी खाले आहेत. कारण की, श्रीमंत दादासाहेबाकडील सटोजी भोसले व बाजीराव बर्वे वगैरे तीनच्यार हजार फौजेनसी सोनगडावर आहेत. कदाचित ते पुढे चाल करून आल्यास त्याचे शहावर भापकर वगैर आहेत व गणेशपंतही घाटावर आहेत यैसे वर्तमान आहे शृत होये. श्रीमंत राजेश्री दादा-साहेब पुत्राची मुंज करावयास वसईस येनार यैसी वंदता आहे. वसईस आल्याचे वर्तमान यैकिल्यास लेखण केले जाईल· शृत होये. होलकर वाफगावास डेरे दाखल जाले आहेत. येथे येनार यैसी वंदता आहे. शृत होये. राजश्री गोविदराव गायेकवाड याची उभारनी केली आहे. त्याज-पासी हजार दीड हजार स्वार जमले आहेत. त्यास खर्चायास सरकारातून

पावत नाही. मग ते लोक उठून जातात किंवा राहातात हे पाहावे. शृत होये. प्रस्तुत येथील कारभाऱ्यास इंग्रजाची मसलत गालिब आहे. येविशई खलवत विशेष होत असतो. प्रस्तुत सर्व मसलतीचा डौल हैदर नायेकाचे लडाईवर आहे. हैदर नायेकाचे वकीलासी खलवत करून वरचेवर पत्रे नाईक मजकुरास लिहितात की, इंग्रजाचे पारपत्य करावे. शृत होये. पुढे जे प्रसगाचे वर्तमान ध्यानास येईल ते सेवेसी लेखन केले जाईल, विदित होये. सदैव आज्ञापत्री परामृश होत असावा. बहुत काय लिहिणे, कृपालोभ कीजे हे विज्ञाप्ती.

---

**A. R. No. 151**

२५ जिल्हेज ११९५ हिजरी
१२ डिसेंबर १७८१

पैवस्ती छ ४ गुरुवार माहे मोहरम सन ११९६ हिजरी, दोन प्रहर दिवस आला ते समई पावले.

श्रीनिवास

पोष्य हैबतराव गोपाळ सां। नमस्कार. विनती उपरी, येथील वर्तमान ता। छ २५ जिल्हेज मार्गसीर्ष वद्य द्वादसी सौम्यवासरपर्यंत मो। पुणें स्वामीचे कृपेकरून क्षेम जाणून स्वानंद लेखनाज्ञा केली पाहिजे. विशेष कृपापत्र छ १६ जिल्हेजचें डांकेवर पाठविलें तें छ २४ माहे मारीं चिरंजीव राजश्री राय रघोतमराव यांचे पत्रासहित पावलें व वर्तमान श्रवणें संतोष जाहला. पूर्वी छ २० माहे मारीं हुजूर अर्जी व अखबार व स्वामीचे सेवेसी विनतीपत्र डांकेवर रवाना केलें तें हुजूर व सेवेसी पाऊन वर्तमान श्रुत जाहलें असेल. सांप्रतचें वर्तमान पृथक पत्रीं लिहिलं आहे त्यावरून श्रुत होईल. चिरंजीव राजश्री राव रघोतमराव यांनी हुजूर असल्यास स्वामीची कृपा उतरोतर विशेष व हुजूरीहून सरफराजी त्यांची होत आहे. परंतु येथील कामाची सरबराई अजीपर्यंत

सेवकाकडून जाहली. या उपरी चिरंजीवानीं राहावें हाच मनोदय विशेष. येविषईं पूर्वींपासून विनती सेवेसी आहे व स्वामीनीं चिरजीवाकडील अर्जी हुजूर दिधली. परंतु त्याजवर दसखत अद्यापि होत नाहीं. याकरितां मर्जीस योग्य दिसल्यास रूबरू स्वामीनी अर्ज करावा म्हणजे येजमानसाहेब कृपा करून आज्ञा करतील. विशेष काय लिहिणें हे विनती.

---

श्रीनिवास

अखबार पुणें अज इा छ २१ माहे जिल्हेज लगायत छ २५ माहे माार सन ११९५ हिजरी, बुधवार.

हैदरअलीखानासीं व करनल कूटासीं छ १५ जिलकादीं बेमराजपाळ यासमीप लढाई जाहली. दुतरफा लोक जखमी व ठार जाहले म्हणोन कृष्टणराव जोसी वकील यांनी वर्तमान लिहिलें होते. व कृष्टणराव बलाळ यांची पत्रें यथील कारपरदाजांस आली. त्यावरून हरीपंत व बालाजीपंतानीं खिलवत करून राव माारनुलेस उतरें लिहून पाठविलीं. यावितरिक्त अवांतर वर्तमानासहित पूर्वीं पत्र पाठविलें तें पाऊन वर्तमान श्रुत जाहलें असेल. सांप्रतचें वर्तमान प्रत्यक्ष व यैकिलें दफेवार सेवेसी लिहिलें असे.

पंतप्रधानांचे कारभाऱ्याचें तरफेनें कोंकणांत कल्याणीचे समीप कारकून व हरकारे खुफिया आहेत. त्याजकडून येथील कारभाऱ्यास प्रसिध वर्तमान येत आहे. करनल गाडर मुंबईस होता. तेथून कल्याणीस आला म्हणोन येथील कारभाऱ्यांस खबर आली आहे. त्यास इंगरेजांची पलटणें दोनतीन कल्याणी व बदलापुरासमीप पूर्वींपासून आहेत तें त्याच स्थळीं कायम व गाडराची अमदरफ्त मुंबई व कल्याणीस येक दोनदां जाहलीं. याकरितां सांप्रत गाडर कल्याणीस आल्याचा विशेष येथील कारभारी मानीत नाहींत. व गाडरासमीपची जमीयत जनराल कूटाचे कुमकेस गेली आहे. यावर्षीं गाडराकडून कांहीं अज्म होत नाहीं. हा निश्चय येथील कारपरदांजास जाहला आहे. याकरितां पागेचे

स्वार व सिलेदार नवनिगाहदास्तीचे सालाबाद येणार, ते आले होते. त्यांस कारपरदाजानी रुखसत केलें. पागेची घोडीं चराईस गेलीं व सिलेदार आपले घरास जातात. सरजामी जागीरीची फौज व बालाजीपंताची खांसगत व हरीपंताचे निसबतीची समग्र पांचसाहा हजार स्वार मवजूद आहेत. सखाराम पानसे पुण्याहून तीन कोसी व गंगाधरराव रास्ते पुण्यासमीप प्रतिनिधीची फौज सातआठसें व शाहजी भोसल्याकडील भवानजी भोंसले व हुजरातीपैकीं घोरपडे वगैरे मवजूद आहेत. घोरपडे व पाटणकर वगैरे मानकरी सरदारांस रोजमरा पावत आहे. वरकड लोकांस रोजमरा व नालबंदी कांहीच पावत नांहीं.

गोविंदराव गाइकवाडासमीप पांचसातसे स्वार पूर्वील सिलसिल्याकरितां राहिले आहेत. रोजमरा स्वारास च्यार आणेप्रमाणेही पावत नांहीं. सरदारीचा बखेडा आहे.

---

२

पुरवणी अखबार छ २५ जिल्हेज सन ११९५ हिजरी.

छ २३ माहे मारीं गाडराचे तरफेनें कासदजोडी आली. बालाजीपंतास गाडराचा खरीता आला तो कासदांनीं पावता केला. बालाजीपंतानीं गाडराकडील कासदजोडीस तकयुद करून ठेविलें व पुन्हां ज्वाब देऊन रवाना केलें म्हणोन खारिज यैकिलें. बालाजीपंताचे मुकरब व गोविंदराव कृष्टण यांजसमीप तहकीककरितां मारनुलेनी सांगितलें कीं गोवेकर फिरंग्याचे तरफनें कासदपत्रें घेऊन आले होते. गाडराचे तरफेनें कागदपत्र आले नांहींत. येथील दरबारी लोकांचे जुबानीं वर्तमान तहकीक होत नांहीं.

कासीकर जमीदार चेतसिंग रेवामुकुंदपुराहून माहदाजी सिंद्यासमीप येणार. नजफखान व सिंदे येकत्र होऊन इंगरेजांचे मुकाबल्यास जाणार म्हणोन खारिज वर्तमान यैकिलें. माहदाजी सिंदे चंदेरीहून पांचसात कोसी आहेत म्हणोन पूर्वी यैकिलें. त्याचप्रमाणें सांप्रत यैकतों. नवल विशेष कांहीं नांहीं.

हैदरअलीखांनाकडून या दिवसांत कांहीं वर्तमान आलें नांहीं.

मानाजी फांकड्याचे येण्याविषईं यथील कारपरदाज प्रयत्न करीत आहेत. व फांकडे मार करार करीत आहे कीं आपण सत्वर यतो. परंतु, येण्याची शकल व त्याची खातरजमा कारपरदाजांचे तरफेनें होणें दुस्तर दिसतें. व सांप्रत सरगरासीं मुतफिक होऊन पालीम वगैरे तालुकियांत हंगामा करितो म्हणोन खबर आहे.

बज्याबा पुरंदरे चंदनवंदनचे गडावर कैदेंत आहेत. त्यांस कैदेतून सोडवावयाकरितां बज्याबाजी आजी आबई व माहदाजी नीळकंठ पुरदरे, बज्याबाचे भाऊ, पुण्यास आले आहेत. व धोंडोबा पुरंदरे बालाजीपंताचे यैक्यतेंत आहेत, त्याचे विद्यमानें बाळाजीपंत नाना फडनवीसांसी पैगाम बज्याबास सोडवावयाचा लाविला आहे. श्रुत होय हे विनती.

---

**A. R. No. 152**

२६ जिल्हेज ११९५ हिजरी
१३ डिसेंबर १७८१

श्री

विनंती विज्ञापना यैसी जे येथील कुशल ता। छ २६ माहे जिल्हेज मु। का। पुण, स्वामीचे कृपावलोकने येथास्थित जाणोन स्वानंद लेखण आज्ञा करीत असिले पाहिजे. विशेषे, येथील वर्तमान छ २१ माहे मजकूर रोज शणवारी प्राथ्रकाळी विनंतीपत्र सरकारचे डांकेसमागमे सेवेसी रवाणा केले. ते पाऊन सविस्तर वर्तमान विदित जाले असेल. तदनंतर येथील वर्तमान हैदर नायेकाचे वकील राजश्री हरीपंताकडे आले होते. वकीलासी व हरीपंतासी च्यार घटका खिलवत जाला. खिलवतीचा भाव यैकिल्यात आला की, नाईक मजकुराने पत्रे पाठविली त्याची उतरे नायेकास लिहिणार. नाईक मजकुराने पत्रे पाठविली त्याचा भाव अैकिल्यात आला की, नाईक मजकूर इंग्रजासी काही दारमदार करनार. कारण की, याजकडील काही कुमक न पोहचली.

मसलत त्याचेच अंगावर पडली म्हणून ते काही दारमदार करणार यैसी वदंता आहे, शृत होये. नानास पांचच्यार दिवस जाले सुतक आहे. म्हणून दरबार वगैर हरीपंताकडे होत असतो. कार्याकारण खिलवतीचे लोक नानाकडे मात्र येत असंतात. येका दो दिवसानी नानाचेही सुतक मोकळे होईल. नानाचा कोन्ही गोत्र पुरुश मेला म्हणोन नानास सुतक आहे. नानास सुतक आलं हे पूर्वीही लेखण केले होते त्याजवरून शृत जाले असेल. विदित होये. छ २२ माहे मजकूर रोज रविवार करनैल गाडर ममईस होता व पलटने पाचच्यार कल्यानीस आहेत. प्रस्तुत वदंता आहे की, करनैल गाडर इंग्रज कल्यानीस आला. जमा (व) वगैर करितो. पुढे तो बोरघाटाकडे चाल करणार, यैसे वर्तमान आहे. मागतीं तिकडील तहकीक वर्तमान आल्यास लेखण केलें जाईल. शृत होये. अंतस्ते तो वर्तमान आहे कीं गाडर मजकूर कल्यानीस येऊन पुढे चाल करनार. बाहियातकारे तो वर्तमान आहे की येंदा इग्रंज स्वारीचा उद्योग करीत नाहीत. कारण की, हैदर नायेकाची मसलत त्यास रूबकार आहे. या आर्थी तें इकडे येत नाहीत याकरितां येथील कारभारी आपले जागा स्वस्त आहेत. फौज वगैरेही थोडकी जमा आहे. नेमल्याप्रमाणें फौज जमा नाही. कारण की, प्रस्तुत स्वारीचा उद्योग कोठे नाही. या अर्थी नेनल्याप्रमाणे फौज जमा करीत नाहीत. प्रस्तुत याप्रकारचे वर्तमान येथील आहे. मग गाडर मजकूर कल्यानीस आला यैसी वंदता आहे. कदाचित तो कल्यानीस येऊन पुढे चाल केल्यास मग याजलाही स्वारीची मसलत करणे प्राप्त यैसे आहे. प्रस्तुत तो हे आपले जागा स्वस्त आहेत. हरीपंत व रास्ते वगैर मिळून आठ नव हजार फौज आहे शृत होये. पानसे वगैर हजार बारासे स्वारानसी येथून चव पांचा कोसावर होते ते तळेगावाकडे कूच करून गेले यैसे वर्तमान आहे. विदित होये. छ २३ माहे मजकूर रोज सोमवार श्रीमंत राजश्री दादासाहेब सुरतेहून वसईस येनार यैसी वंदता होती. प्रस्तुत वर्तमान आहे की, दादासाहेब वसईस यावयास सुरतेहून निघाले होते. वसईस न येता माघारां परतून सुरतेस गेले यैसी वंदता आहे. मागती त्याजकडील वर्तमान आलियास लेखण केले जाईल. श्रृत होये. रास्ते येथे दोनअडीच हजार फौजेनसी आहेत. त्याची रवाणगी

तळेगावाकडे करणार. कारण की, गाडर मजकूर कल्यानीस आला यैसी वंदता. या अर्थी याची रवाणगी तळेगावाकडे करावी यैसी यौजणां आहे. मग रास्ते वगैर याची रवाणगी जाल्यास लेखण केले जाईल शृत होये. राजश्री कृष्टणरावजींकडील पत्रे आली. पत्रे रावजीचे चिरजींव नानाकडे घेऊन गेले. पत्रे वगैर नानानी वाचली. उपरांतिक रावजीचे चिरंजीवासी व नानासी च्यारसाहा घटका खिलवत जाला. खिलवत होऊन रावजीकडे पत्रे व येजमानसाहेबास अर्ज्या ल्याहाव्यां यैसा निश्चयें जाला. रावजीस तो पत्रे वरचेवर लिहीत अस्तात. शृत होये. हरीपंताकडे दरबार वगैर जाला होतां. कामेकाजे वगैर जाली. शृत होये. छ २४ रोज मंगलवार, हैदर नायेकाकडील पत्रे आली. पत्राचा भाव यैकिल्यात आला की, नाईक मजकूर यानी कारभाऱ्यास लिहिले होते की, सर्व मसलत इग्रंजाची आम्हावरच पडली, यामुळे आमचा नाश फार जाला. आम्ही तहखर्चात मसलतीमुळे आलो. तुम्हाकडून मातबर फौजेची कुमकं येऊन पोहचावी ते न पोहचली. सर्व मसलत आम्हासच रुबकार जाली. आपले साहित्याचा भर्वसा फार होतां. ते गोष्ट न घडली. असो, जे जाले ते उतमच जाले. आम्ही तहखर्चात कोठपंरियेंत यावे यां अर्थी आम्हास इग्रंजासी दारमदार करणे प्राप्त आहे. यैसे नायेकानी बहुतांप्रकारे यास लिहिले होते. याप्रमाणे नायेकाचे पत्रे आल्यानंतर कारभारी बहुत आंदेशात पडून दोन तीन दिवस खिलवत बहुत होतो. खिलवतीचा भाव यैकिल्यात आला की, कदाचित नाईक मजकूर याणी इग्रंजासी दारमदार केल्यास पेंच भारी आहे कीं, त्याचा दारमदार जाल्यास तिकडील पलटने ममई कडे उतरल्यास ते इकडे उद्योग करतील. आपणास मसलत प्राप्त होईल यैसे आंदेशे करून मसलत करितात यैसी वंदता आहे. पुढे हैदर नायेकाकडील व इग्रंजाकडील काये वर्तमान येईल ते लेखण केले जाईल. हैदर नायेकाचे वकीलास बोलाऊन बहुत ममतापूर्वक भाशणे करून नाईक मजकुरास पत्रे लिहिणार. शृत होये छ २५ रोज बुधवार, होलकर वाफगावास डेरे दाखल आहेत. फौज वगैर त्याजपासी दोन तीन हजार प्रस्तुत जमा आहे. लोकाचे देण्याचा गवगवा आहे. त्याजकडील दिवांण येथे आहेत

कारभाऱ्यासी काही यैवज मागतात. दुसरे, होळकरासी व अहिल्याबाईसी शुध्रतां नाही. यामुळे सरदारीतही फितूर आहे. प्रस्तुत होळकर वाफगावास आहेत. पुत्राचे लग्नाकरितां चादवडांस जाणार यैसी वंदता आहे. परंतु, कारभाऱ्याचे मानस की होलकरानी पुत्राचे लग्न वाफगावीच करात्रे यैसे आहे. विदित होये. सिंद्यांसी व इंग्रजासी दारमदार होऊन सिंदे उज्यणीस येताल यैसी वंदता आहे. शृत होये. हैदर नायेकाच्या शहास इग्रंजाचे पलटने आहेत. त्याजपैकी पाचच्यार पलटने ममईस गाडराकडे आली. उपरांतिक गाडर मजकूर पलटनासहित कल्यानीस आला यैसे वर्तमान आहे. मागती तिकडील वर्तमान आल्यास लेखण केले जाईल. शृत होये. राजश्री धोडोबा अपा पुरधरे मानाजी फाकडे याची रदबदली करीत होते की, त्यास कौल द्यावा. त्यास आणू. त्याजवरून फाकडे माार धोडोबा अपा पुरधरे याचे विद्यमाने येतात. जेजुरीपावेतो आले. यथे आलिया लेखकन केले जाईल. शृत होये. राजश्री माधवराव नीलकठ पुरंधरे पाचच्यार दिवस जाले सासवडाहून येथे आले आहेत. श्रीमताची भेट जाली. आपले वाड्यात आहेत. राजश्री बज्याबा व मारोबा याची सोडावयाची रदबदली लागली आहे. मग काये निश्चये होते तो पाहवा. पुढे जे प्रसगाचे वर्तमान ध्यानास येईल ते सेवेसी लेखन केले जाईल. शृत होये. छ १६ माहे माारचे आज्ञापत्र सरकारचे डाकेसमागमे सादर जाले ते छ २४ माहे माारी पावले. पावोन बहुत संतोश जाला. सदैव याचप्रकारे आज्ञापत्रे सादर होत असावी. बहुत काय लिहिणे, कृपालोभ कीजे हे विज्ञाप्ती.

---

**A. R. No. 153** २८ जिल्हेज ११९५ हिजरी

१५ डिसेंबर १७८१

पैाा छ ७ माहे मोहरम रविवार सन ११९६ हिजरी त्रितीये प्रहर मै जोडी डांक सरकार.

श्रीनिवास

पोष्य हैबतराव गोपाळ साष्टांग नमस्कार. विनती उपरी, येथील वर्तमान ताा छ २८ जिल्हेज पौष्य शुध प्रतिपदा मंदवासरपर्यंत मोा

पुणें स्वामीचे कृपेकरून क्षेम जाणोन स्वानंद लेखनाज्ञा केली पाहिजे. विशेष, पुर्वी छ २६ माहे मारीं डांकेवर हुजूरअर्जी व स्वामीचे सेवेसी पत्र रवाना केलें तें हुजूर व सेवेसी पाऊन वर्तमान कळलें असेल. सांप्रत येथील वर्तमान पृथकपत्री लिहून सेवेसी पाठविलं आहे व हुजूरअर्जी व अखबार लिहून दारोग्याकडें पाठविली आहे. हुजूर व स्वामीचे सेवेसी दारोग्याचे विद्यमानें पत्रें पावतील. इंगरेजासीं बिगाड करून सिकाकोल, राजबंदरी वगैरे प्रांताची जप्ती करावी येविषईं येथील कारभारदाजांचे सांगितल्याप्रमाणें कृष्टणरावजीनी हुजूर अर्जमारूज केला. परंतु, राव मारनुलेचा अर्ज हुजूरपिजीरा होत नांहीं व हैदरअलीखानांकडील रुजवातीनंतर इंगरेजांचे तंबीचा अज्म होणें किंवा न होणें, याचा निश्चय होईल म्हणोन इरशाद जाहला आहे म्हणोन बालाजीपंतानी सेवेकासमीप चर्चा केली व पुन्हां बोलिले कीं, सांप्रत इंगरेजांवर हैदरअलीखान गालिब जाहला आहे याकरितां हुजूर इलतिजा करून नम्रतेची गोष्ट सांगत आहेत व ताबेदारी व फीदवीयत यख्तियार करितात. हैदरअलीखानाचा व इंगरेजांचा दारमदार कदाचित जाहला तरी कांहीं दिवस स्वस्थ राहून उपरांतिक हुजूरचे जनाब मुकद्दसेंत बाद आहदीची गोष्ट सांगतील यैसें आम्हास वाटतें. याउपरी बंदगान हजरत पोख्तकार व अरस्तु फितरत आहेत. जे सलाह हुजूरचे दौलतख्वाहीची व पंतप्रधानांचीं बेहबूदी ज्यांत, त्याप्रमाणें आम्हास आज्ञा करतील व हुजूरीहूनहीं आमल होईल व इंगरेज बदमामली व बदकौली म्हणोन आम्हीं हुजूर अर्ज करितों हें सांप्रतच हुजूर यकीन असेल. कदाचित नसल्यास पर्यायेंकरून यकीन होईल यैसें आम्हास भासतें याचें कारण इंगरेजासीं व आम्हासी समंध बहुत पडला व त्यांची बदकौली ध्यानास आली आहे म्हणोन बाळाजीपंताचे जुबानी चर्चा यैकिली. सेवेसी श्रुत होय. बहुत काय लिहिणें हे विनती.

---

पैा छ ७ मोहंरम सन ११९६ हिजरी, रविवार त्रितीये प्रहर मै डांक सरकार.

श्रीनिवास

अखबार पुणें अज इा छ २६ जिल्हेज लगायत छ २८ माहे मार शनिवार सन ११९५ हिजरी पौष्य.

गाडराचे तरफेनें कागद बालाजीपंत फडनवीसास आला म्हणोन खारिज वर्तमान यैकिलें. परंतु, येथील कारपरदाजांचे जुबानी तहकीक केलें नांही, व गोवेकर फिरंग्याकडील पत्र आलें असेल म्हणोन गोविंदराव कृष्टण यानी सागितलें व कासीकर जमीदार चेतसिंग माहदाजी सिंद्यासी मुलहक होणार. करनल गाडर मुंबईहून कल्याणीस आला. परंतु, हरकत पेशकदमीची दिसत नांहीं व पंतप्रधानांचे कारपरदाजानीं दोनतीन पागा चराईचे मकानास रवाना केल्या व सिलेदार लोक नौकरीचे इराद्यानें आले आहेत त्यांस नौकर न ठेवितां रुखसत करीत आहेत. यावितरिक्त अवांतर वर्तमानासहित छ २६ माहे मारीं हुजूरअर्जी व अखबार व स्वामीचे सेवेसी पत्र डांकेवर रवाना केलें तें पाऊन वर्तमान कळलें असेल. सांप्रतचें वर्तमान प्रत्यक्ष जाहलें व यैकिलें दफेवार लिहिलं आहे.

गाडराकडील खरीता बालाजीपंतास आला म्हणोन खारिज यैकिल्याप्रमाणें पूर्वील पत्रीं मार लिहिला आहे. त्यानंतर छ २६ माहे मारी राजश्री बालाजीपंत नाना फडनीसाचे घरास गेलों होतों. समक्ष दर्शनोतर खरीता गाडराकडील आला म्हणोन बाहेर लोकांचे जुबानी यैकिलें. हे सत्य किंवा मिथ्या म्हणोन विचारिलें. नानानीं उतर केलें कीं मुंबईहून जनराल किंवा गाडराचे तर्फेची जासूदजोडी इंगरेजी लिपीचीं पत्रें घेऊन बंदर मदरासेंस जात होती. तो पंतप्रधानाकडील तालुकदार कोंकणांत आहेत त्यांचे चौकीवर जोडी धरली ते पुण्यांस पाठविली. हरकाऱ्यांसमीपची पत्रें घेतलीं. इंगरेजी लिपीचीं आहेंत. अद्यापि वाचून पाहविलीं नांहींत. या–

प्रमाणें सांगितलें. पूर्वील पत्रीं लिहिलें आहे कीं, बाळाजीपंतानीं जामु-
दांस प्रत्योतर देऊन रवाना केलें. त्यास खुफिया बातनीची पत्रें कल्याण
व साष्टीसमीप पंतप्रधानाकडील कारकून लिहून पाठवीत आहे. त्याची
इतिला कोणास नांहीं. त्या कारकुनाचे पत्राचीं उतरें गेलीं म्हणोन
अन्यत्र दरबारी ग्रहस्ताचे मुखं यैकिलें. खारिज वर्तमान यैकिलें तें पूर्वील
पत्रीं लिहिलें आहे. सांप्रत बालाजीपंताचे जुबानीं यैकिल्याप्रमाणे
सेवेसी लिहिलें असे. गोवेकर फिरंग्याची पत्रें अकसर कारपरदाजास
येत आहेत व यांची उतरें गोवेकरास जात आहेत.

---

पैा छ ७ मोहरम रविवार सन ११९६ हिजरी, त्रितीये प्रहर मै
जोडी डांक सरकार.

२.

पुरवणी अखबार पुणें छ २८ जिल्हेज सन ११९५ हिजरी.

माहदाजी सिंद्याकडे कासीकर जमीदारचेतसिंग येणार म्हणोन
पूर्वील पत्रीं लिहिलें आहे. सांप्रत बालाजीपंताचे जुबानीं यैकिलें कीं
माहदाजी सिंदे झांसीसमीप आहेत व चेतसिंग जमीदार बनारस च्यार
कोसाचे फासल्यानें आला. येकदोन दिवसांत परस्परें भेटी होणार.
चेतसिंगाचे हमराह च्यार हजार प्यादा व हजार स्वार आहेत. पत्रें
छ १० जिलकादचीं आलीं म्हणोन बालाजीपंतानीं सांगितलें.

करनल गाडर मुंबईहून कल्याणीस आला आहे. च्यार पलटणें
जमीयत कल्याणी व बदलापुरासमीप आहे व तोफा तख्त्यावर चढऊन
तयार केल्या आहेत. परंतु, घांटावर येण्याचा उद्योग करील किंवा करीत
नांहीं याचा निश्चय कळत नांहीं. मुंबईंत दोन पलटणें व साष्टींत दोन
पलटणें येकोन आठ पलटणें जमीयत आहे व पूर्वीं दोन पलटणें चिना-
पटणवाल्याचे कुमकेस गेलीं म्हणोन बालाजीपंताचे जुबानीं यैकिलें.

साल मारीं कोंकणांत कल्याणीचे रुखें इंगरेजाचे मुकाबिल्यास
पंतप्रधानांची फौज न पाठवावयाचें कारण साल गुजस्तां पंतप्रधा-
कडील फौजा कोंकणांत गेल्या होत्या. त्यांनी बोरघांट वगैरे घांटापासून

कल्याणी व वम्बईचे गिर्दनवाहचा प्रांत समग्र ताख्तताराज केला. समग्र प्रांत उज्याड जाहला याकरितां गल्याची दुर्भिक्षता व वैरणहीं नांहीं. इंगरेजाकडील पलटणें घांटावर येतील ते समई फौज मुकाबिल्यास सित्ध आहे, जाईल. व इंगरेजांस घांटावर येऊं द्यावें, त्यानंतर फौज रवाना करावी, यांत काबू व सलाह पाहून फौज सांप्रत रवाना करीत नांहीं म्हणोन बालाजीपंताचे मुखोदगत चर्चा यैकिली.

छ २८ माहे मारीं बालाजीपंत हरीपंताचे डेऱ्यास गेले होते. प्रहर येक येकांत होऊन पुन्हां हवेलीस आले.

गोविंदराव गाइकवाडाचे हमराह सातआठसे स्वार आहेत. त्या लोकास रोजीना येक आण्याप्रमाणेंही रोंजमरा मिळत नांहीं. याकरितां लोक बेदिल होऊन उठोन जात आहेत. खंडो आवजी म्हणोन गाइकवाड माराचे कदीम कारभारी. त्यांस बालाजीपंतानीं बोलाऊन आणिलें व मुख्तारीनें कारभार करून, फौज ठेऊन गुजरातेंत जाऊन मुलुक काबीज करा म्हणोन सलाह सांगत आहेत. या कारभारास दोन-तीन लाख रुपये नख्त निकृष्टपक्षीं पाहिजेत. याकरितां कोण्हीं कबूल करीत नांहीं. पूर्वील गणपतराव वगैरे कारपरदाजानीं हार मानून कारभार सोडला आहे. सेवेसी श्रुत होय हे विनती.

---

**A. R. No. 154** — २९ जिल्हेज ११९५ हिजरी

१६ डिसेंबर १७८१

पैा छ ७ मोहरम रविवार सन ११९६ हिजरी त्रितीये प्रहर मैं डांक सरकार.

श्री

विनंती विज्ञापना यैसी जे येथील कुशल ताा छ २९ माहे जिल्हेज मुाा पुण स्वामीचे कृपावलोकनेकरून येथास्थित जाणोन स्वांनद लेखण आज्ञा करीत असिले पाहिजे. विशेषे येथील वर्तमान छ २६ माहे मजकूर रोज गुरुवारी प्राथकाली विनंतीपत्र सरकारचे डांकेसमागमे सेवेसी रवाणां केले ते पाऊन सविस्तर वर्तमान विदित जाले असेल. तदनंतर

येथील येथील वर्तमान करनैल गाडर कल्यानीस आला यैसे वर्तमान होते. प्रस्तुत वर्तमान आहे की, गाडर मजकूर ममईस आहे, कल्यानीस येनार. कल्यानीस आल्याचे वर्तमान मागती आलियां लेखण केले जाईल. प्रस्तुत करनैल मजकूर ममईसच आहे. कल्यानीस येऊन स्वारीचा उद्योग नाही यैसे वर्तमान येथे आहे. त्याजवरून येथील कारभारी कोठे उद्योग न करतां स्वस्त आहेत. उद्योग नाही म्हणोन पागा वगैर सिलेदारास निरोप देतात. कार्याकारण पागा वगैर लोकास ठेऊंन घेतात बाकी सिलेदार वगैर लोकास निरोप देतात यैसे आहे. मागती कोंकणप्रांतीची बातमी आलियास काये मसलत कारभारी करतील हे ध्यानास आलियां लेखण केले जाईल. शृत होये. छ २७ रोज शुक्रवार. मुसां नारंग फिरंग्याचे येथें फिरंगी गोरे आहेत त्यापैकी दोन गोरे फिरंगी कलवातीचे घरी गेले होते. त्या उभयेताचा कजियां रांडेवरून जाला. त्यास येका फिरंग्यानी येक फिरंगी मारून टाकिला. त्याजवरून त्याचे आपसामध्यें बलवा जाला होता. ज्या फिरंग्यांनी फिरंगी मारला, त्यास रा नानानी धरून वाड्यात आनिले. आनून चवकसी करीत होते. चवकसी होऊन पुढे काये जे करतील ते लेखण केले जाईल. शृत होये. राजश्री गोंविदराव गायेकवाड याजवल हजारबारासे स्वार जमले आहेत. आणिक त्याची काही उस्तवारी करून गायेकवाड मजकुरास गुजरात प्रांती रवाणां करावे यैसी योजणा आहे. शृत होये. हैदर नायेकाचां व इग्रंजाचा दारमदार होनार यैसे वर्तमान आहे. त्याजवरून कारभाऱ्यानी नाईक मजकुरास लिहिले आहे की, इग्रंजासी दारमदार प्रस्तुत करावा हे ठीक नाही. तुमचे साहित्यास काही फौजही पाठऊन देऊ. परंतु, दारमदार करावा हे कामाचे नाही. दारमदार करणे तरी तुमचे आमचे विचारे काये होणे ते होईल. यैसी पत्रे नाईक मजकुरास लिहिली यैसी वंदता आहे. परंतु, नाईक मजकूर इग्रंजासी दारमदार करनार यैसे वर्तमान आहे. मागती तिकडील वर्तमान आल्यास लेखण केले जाईल. शृत होये. छ २८ रोज शणवार. मानाजी फाकडे यास आणांवे यैसे सूत्र राजेश्री धोंडोबा आपा पुरंधरे याचे विद्यमाने लागले आहे. फांकडे मजकूर जेजुरीपावेतो आले यैसे वर्तमान होते. त्यास फाकडे मजकूर यास

आणावयास धोंडोबा आपा पुरंधरे याचा कारकून गेला आहे. आद्याप फाकडे मजकूर बालेघाटाकडेच आहेत. जेजुरीस आले नाहीत. आल्यावर लेखण केले जाईल. विदित होये. महमदआलीखाणाकडे याणी काही सूत्र इग्रंजाचे दारमदाराविशी लाविले आहे यैसी वंदता आहे. याचा शोध करून मागाहून लेखण केल जाईल. शृत होये. नाना हरीपंताचे डेऱ्यास गेले होते. हरीपंताचा व नानाचा येक प्रहरपावेतो खिलवत जाला. उपरांतिक नाना आपल्या घरास आले. खिलवतीचा भाव आपले दौलतीचे बंदोबंस्ताविशी व इग्रंजाचे मसलतीविशी जाला यैसे यैकिल्यात आले. शृत होये. राजश्री कृष्टणरावजीची पत्रे वरचेवर येत आस्तात. शृत होये. पुढे जे प्रसगाचे वर्तमान ध्यानास येईल ते सेवेसी लेखन केले जाईल. श्रुत होये. बहुत काय लिहिणे कृपा लोभ कीजे हे विज्ञाप्ती.

---

**A. R. No. 155**

४ मोहरम ११९६ हिजरी
२० डिसेंबर १७८१

पै।। छ १३ माहे मोहरं संन ११९६ हिजरी रोज शेनिवार मै दारोगा हरकारा.

श्रीनिवास

पोष्य हयपतीराव गोपाळ साष्टांग नमस्कार. विनती उपरी, येथील वर्तमान ताा छ ४ मोहरम पौष्य शुध षष्ठी गुरुवासरपर्यंत मो पुणें स्वामीचे कृपेकरून क्षेम जाणून स्वानंद लेखनाज्ञा केली पाहिजे. विशेष पूर्वीं छ २९ जिल्हेजी डांकेवर पत्रें पाठविलीं तें हुजूर व स्वामीचे सेवेसी पावलीं असतील. सांप्रत हुजूरअर्जी व अखबारेचा लिफाफा व स्वामीचे सेवेसी अखबार पृथक पुरवणीपत्री लिहून डांकेवर पत्रें पाठ-विलीं आहेंत. दारोग्याचे विद्यमानें हुजूर व स्वामीचे सेवेसी पावतील. चिरंजीव राजश्री राय रघोतमराव यांचे नांवचा लिफाफा सेवेसी पाठविला आहे तो चिरजीवास पावेल. या दिवसांत येथींल कारपरदाज खिलवतेंत बहुत मशगुल आहेत. वर्तमान प्रसिधींत येत नांही. सेव-

काचे कयासास जें आलें तें व येथील स्नेहिताचे मुखं यैकिलें वर्तमान चिरंजीवास लिहिलें आहे. ते सेवेसी विनती करतील. स्वामीचे प्रत्यास आलियां आपले आज्ञेप्रमाणें हुजूर विनती करतील. बहुत काय लिहिणें हे विनती.

---

पै।। छ १३ मोहरं संन ११९६ रोज शेनिवार.

श्रीनिवास

अखबार पुणें अज इा छ २९ जिल्हेज सन ११९५ लगायत छ ४ मोहरम सन ११९६ हिजरी.

माहदाजी सिंदे झासीसमीप आहेत व चेतसिंग जमीदार कासीचा, च्यार कोसाचे फासल्यानें झासीपासून होता व सिंदे मारांची भेट येका दोन दिवसानीं होणार होती व इंगरेजांकडील कासदजोडी मुंबईहून मदरासेस जाणार होती ते चौकीवर धरली व पुंण्यास आणली व करनल गाडर मुंबईहून कल्याणीस आला, व तोफा वगैरे जंगी सरजाम बाहेर काहडला आहे म्हणोन बालाजीपंताचे जुबानी व खारिज वर्तमान यैकिल्याप्रमाणें पूर्वील पत्रीं लिहून पाठविलें, त्यावरून श्रुत जाहलें असेल. त्याउपरी यैकिलें व प्रत्यक्ष वर्तमान दफेवार सेवेसी लिहिलें आहे.

करनल गाडर कल्याणीस तीन पलटण जमीयतसुधां आहे व पंधरा तोफा व गोळे व दारूचे संदुकासुधां छकड्यावर चढऊन तयार केल्या आहेत व आणखीं तोफा पलेदार तयार करीत आहे, व दरयाकिनारा पंतप्रधानाकडील किले आहेत त्यापैकीं रेवदंडा किंवा आणखीं कोण्हींयेक किल्यास लागणार म्हणोन येथील कारपरदाजांस बातनी आली व राघोजी आंगरे याचे वकीलाचे जुबानीं खबर यैकिली.

दुर्गोजी भापकर कोंडाईबारीचा घांट उतरून सोनगडचे जिल्यांत गेला व सुरत प्रांतात ताख्तताराज करितो, व गणेशपंत बहिरे घांटासमीप दीड हजार फौजेनसीं आहे व इंगरेजांकडील दोन पलटणें व

सटवाजी भोंसले वगैरे भापकराचे रुखावर आले आहेत म्हणोन पूर्वील पत्री मार लिहिला आहे. सांप्रत वर्तमान यैकिलें कीं, इंगरेजांचीं पलटणें व फतेसिग गाइकवाडाचीं दोन हजार फौज व सटवाजी भोंसले वगैर बइतिफाक भापकराचे फौजेवर चालून आले. पलटणें व फौज आल्याची खबर यैकोन दुर्गोजी भापकर माघारा कोंडाईबारीसमीप गणेशपंत बहिऱ्यास मुलहक जाहले. घांटाखालें दोनतीन ठाणीं भापकरानी घेतली होती. त्या ठाण्यांतील लोक ठाणीं सोडून गेले व वासदें म्हणोन मकान तथील ठाण्यांत शंभरदीडसे गाडदी राहिले होते. इंगरेजानी ठाणें घेतलें व ठाण्यांतील लोकास कतल केलें म्हणोन वर्तमान यैकिलें.

नारो गणेश व पाराजीपंत नि॥ तुकोजी होळकर पुण्यांस आले आहेत म्हणोन पूर्वी वर्तमान लिहिले आहे. सांप्रत सफरचे महिन्यांत तुकोजी होळकरचे लेंकाचें लग्न वाफगांवी होणार आहे याकरितां होळकर माराचे लिहिल्याप्रमाणें उभयता मारनुलेनीं छ ३ माहे मारीं बालाजीपंतापासून रुखसत घेतली.

---

२

पुरवणी अखबार पुणें छ ४ मोहरम सन ११९६ हिजरी.

बळवंतराव नि॥ मुधोजी भोंसले हुजूर आले आहेत. मारनुलेनीं श्रीमंत पंतप्रधान व येथील कारपरदाजांस पत्रें सुतरस्वारासमागमें पाठविलीं तें छ १ माहे मारीं पावलीं. हैदराबादेस येऊन हुजूरची मुलाजमत हासल केली व हुजूर जो अर्ज मारूज करणें तो कृष्टणराव बलाळ यांचे सलाहानें करूं, व जो इरशाद होईल त्याची इतिला राव मारास करूं म्हणोन पत्रीं मार लिहिला होता म्हणोन यैकिलें. हैदरअलीखानाचे तरफेनें नूरमाखान व नरसिंगराव ज्वाबसालाकरितां पंतप्रधानासमीप आहेत. खुफिया बातनीकरितां सांप्रत आनंदराव नामे पुण्यांस आला आहे.

कृष्टणराव बलाळ यांची पत्रें डांकेवर पय दर पय येत आहेंत व कारपरदाजाकडूनहीं पत्रें मुतवातर जातात, व बालाजीपंत हरीपंताचे डेऱ्यास जाऊन खिलवत अकसर बहुत करीत आहेत याचा तपसील पूर्वी

लिहिला आहे. सांप्रत छ १ व छ २ व छ ४ मोहरमीं संतत हरीपंताचे डेऱ्यास बालाजीपंत गेले. दोन प्रहर, तीन प्रहरपर्यंत बैठक होत आहे. नूरमाखान व नरसिंगराव वकील यांस छ २ व छ ४ माहे मारीं बोलाऊन नेलें होतें. बालाजीपंत व हरीपंताचे खिलवतेंत विसाजी आपाजी अठवले, पेशदस्त हरीपंत, शरीक मसलहत आसतात. छ १ माहे मारीं गोविदराव कृष्टण शरीक मसहलत होते व छ२व छ४ माहे मारीं गोविदराव कृष्टण यांस खिलवतेंत बोलाविलें नांहीं. हैदर नायकाचे ज्वाबसालाचे बानीकार लक्ष्मणराव रास्ते, तेही मसलतींत शरीक होते.

मुसा नारंज फिरंगी याचे लेंकीची शादी पुण्यांत होत आंहे. बालाजीपंत फडनवीस छ १ माहे मारीं फिरंगी माराचे घरास जाऊन आहेर केला व तेथोन हरीपंताचे डेऱ्यास गेले.

पंतप्रधानांचे पागेवर सरदार व नवी सिंदे कदीम आहेत. त्यांजवर नजर तीन लाख रुपये मोकरर करून हरयेकाचे कामाप्रमाणें पटीची तकसीम केली आहे. पटीचे रुपये जो कबूल करीत नांहीं, त्यास तगीर करून दुसऱ्यापासून नजर घेऊन काम सांगत आहेत. या उपरी जें ताजें वर्तमान होईल त्याची सूचना सेवेसी लिहीन हे विनती.

पै।। छ १३ माहे मोहरं सन ११९६ हिजरी, रोज शेनिवार.

---

**A. R. No. 156**

५ मोहरम ११९६ हिजरी
२१ डिसेंबर १७८१

पै।। छ १३ माहे मोहरं सन ११९६ हिजरी रोज शेनिवार मै दारोगा हरकारा.

श्री

विनंती विज्ञापना यैसी जे येथील कुशल ता। छ ५ माहे मोहरम मुका(म) पुणं, स्वामीचे कृपावलोकनेकरून येथास्थित जाणोन स्वानंद लेखण आज्ञा करीत असिले पाहिजे. विशेष, येथील वर्तमान छ २९ माहे जिल्हेज रोज रविवारी प्राथकाळी विनंतीपत्र सरकारचें डांकेसमागमे सेवेसी रवाणा केले ते पाऊन सविस्तर वर्तमान विदित जाले असेल.

तदनंतर येथील वर्तमान, राजेश्री नाना व कृष्णरावजीचे चिरजींव व विसाजीपंत आठवले यैसे राजश्री हरीपंताचे डेऱ्यास साहा घटका दिवसपूर्व येतां गेले. नाना हरीपंत वगैर याचा संध्याकाळपावेतो खिलवत जाला. खिलवतीचा भाव यैकिल्यात आलां की, हैदर नाईक इग्रंजासी दारमदार करून सलूक करनार हे वर्तमान येथे आहे. त्याजवरून कारभाऱ्याचे मानस की, हैदर नायेकास पत्रें ल्याहावी की, इग्रंजासी दारमदार न करावा. तुमचे साहित्यास फौजेही पाठऊ यैसे बहुत प्रकारे त्यास लिहिणार. यांप्रमाणें खिलवतीत भाशणे जाली. दुसरे, राजश्री कृष्णंरावजीकडील पत्रे आली. ते पत्रें खिलवतीत वांचली. पत्राचा भाव यैकिल्यात आला की, रावजीनी लिहिले होते की प्रस्तुत माहालाचे तहाचां जाबसालं सरदेशमुखी वगैरचां रूबकार आहे नवाबसाहेबाची मर्जी की, हैदराबाद सुभ्याप्रमाणे बेदर सुभ्याची सरदेशमुखी, चौथ वगैर न घ्यावी. बाकी माहालातची चौथ, सरदेशमुखी वगैर जे पहिलेपासून मामूल आहे त्याप्रमाणें घ्यावी, यांप्रमाणे हजूरचे बोलणे आहे. येविशी काये जाबसाल करावा ते ल्याहावे यैसे रावजीनी कारभाऱ्यास लिहिले होते. रावजीचे लिहिल्यावरून येथे येकदोन दिवस कारभाऱ्याचा खिलवत होत होतां की, याचे उतर रावजीस काये ल्याहावे? मग निश्चयात आनून उतर लिहिल्याचे वर्तमान यैकिले की चौथ वगैर मोकासे हे राजपत्री आहेत, हे पहिलेपासून चालतात, नवीन कंसे होते याप्रमाने हजुरात अर्ज करावा. मग यां उपर हजुराची मर्जी प्रस्तुत रक्षूणं कारभार करावां, याप्रमाणे रावजीस लिहिले यैसे यैकिल्यात आले. तिसरे, आणिक कितीक आपले दौलतीचा बंदोबस्त करावा या दोती अन्वयाचा खिलवत संध्याकालपावेतो जाला. उपरांतिक नाना वगैर आपले घरास आले. शृत होये. हैदर नाईक इग्रंजासी दारमदार करनार यैसी वंदता येथे आहे. त्याजवरून कारभारी बहुत आदेशांत आहेत की, कदांचित त्यानी दारमदार केला, तरी पुढे आपनास मसलत भारी प्राप्त होईल. यांअर्थी नाईक मजकुरास लेहून दारमदार न होये ते करांवे यैसी पत्रें लेहून रवाणां करनार. शृत होये. छ १ माहे मजकूर रोज सोमवार. राजश्री गणेशपंत बेहरे दोनअडीच हजार फौजेनसी

कोंडाईबरीचे घाटावर होते. पिंपळनेरकर कमाविसदार हरीपंताकडील व दुर्गोजी भापकर वगैरे हे कोंडाईबारीच्या घाटावाले होते. त्यास पिंपल-नेरकर कमाविसदार दोनतीन हजार मणुश्य व पांचसातसे स्वारा-नसी पुढे पांचसात कोस गेले. त्यास इंग्रजाची येकदोन पलटने व सटोजी भोसले वगैरे दोनतीन हजार फौजेनसी यैसे पलटनासहित सोनगडावर होते. पिपलंनेरकर कमाविसदार पुढे आला म्हणोन हे वर्त-मान, सोनगडास पलटने वगैरे होते त्यास कलले त्याजवरून तेही पुढे आले. कमाविसदार मजकूर यासी व त्या पलटनासी लडाई जाली. कमाविसदाराकडील पांचच्यारसे मणुश्यं जांया जाले व काही लुटले गेले. बाकी सांभालून कमाविसदार मजकूर गणेशपंताजवल आले व येकदोन ठाणेही इंग्रजाचे लोकानी घेतले, यैसे वर्तमान येथे आले. त्याज-वरून गणेशपंताकडे फौज पाठवावी. त्यास गोविंदराव गायेकवाड वगैरे याची खर्चावेचांची वगैरे तजवीज करून रवाणा करावे यैसी यौजणां करितात. मग काये निश्चये करून रवाणा करतील हे लेखण केले जाईल. विदित होये. करनैल गाडर इंग्रज ममईस आहे. पलटने वगैरे कल्यानीस आहेत. प्रस्तुत काही त्याचा उद्योग इकडे दिसत नाही. त्याजवरून कार-भारीही आपल्या जागा स्वस्थ आहेत. उद्योगाचा प्रकार कोठे दिसत नाही. या अर्थी कार्याकारणं फौजेचे लोकास व पागा वगैरे यास निरोप देतात यैसे आहे. प्रस्तुत फौज रास्ते वगैरे मिलोन आठनव हजार आहे. साप्रंत उद्योगाचा प्रकार तो कोठे दिसत नाही. मगं मसलतीचे यौगे-करून काये होईल ते पाहावे. विदित होये. छ २ माहे माार रोज मंगल-वार. राजेश्री मोरो गिरमाजी तेथे आहेत. त्याजलाही पत्रें अंतस्ते कार-भारी लिहितात की, तेथील बातमी रावजी वगैरेची लिहीत जावी यैसे त्यास लिहितांत. शृत होये. हैदर नायेकास याजकडील मदत न पोहचली. सर्व मसलत नाईक मजकुरावर पडली यां अर्थी नाईक मजकूर इंग्रजासी दारमदार करणार यैसी वंदता आहे. त्याजवरून याणी तो नाईक मज-कुरास लिहिली आहेत की, दारमदार न करावा. तुमचे साहित्येस फौजही पाठवून देऊं. परंतु, याजला अदेशां प्राप्त जाला आहे की, कदा-चित हैदर नायेकानी दारमदार केला, तरी पुढे सर्व मसलत आपनासच

रूबकार होईल. यां अर्थी याणी महमदअलीखाणासी सूत्र लाविले आहे कीं, हैदर नायेकानी दारमदार केला तरी आपणही महमदअलीखान याचे विद्येमाने इंग्रजासी सूत्र असू द्यावे यैसीही याणी आपले ठिकाणी यौजणां करून ठेविली आहे यैसे वर्तमान यैकिल्यात आले. शृत होये. मानाजी फांकडे याजला याणी कौल राजश्री धोंडोबा आपा पुरंधरे याचे विद्यमाने पाठविला होता की तुम्ही येणे. तो येनार यैसी वंदता होती. प्रस्तुत वर्तमान आले आहे की फांकडे मजकूर येत नाही. शृत होये. दरबार वगैर जाला होतां. माली व मुलकी वगैर कामकाज जाले शृत होये. छ ३ रोज बुधवार. कोंकण प्रांती तळेघोसाल्याकडे हफशासी व याचे लोकासी लडाई जाली. उभयेपक्षी सेपंनास मणुश्यं जांया जाले यैसे वर्तमान आहे. शृत होये. नाना हरीपंताचे डेऱ्यास गेले होते. हैदर नायेकाकडील वकील नूरखान व नरसिंगराव व आनंदराव आणिक कोन्ही नाईक मजकुराकडील ब्राम्हणं आला आहे, यैसे त्रिवर्ग हरीपंताचे डेऱ्यास गेले होते. वकीलासी व नाना व हरीपंतासी खिलवत जाला. खिलवतीचा भाव यैकिल्यात आला की, नाईक मजकुरास पत्रे लिहिणार. दुसरे, नाईक मजकुराचे मदतेस काही फौजेची नेमनूक करावी यैसी यौजणा करितात. यां अर्थी खिलवत जाला. वंदता आहे की, रास्ते वगैर याचे फौजेची नेमनूक करावी. मग निश्चयात येऊन काये ठैरल ते लेखण केले जाईल. शृत होये. दरबार वगैर जाला होता. विदित होये. छ ४ रोज गुरुवार. हरीपंताकडे नाना येकादो दिवसा जात अस्तात. खिलवत बहुत निकडीचा होत अस्तो. प्रस्तुत यास इग्रंजाची मसलत पुढे रूबकार आहे. शृत होये. होलकर वाफगावास डेरे दाखल आहेत. त्याजकडील दिवाण नारो गणेश वगैर येथे होते तेही होलकराकडे गेले. मग होलकर येथे येतात किवां न येतात हे मागाहून लेखण केले जाईल. शृत होये. पुढे जे प्रसगाचे वर्तमान ध्यानास येईल ते सेवेसी लेखन केले जाईल. बहुत काय लिहिणे, कृपालोभ कीजे हे विज्ञाप्ती.

A.R.No. 157

८ मोहरम ११९६ हिजरी
२४ डिसेंबर १७८१

पौ।। छ १७ मोहरम सन ११९६ हिजरी, बुधवार प्रहर दिवस आल्यावर मये दारोगे हरकारे.

१।३ श्रीनिवास

पोष्य हैबतराव गोपाळ सां। नमस्कार. विनती उपरी यथील वर्तमान ता। छ ८ मोहरम पौष्य शुध नवमीपर्यंत मो। पुणें स्वामीचे कृपेकरून क्षेम जाणून स्वानंद लेखनाज्ञा केली पाहिजे. विशेष, पूर्वी छ ५ मोहरमी हुजूरअर्जी व अखबार व स्वामीचे सेवेसी पत्र डांकेवर पाठविलें तें दारोग्याचे विद्यमानें हुजूर व स्वामीस पाऊन लेखनार्थ श्रुत जाहला असेल. सांप्रत हुजूरअर्जी व अखबार व स्वामीचे सेवेसी पत्र पृथक पाठविलें आहे त्यावरून सविस्तारें वर्तमान विदित होईल. मुंबई-कराकडील पत्रें आलें. त्याचा मा।र सेवकानें यैकिल्याप्रमाणें चिरंजीव राजश्री राय रघोतमराव यांस लिहिला आहे. ते स्वामीचे सेवेसी व स्वामीचे आज्ञेप्रमाणें हुजूर विनती करतील. बहुत काय लिहिणें हे विनंती.

---

पौ।। छ १७ मोहरम सन ११९६ हिजरी, बुधवार.

श्रीनिवास

अखबार पुणें अज इ।। छ ५ मोहरम लगायत छ ८ माहे मा।र सन ११९६ हिजरी, पौष्य शुध ९ इंदुवार.

दुर्गोजी भापकर सोनगडचे जिल्यांत गेले होते. त्यांचे रुखावर इंगरेजांची दोन पलटणें जमीयत व फतेसिंग गाइकवाडाकडील दोन हजार फौज व सटवाजी भोंसले वगैरे बइतिफाक आले. यास्तव भापकर मा।र माघारा कोंडाईबारीस येऊन गणेशपंत बहिरे यांसीं मिळोन राहिले व इंगरेजांचे पलटणानी वासदें वगैरे ठाणीं भापकरांचे तसरुफांत होती तें घेतली व बाळाजीपंत मुतवातर हरीपंताचे डेऱ्यास

जाऊन येकांत करीत आहेत यावितरिक्त अवांतर वर्तमानासहित अखबार पाठविली ते दारोग्याचे त्रिद्यमानें पावली असेल. त्या उपरी प्रत्यक्ष जाहलें व यैकिले वर्तमान दफेवार लिहिलं असे.

हैदरअलीखानाची पत्रें कारपरदाजास व नूरमहमदखान व नरसिंगराव वकीलास मरकूम छ १६ जिल्हेजचीं छ ५ मोहरमीं आलीं. त्यांत माार लिहिला होता कीं, जनराल कूट बेमराजपाळ्याचे झाडीचे आसऱ्यानें राहिला आहे. मुकाबिल लढाईस मैदानांत येत नांहीं. रसद आम्हीं बंद केली आहे. बहुतकरून माघारा चिनापटणास जाईल. व बंगाले प्रांतात फौज पाठवावी म्हणोन पंतप्रधानांचे कारपरदाजांनी तजवीज केली आहे. परंतु,अमलांत येत नांहीं हें ठीक नांहीं. बगाल्यास फौज खामखा पाठऊन द्यावी, याप्रमाणें खान माारानें लिहिलें आहे म्हणोन खारिज यैकिलें.

हैदरअलीखानानें हुजूरअर्जी लिहून येथील कारपरदाजासमीप पाठविली आहे म्हणोन गोविंदराव कृष्टण यांचे जुबानीं यैकिलें.

माहदाजी सिद्याचीं पत्रें झांसीसमीपचीं आली. त्यांत माार लिहिला होता कीं, चेतसिंग जमीदार कासीकर याची भेट जाहली स्वार व प्यादे मिळोन पांच हजार फौजेनसीं जमीदार माार शामिल जाहला आहे. इंगरेजांचे तंबीविषईं अज्म करून कासीपर्यंत जावें म्हणोन चेतसिगाची बहुत अरजू आहे म्हणोन लिहिलें आहे. करनल मेवर पलटणासुधां यमुनापार होऊन कालपीसमीप गेला हेही वर्तमान सिद्यानी लिहिलें आहे म्हणोन येथील कारपरदाजांचे जुबानीं व खारिज यैकिलें.

करनल गाडर कल्याणीहून पुन्हां मुंबईस गेला व तीन पलटणें जमीयत कल्याणी व बदलापुरासमीप आहे म्हणोन खारिज यैकिलें.

सुवर्णदुर्ग व कुलाबा बंदर किनारा दरया येथें पंतप्रधान व राघोजी आंगऱ्याचा आमल आहे. इंगरेजाकडील खारीक खजूराची जाहाजें तीनच्यार पाडाऊ करून आणली व कोहज बंदरास साली पनास खंड्या सापडल्या म्हणोन यैकिलें.

---

श्रीनिवास

३

पुरवणी. मुंबईकराचे पत्राचा माार छ ८ मोहरमी कृष्टणरावजीम कारपरदाजानीं इतिला दिधली असतांहीं रावजीनी अर्ज केला नसल्यास हुजूरीहून राव माारनुलेस सेवकाचे लिहिल्याची इतिला व इरशाद न व्हावा व येके तऱ्हेनें पुरसीस करावी कीं, मुंबईहून जनरालाची कासदजोडी आली व कारपरदाजास पत्रे आलीं म्हणोन खारिज यैकिल्यावरून पूर्वी फल्याने सेवकानें लिहिलें होतें. पुन्हां लिहिलें कीं, मुंबईकरांची जोडी पत्रें घेऊन मदरासेस जात होती ते चौकीवर धरली गेली. ते पुण्यांस आणिली म्हणोन बालाजीपंताचे जुबानीचा इजहार लिहिला होता. परंतु, दुसरे अखबारनविसांचे लिहिल्यावरून जाहीर जाहलें जे मुंबईकर जनरालाचे तरफेची कासदजोडी पत्रें घेऊन आली होती व त्याचा दरजवाब कारपरदाजांनी पाठविला. याप्रमाणें हुजूरीहून इरशाद जाहल्यास रावजीचा खुलासा ध्यानास येईल. सेवकास सुचल्याप्रमाणें स्वामीचे सेवेसी विनंती लिहिली आहे. या उपरी जे सलाहदौलत असेल त्याप्रमाणें हुजूरीहून अमलांत येईल हे विनंती.

---

**A. R. No. 158**

९ मोहरम ११९६ हिजरी
२५ डिसेंबर १७८१

श्री

पै।। छ १७ मोहरम सन ११९६ हिजरी, बुधवार प्रहर दिवस जाल्यास मये दारोगे हरकारे.

विनंती विज्ञापना यैसी जे येथील कुशल ताा छ ९ माहे मोहरम मुकाम काा पुण स्वामीचे कृपावलोकणे येथास्थित जाणोन स्वानंद लेखण आज्ञा करीत असिले पाहिजे. विशेषे, येथील वर्तमान छ ५ माहे मजकूर रोज शुक्रवारी प्राथःकाळी विनंतीपत्र सेवेसी सरकारचें डांकेसमागमे रवाणां केले ते पाऊन सविस्तर वर्तमान विदित जाले

असेल. तदनंतर येथील वर्तमान रास्ते याची दोनअडीच हजार फौज येथे आहे. आणिकही किरकोल सरंजामी वगैर याची तीनच्यार हजार फौज आहे. किरकोल पतके सरंजामी आहेत. त्यास व पागा वगैर लोकास निरोप देतात. कारणं की, प्रस्तुत स्वारीचा उद्योग कोठे नाही. यां अर्थी कोणी कोन्ही फौजेचे लोकास निरोप देतात व दोनतीन पागेदारासही निरोप दिल्हा. त्या पागा चराईस पाठविल्या. शृत होये. राजश्री हरीपंत पुण्यांबाहेर डेऱ्यास आहेत. राजश्री नानां फडनीस येकादो दिवसां हरीपंताचे डेऱ्यास जात अस्तात. खिलवत वगैर होऊन उपरांतिक मग आपल्या घरास येतात. येंदा स्वारीचा उद्योग कोठे न होतां स्वस्त आहेत. कारणं की, येंदा कोंकणप्रांतीं इंग्रज गडबड करीत नाहीत. यां अर्थी हेही आपले जागां स्वस्थ आहेत. करनैल गाडर ममईस आहे. पांचच्यार पलटणे वगैर कल्यानीस आहेत. तेही येंदा इकडे उद्योग करीत नाहीत यैसे वर्तमान आहे. इंग्रजाचा उद्योग नाही म्हणोन हेंही आपले जागा स्वस्थ आहेत. फौज वगैर मातबर जमा न करीतां लोकास निरोप वगैर देतात. शृत होये. दरबार वगैर जाला होतां. विदित होये. छ ६ माहे माार रोज शणवार. राजश्री गोविंदराव गायेकवाड हजारबारासे स्वारानसी मात्र आहेत. नेमल्याप्राणे फौज त्याजपासी अद्याप जमा नाही. कारण की, लोकाचे खर्चाची सोये नाही. सरकारातून काही पैका द्यावा, त्याचीही अद्याप काही सोये नाही. गणपतराव कोल्हाटकर त्यास दिवाणं करून दिल्हे आहेत. त्याणी चालीसपंनास हजार रुपये कर्ज काढून लोकास रोजमुरे वगैर दिल्हे. त्यास गायेकवाड मजकूर यांचे सरदारी सामानपक्षी दाहा लक्ष रुपये पाहिजेत तेंव्हा फौजेची संचणी होणार. यैसे अस्तां चालीसपनास हजाराने काये होते? प्रस्तुत गायेकवाड मजकूर हजारबारासे लोकानी आहेत. पुढे त्याची खर्च वगैरची सोये करून त्यास गुजरात प्रांती पाठवावे यैसी यौजणां आहे. मग काये निश्चये होऊन कोन्हीकडे रवाणां करतील ते लेखण केले जाईल. शृत होये. व सिद्यासी व इंग्रजासी प्रस्तुत दारमदार जाला यैसे वर्तमान आहे. हे पूर्वी लेखण केले आहे त्याजवरून शृत जालेच असेल. पहिले कासीचे राज्यासी व इंग्रजासी लडाई होऊन इंग्रज सिकस्त केले होते. मागती इंग्रजानी

जमाव करून कासीचे राज्यास सिकस्त करून, कासीचे ठाणे इंग्रजानी घेतले. कासीचा राजा पलून सिंद्याजवल आला हे वर्तमान पूर्वी विनंती-पत्री लेखण केले होते त्याजवरून शृत जाले असेल. प्रस्तुत वर्तमान आहे की, कासीचा राजा सिंद्याजवल आहे. त्याणी सिंद्यास वीस लक्ष रुपये कबूल केले आहेत की तुम्ही आमचे प्रांतात पाठऊन इंग्रजाचे पारपत्य करावे व कासीचे ठाणे आमचे घेऊन द्यावे. याप्राणे कार्ये केल्यास वीस लक्ष रुपये आम्ही तुम्हास देऊ, यैसा पैगाम कासीच्या राज्यानी सिंद्यास केला आहे यैसे वर्तमान आहे. तिकडील आणिक राजेरजवाडे वगैर याचाही पैगाम सिंद्यासी आहे कीं, तुम्हीं जमुणां उतरून पार आल्यास इकडे इंग्रजाचे पारपत्य केल्यास आम्हाकडूनही पांच रुपयाची प्राप्त आपणास होईल, यैसी सूत्रे तिकडील राजेरजवाडे वगैर याची सिंद्यासी आहेत, यैसे वर्तमान आहे. मागती सिंद्याकडील जे वर्तमान येईल ते सेवेसी लेखण केले जाईल. शृत होये. छ ७ रोज रविवार. राजेश्री नाना हरीपंताचे डेऱ्यास गेले होते व कृष्णंरावजीचे चिरंजीव गोविंदराव हेही हरीपंताचे डेऱ्यास गेले होते. नाना व हरीपंत व गोविंदराव कृष्टं या त्रिवर्गाचा खिलवत जाला. खिलवतीचा भाव यैकिल्यात आला की, कृष्टणरावजीकडील पत्रे आली ते खिलवतीत वाचिली. पत्राचे जाबं रावजीस लिहिणार व येजमानसाहेबास अर्जियां वगैर लिहिनार. राव-जीचे पत्राचा भाव काही कलला नाही. कलल्यास लेखण केले जाईल. पत्रे वग़ैर दाखवून रावजीचे चिरंजीव घरास आले. उपरांतिक आणिक नाना व हरीपंताचा खिलवत प्रहर रात्रपर्यंत जाला. उपरातिक नाना आपले घरास आले. खिलवतीचा भाव यैकिल्यात आला कीं, पुढे इंग्र-जाचे मसलतीविशी जाला· दुसरे, येजमानसाहेबास पत्रे व अर्जियां ल्याहाव्यां याअन्वये जाला· आणिक कितीक आपले दौलतीचे बंदो-बस्ताविशीं खिलवत जाला· नाना येकादो दिवसाआड हरीपंताकडे जात अस्तात· खिलवत वगैर करून आपले घरास येतात· शृत होये· हैदर नायेकाकडून आणिक तिसरे ग्रहस्त आनंदराव म्हणोन येथे आले आहेत हे पूर्वी लेखण केले आहे त्याजवरून शृत जाले असेल· नूरखान व नरसिंगराव येथे आहेतच· आणिक आनंदराव म्हणून आलेत· कारणं

की, अखबार वगैर ल्याहावी. दुसरे, याजकडून काही फौजा वगैरचे साहित्य व्हावे यैसा संदंब घेऊन आले आहेत. नाईक मजकुरासी व इग्रंजासी दारमदार होणार यैसीही बंदता होती. प्रस्तुत वर्तमान आहे की, नाईक मजकुरासी व इग्रंजासी लढाई होणार. मागती जे नाईक मजकुराकडून वर्तमान येईल ते लेखण केले जाईल. शृत होये. छ ८ रोज सोमवार. होलकर वाफगावास डेरे दाखल आहेत. त्याचे चिरजीवाचे लग्न माघ मासी होनार. लग्न वाफगावीच होनार यैसे वर्तमान आहे. शृत होये. राजश्री गनेशपंत बेहेरे कोडाईबरीवर दोनतीन हजार फौजेनसी आहेत. कोडाईबरीखाले भापकर वगैर आहेत, त्यासी व सटोजी भोसले वगैर यासी लडाई जाली यैसे वर्तमान होते हे पूर्वी लेखन केले होते त्याजवरून शृत जाले असेल. त्यास भापकर वगैर याचे लोकासी व सटोजी भोसले वगैर यासी काहीयेक लडाई होऊन उभयेपक्षी से दोनसे मणुशे जाया जाली यैसी वदंता आहे. मागती तिकडील वर्तमान आलिया लेखन केले जाईल. सटोजी भोसले वगैर तीनच्यार हजार फौजेनसी सोनगडास आहेत. श्रीमत राजश्री दादासाहेब सुरतेबाहेर बागात अस्वीनिकुमारावर आहेत यैसे वर्तमान आहे. शृत होये. प्रस्तुत रास्ते वगैरची फौज येथेच आहे. पानसे वगैर हजार दोन हजार फौजेनसी येथून पाचच्यार कोसावर आहेत. गायेकवाड येथेच आहेत. हरीपंत व रास्ते व गायेकवाड व पानसे वगैर मळून सातआठ हजार फौज येथें जमा आहे. शृत होये. श्रीमत परवतीस दर्शनास गेले होते. दर्शन करून सध्याकाली घरास आले. शृत होये. बहुत काय लिहिणे, कृपालोभ कीजे हे विज्ञाप्ती.

---

**A. R. No. 159**

९ मोहरम ११९६ हिजरी
२५ डिसेंबर १७८१

श्रीनिवास

पुरवणीपत्र श्रीमंत राजश्री नाना स्वामीचे सेवेसी विनती जे. मुंबईहून कासदजोडीसमागमें बाळाजीपंतास पत्र आलें तें माारनुलेनी

घेऊन, कासदा तकयुदींत ठेविलें व वर्तमान बहुत गौप्य ठेविलें आहे म्हणोन पूर्वील पत्री मार लिहिला. त्यानंतर राजश्री बालाजीपंतास समक्ष सेवकानें विचारिलें कीं, मुंबईहून जनराल किंवा गाडराचे तरफेनें पत्र आलें आहे म्हणोन यैकतों हें सत्य किंवा अन्यथा सांगणें. बालाजीपंतानी मंत्रभेद न करीतां गोष्ट उडऊन सांगितली कीं, मुंबईकराची जोडी इंगरेजांची पत्रें घेऊन मदरासेस जात होती ते कमाविसदारानी चौकीवर धरून पाठविली आहे. पत्रें इंगरेजी आहेत. अद्यापि वाचलीं नांहींत. याप्रमाणें गोष्ट बनाऊन सांगितली म्हणोन छ ४ माहे मोहरमचे पत्रीं सेवेसी विनती लिहिली व चिरजीव राजश्री राय रघोतमराव यांस सूचना लिहिली होती. त्यानी स्वामीचे सेवेसी व हुजूर विनती केली असेल. त्या उपरी स्नेहित मंडलींत शोध घेतां वर्तमान तहकीक व तपसीलवार कळलें की, जनराल मुंबईकरानें श्रीमंत पंतप्रधानाचे नांवचें पत्र हिंदवी लिपीचें पाठविलें. त्यांत मार लिहिला होता कीं, बहुत दिवस तुम्हांकडून पत्र येत नांही, तरी सदैव पत्रद्वारा परामृष करीत जावा. दरीविला मेस्तर हिस्तैन इमादुदौला बहादर यांनी बमोजिब हुकम कुपनीचे अम्हास व करनल गाडर यांस लिहिलं आहे कीं, पंतप्रधानांचे खानदानासीं व इंगरेजासीं बहुता दिवसापासून कदीम स्नेह आहे. रघुनाथराव यांसीं व कारपरदाजासीं पेंच पडला. सबब राव मार इंगरेजांचे आश्रयास आले. त्यानंतर करनल इपटैन कलकत्याहून मुख्तार होऊन पुण्यास आले. त्यांचे विद्यमानें परस्परें दारमदार होऊन तहनामा जाहला कीं, पंतप्रधानानीं व इंगरेजानीं पूर्वीलप्रमाणें बइतिफाक यैक्यतेनें चालावें. त्या उपरी कांहींयेक सबबकरितां पुन्हां परस्परें अजुर्दगी जाहली. यास्तव इमादुदौला मेस्तर हिस्तैन यानीं अम्हांस लिहिलं आहे कीं, पंतप्रधानासीं दारमदार व श्नेह करणें याकरितां वकीलास पाठवावयाची तजवीज केली आहे. तरी आपले खास मोहरेनसी राहदारीचें दस्तक मुंबईहून वकील पुण्यास यावयाकरितां पाठऊन देणें, म्हणजे वकील मातबरास पाठऊन देऊं. मेस्तर हिस्तैन यानीं श्नेहाचा मार कितेक लिहिला आहे तो वकीलास सांगू. त्याप्रमाणें वकील रूबरू सविस्तारें वर्तमान जाहीर करील म्हणोन जनराल मुंबईराचे पत्रीं मार लिहिला आहे.

श्रीनिवास

२

पुरवणी, मुंबईकराचे पत्राचा माार.

येथील कारपरदाज हरीपंत व बालाजीपंतानीं पांचसाहा दिवस खिलवतेंत विचार करून • हैदरअलीखान यांजकडील वकील नूरमाा खान व नरसिंगराव यांस मुंबईकराकडील पत्र बजिनस दाखऊन त्या पत्राची नकल वकीलांचे मारफातीनें हैदरअलीखानास लिहून पाठविली व वकीलांचे इतल्यानें जरराल मुंबईकराचे पत्राचें उतर लिहिलें कीं, तुम्हीं पत्र पाठविलें तें पाऊन वर्तमान कळलें. मेस्तर् हिस्तैन कलकतेकर यांचे सूचनेप्रमाणें लिहिल कीं, करनल इपटैन यांचे विद्यमानें जो करारमदार होऊन तह जाहला, त्याप्रमाणें परस्परें स्नेह व्हावा, याचा खुलासा समक्ष बोलण्याकरितां मातबर वकीलास पुण्यास पाठऊन देतों. राहदारीचें दस्तक पाठऊन देणें म्हणोन लिहिलें. त्यास करनल इपटैनचे विद्यमानें जो करार जाहला, त्याची अहदसिकनीं व स्नेहांत अंतर तुम्हांकडून जाहलें. सांप्रत हैदर अलीखान बाहदरांचा व आमचा अकृत्रिम स्नेह जाहला आहे. तुम्हा-कडून पैगाम स्नेहाचा आम्हांसीं व हैदरअलीखानासीं असल्यास, उभय-पक्षीचे बोलण्याकरितां वकीलास पाठऊन देणें असलियां लिहून पाठ-वणें. त्याप्रमाणें मुंबईहून पुण्यास वकील येण्याकरितां राहदारीचें दस्तक पाठऊन देऊं. याप्रमाणें पत्योतर लिहून, मुंबईकराची कासदजोडी जे आली होती, त्याजबरोबर रवाना केलें म्हणोन तहकीक यैकिलें. व हैदर अलीखानासहीं पत्र लिहून पाठविलें कीं, जनराल मुंबईकराचें पत्र आलें आहे, त्याची नकल बजिनस पाठविली आहे व येथोन पत्योतर पाठ-विलें ते नूरमााखान व नरसिंगराव यांस इतिला करून पाठविलें आहे. उतर मुंबईकरास पाठविलें त्याचा माार वकील माारनुले लिहतील. या प्राा वर्तमान यैकिलें, तें हुजूर व स्वामीस लिहिलें आहे. बालाजी-पंतास सेवकानें विचारिलें असतां, त्यानीं अन्यथा उडाऊन सांगितलें. याचें कारण सेवकाचे मतें रो। कृष्णराव बलाळ कारपरदाजाचे तरफेनें मुख्तार हुजूर आहेत. राव माारनुलेस येथोन इतिला द्यावी. ते बमोजिब

सलाहवक्त हुजूर अर्ज करतील किंवा ज्वाबसालचा सिलसिला सेवकाकडें नांहीं. त्या अर्थी उमदे मसलहतीचे वर्तमानाची इतिला अखबारनवीसास किमर्थ करावी म्हणोन सांगितलें नसेल. सारांश, सेवकासी परद्यानें छपाऊन गोष्ट सांगितली व श्नेहिताचे द्वारें सेवकास वर्तमान कळलें. बहुत करून येथील कारपरदाजानीं कृष्टणरावजीस मुंबईकराच पत्राचा माार लिहिला असेल व रावजी येके तकरिबीनें हुजूर अर्ज करतील किंवा केला असेल. सेवकानें तहकीक करितां जें वर्तमान कळलें तें सेवेसी लिहिलं आहे.

---

**A. R. No. 160** १२ मोहरम ११९६ हिजरी
२८ डिसेंबर १७८१

पै।। छ १९ माहे मोहरम सन ११९६ हिजरी, शुक्रवार दीड प्रहर दिवस माा दारोगे सरकार.

श्रीनिवास

पोष्य हैबतराव गोपाळ साष्टांग नमस्कार. विनती उपरी येथील वर्तमान ताा छ १२ मोहरम पौष्य शुध त्रयोदसी भृगुवासरपर्यंत वास्तव्य पुणें स्वामीचे कृपेकरून क्षेम असे. विशेष कृपापत्र हुजूरचे इनायतनाम्यासहित व चिरजीव राजश्री राय रघोतमराव यांची पत्रें सह छ ४ मोहरमी डांकेवर पाठविलें तें छ ११ माहे माारी पाऊन वर्तमान श्रवणें संतोष जाहला. पूर्वी छ ९ माहे माारीं हुजूरअर्जी व अखबार व स्वामीचे सेवेसी विनतीपत्र चिरजीवांचे पत्रासहित डांकेवर रवाना केलें, ते दारोग्याचे विद्यमानें हुजूर व स्वामीस पाऊन वर्तमान कळलें असेल. सांप्रत हुजूरअर्जी व अखबार व स्वामीचे सेवेसी पृथक पुरवणी पत्रीं अखबार व खानगी मााराची पत्रें चिरजीवांचे लिफाफ्यांत घालून पाठविलीं. तें व अर्जीहुजूर इनायतनाम्याचा दरजवाब पाठविला तो दारोग्याचे विद्यमानें लिफाफा सेवेसी पावेल, व अर्जी व अखबारेचे लिफाफे हुजूर गुजरतील. मुंबईकराचे पत्राचें उतर पुन्हा येथोन गेलें आहे. त्याचा दरजवाब जो येईल त्याचा शोध घेऊन, सेवेसी व हुजूर विनती लिहीन. बहुत काय लिहिणें हे विनती.

पै।। छ १९ मोहरम सन ११९६ हिजरी, शुक्रवार दीड प्रहर दिवस मै जोडी डाक सरकार.

श्रीनिवास

अखबार पुणें अज इा छ ९ मोहरम लगायत छ १२ माहे माार सन ११९६ हिजरी, पौष्य शुत्ध.

हैदरअलीखानाकडून छ १६ जिल्हेजचीं पत्रें आलीं· त्यांतील माार बंगाल्यास फौज रवाना करावी व चेतसिंग जमीदार कासीकर व सिंदे झांसीसमीप येकत्र जाहले व जमीदार माार बहुत मिनत करीत आहे कीं, इंगरेजांचे पारपत्याकरितां कासी प्रांतात मोहीम करणें· आपण तुमचे रफीक आहोंत· माहदाजी सिदे मुख्तार आहेत· बमोजिब सलाह-वक्त वर्तणूक करतील· गोविंदराव गाइकवाडाचे सरदारीचा बखेडा जाहला व कारपरदाजासीं अजुर्दा होऊन आपली फौजेतून अलाहिदा होऊन येक कोस जाऊन उतरला· यावितरिक्त अवांतर वर्तमानासहित छ ८ माहे माारीं डांकेवर पत्रें पाठविलीं तें पाऊन वर्तमान सेवेसी व हुजूर श्रुत जाहलें असेल. त्याउपरी प्रत्यक्ष जाहलें व यैकिलें वर्तमान दफेवार लिहिलं असे.

हैदरअलीखानाकडें पत्रें पाठवावयाकरितां येथील कारपरदा-जानीं लक्ष्मणराव रास्ते व नूरमााखान व नरसिंगराव वकीलाचे स्वा-धीन केली. हें वर्तमान पूर्वील पत्रीं लिहिलें आहे· छ ९ माहे माारीं पत्रें सांडनीस्वाराबराबरी येथोन रवाना जाहलीं· साडनीस्वार बादामीस डांक खान मााराकडील आहे· डांकेवर पत्रें पावती करील· तेथोन पुढें डांकेवर खान मााारनुलेसमीप पत्रें जातील.

करनल गाडराकडील हरकत किमपि नांहीं· जमीयत तीन पलटणें-पर्यंत व तोफा तख्तावर चढऊन कल्याणी व बदलापुरासमीप मुस्तैद आहे.

हैदरअलीखानाकडील वर्तमान ताजें आलें नांहीं.

येथील कारपरदाजानीं जागीरदार सरजामी लोक रास्ते व आकंलकोटवाले भोंसले व प्रतिनिधी वगैरेस बमय हुजरात, बमय फौज

पांच हजारपर्यंत व बालाजीपंत व हरीपंताची जातीची फौज दोन हजारपर्यंत पुण्यासमीप ठेऊन नवनिगाहदास्ती सालाबाद फौज ठेवणें ते लोक उमेदवारीनें आले होते, त्यास रुखसत दिधली व नख्त रुपये मागणार स्वार जे आहेत, त्यांस रुखसत करीत आहेत. गाडदी व आरब वगैरे तीन हजारपर्यंत नख्तीचे बोलीचे आहेत, त्यापैकीं कांही बालाजी-पंत व हरीपंत व तोफखान्याचे निसबतीस आहेत. मुसा नारंज वगैरे हजारबारासे लोकास पंतप्रधानाचे सरकारातून रोजमरा देणे लागतों.

पुण्यासमीप वैरणीची बहुत किलत जाहली व दोनतीन कोसांत पांचसाहा हजार फौज जमा जाहली आहे. समीप राहि.....

२

पुरवणी अखबार छ १२ मोहरम सन ११९६ हिजरी.

ल्यांत कांही प्रयोजन नाहीं. याकरितां च्यारपांच कोसाचे तफा-वतीनें वैरणीची सोय पाहून राहण्याविषई रास्ते वगैरेस कारपरदा-जानीं सांगितलें. त्यावरून छ १२ माहे मारीं गंगाधरराव रास्ते कूच करून मौजे चिखली, पुण्याहून पांच कोसी, तेथें मुकामात करून राहा-वयास गेले. प्रतिनिधी व भोंसले वगैरेही कूच करून वैरणीची सोय पाहून पुण्याहून पांचसाहा कोसाचे फासल्यानें जाऊन राहणार.

गोविंदराव गाइकवाडाचे सरदारीचे उभारणीचा बंदोबस्त होण्याचा मार्ग कांहींच दिसत नाहीं. लोक जमा जाहले होते ते न पुसतां उठोन जात आहेत.

कोंडाईबारीसमीप गणेशपंत पूर्वीपासून आहेत व इंगरेजांची पलटणें दोन व फतेसिंग गाइकवाडाची फौज आली. याकरितां दुर्गोजी भापकर गणेशपंतासमीप आले व वासदें वगैरे ठाणीं इंगरेजांकडील पलटणानीं घेतलीं म्हणोन पूर्वील पत्रीं मार लिहिला आहे, येथील कार-परदाजानीं सुरतबाविसी व गुजरात व कोंकणांत मुंबईपासून बोरघांट-पर्यंत आशा सोडली. कोंडाईबारीहून पुढें खानदेशांत व बोरघांटापुढें पुण्याचे रुख इंगरेजानी अज्म केला तरी त्यांचे तंबीस फौज पाठवावी

हें तात्पर्य कारपरदाजाचें दिसतें. येथील दरबारी लोकांचे मुखें चर्चा यैकण्यांत आली आहे कीं, अंकलकोटवाले भोंसले व प्रतिनिधीकडील दोन हजारपर्यंत स्वार गणेशपंत व भापकराचे मदतीस व गुजरात व सुरत प्रांताचे ताख्तताराजाकरितां पाठवणार आहेत.

माहदाजी सिंदे दतियाचे राज्यापासून कांही खडणी घ्यावी म्हणोन दतियास गेले म्हणोन खारिज यैकिलें.

बज्याबा पुरंदरे यांस कैदेंत सोडवावयाचा ज्वाबसाल धोंडो आपा पुरंधरे यांचे विद्यमानें दरपेश आहे म्हणोन पूर्वी लिहिलें होतें. सांप्रत खारिज यैकिलें कीं, अडीच लाख रुपये खड जाहला व बज्याबा पुरंदरे यांस कैदेतून खलास करावें, येणेप्रमाणें करार ठरला आहे म्हणोन खारिज यैकिलें. कारपरदाजांसमीप तहकीक करून माघाहून लिहून पाठवीन.

याउपरी जें ताजे वर्तमान होईल तें सेवसी लिहीन हे विनती.

पै।। छ १९ माहे मोहरम सन ११९६ हिजरी.

---

A. R. No. 161 — १३ मोहरम ११९६ हिजरी
२९ डिसेंबर १७८१

पै।। छ १९ मोहरम सन ११९६ हिजरी, शुक्रवार दीढ प्रहर दिवस मै डांक सरकार.

श्री

विनंती विज्ञापना यैसी जे येथील कुशल ताा छ १३ माहे मोहरम मुाा काा पुणं स्वामीचे कृपावलोकनेकरून स्वानंद लेखनआज्ञा करीत आसिले पाहिजे. विशेषे, छ ९ माहे मजकूर रोज मंगलवारी प्राःथकाळी विनंतीपत्र सरकारचे डांकेसमागमे सेवेसी रवाणा केले ते पाऊन सविस्तर वर्तमान विदित जाले आसेल. तदनंतर येथील वर्तमान राजश्री कृष्णरावजीकडील पत्रे आली होती. पत्रें कारभाऱ्यानी वाचिली. पत्राचा

भाव यैकिल्यात आला कीं, प्रस्तुत माहलातचे तहाचां जाबसाल रूब-
कार आहे याप्राने पत्राचा अन्वये यैकिल्यात आला. पत्राचे जवाब
रावजीस लिहिनार. शृत होये. कनैर गाडर ममईस आहे. वंदता आहे की,
गाडर मजकूर कल्यानीस आला आहे यैसे वर्तमान आहे, मागती गाडर
मजकूर याचे वर्तमान यैकिल्यास लेखण केले जाईल. प्रस्तुत गाडर मज-
कूर उद्योग करून इकडे येतो यैसे वर्तमान नाही यैसी वंदता येथे आहे.
त्याजवरून कारभारी वगैर आपले जागा स्वस्तं आहेत. पुढे मसलतीचे
विचारे काये जे वर्तमान होईल ते लेखण केले जाईल. शृत होये. छ १०
माहे मजकूर रोज बुधवार. डोल्याचा समारंभ होतां म्हणोन श्रीमंत व
कारभारी वगैर श्रीमंताच्या वाड्यात बंगल्यावर तमाशा पाहात बसले
होते. शृत होये. हैदर नायेकास पत्रे लिहिली. पत्राचा भाव यैकिल्यात
आला की, नाईक मजकुरास लिहिले की, इग्रंजासी दारमदार न करावा.
कदांचित प्रसंगोपात दारमदार करणे प्राप्त जाला तरी आम्हास लेहून
पाठवणे. ज्याप्राणे आम्ही मुदे लेहून पाठऊ, त्याप्राणे करारात
आणावे. यांआन्वये नाईक मजकुरास पत्रे लिहिली म्हणून यैकिल्यात
आले. मागती याचा शोध करून लेखण केले जाईल. शृत होये. सोनगडास
दोनतीन पलटने व फतेसिंग गायेकवाडाचे हजार दोन हजार स्वांर व
सटोजी भोसले वगैर दोतीन हजार स्वारानसी यैसे सोनगडास आहेत.
प्रस्तुत वर्तमान आहे कीं, सोनगडाहून दोनतीन पलटने व फतेसिंग
वगैर याचे स्वार यैसे साहा कोस पुढे आले. कोंडाईबारीवर राजश्री
गणेशपंत बेहरे वगैर दोनतीन हजार फौजेनसी आहेत. घाटाखाले
भापकर वगैर आहेत त्यासी व ते पलटने वगैर पुढे आले आहेत त्यासी
लडाई होणार यैसी वंदता आहे. राजश्री गणेशपंतानी यास लिहिले
आहे की, काही फौज वगैर पाठवावी. त्याजवरून गणेशपंताकडे काही
फौज पाठवावी यैसी यौजणां करितात. काही रास्तीयाची फौज व गोविं-
दराव गायेकवाड वगैर याचीही रवाणगी गणेशपंताकडे करावी यैसीही
यौजणां करितात. शृत होये. छ ११ माहे मजकूर रोज गुरुवार ममई-
वाल्या इग्रंजाकडील काही सूत्राची पत्रे आली आहेत यैसे वर्तमान आहे.
प्रगट तो वर्तमान नाही. परंतु आतंस्थे वर्तमान आहे की, ममईवाल्या-

कडून काही दारमदाराचे सूत्र आले आहे यैसी वंदता. त्यास याचा शोध करून मागती लेखण केले जाईल. शृत होये. दरबार वगैर जाला होतां. माली व मुलकी वगैर कामकाज ज्यारी आहे. विदित होये. छ १२ माहे मजकूर रोज शुक्रवार. नाना हरीपंताचे डेऱ्यास गेले होते. उभयेताचा खिलवत जाला. उंपरातिक नाना आपले घरास आले. खिलवतीचा भाव यैकिल्यात आला की, गणेशपंत वगैर याजकडे काही फौज पाठवावी. दुसरे, कृष्टणरावजीकडे पत्रे लिहिणार व येजमानसाहेबास अर्जिया वगैर लिहिनार, याआन्वये खिलवतीचा भाव यैकिल्यात आला. शृत होये. रास्तीयाची फौज दोनअडीच हजार पुण्यास संगमावर होती, ते ती चौव कोसाचे कूच करून तलेगावाचे सुमारे गेली. वंदता आहे की कोडांईबारीकडे सटोजी भोसले वगैर यानी उपद्रव मांडला आह म्हणोन गणेशपंताचे साहित्यास जाणार. दुसरी वंदता आहे की, तळे गावाकडे डोगर वगैर आहेत. तिकडे चराईस जानार व कोंकणप्रांतीही उगाच शह पडावा या अर्थी रास्तीयाचे फौजेचे कूच दो ती कोसाचे जाले यैसी वंदता. त्यास रास्तीयाची फौज ती चौव कोसाचे कूच करून गेली. मगं गणेशपंताकडे फौज जांती किवां तलेगावाकडे जांती, हे मागाहून लेखण केले जाईल. शृत होये. पुढे जे प्रसगाचे वर्तमान ध्या नास येईल ते सेवेसी लेखन केले जाईल. शृत होये. छ ४ माहे मारचे आज्ञापत्र सरकारचे डाकेसमागमे सादर केले, ते छ ११ माहे मारी पावले. पावोन बहुत संतोश जाला. सदैव याचप्रकारे आज्ञापत्रे सादर होत असावी. बहुत काये लिहिणे, कृपालोभ कीजे हे विज्ञाप्ती.

---

A. R. No. 162 श्रीनिवास सुमारें इ. स. १७८१

पुरवणी श्रीमंत राजश्री नाना स्वामीचे सेवेसी. विनती उपरी. मजला स्वामीचे कृपेचे योगेंकरून यजमानसाहबांचे जनाबेंत राहून सतराअठरा वर्षे जाहलीं नौकरींत अंतर करोन घरास जावयाचा उद्योग सर्वथैव केलाच नांहीं. हुजूर येण्याचें प्रयोजन तीनच्यारदां

जाहलें. तें समई खेड व मदनूरचे मार्गें जाणें व येणें जाहलें. वैकुंठवासी माधवराव बलाळ पेशवे यांचा काळ होऊन नव वर्षें जाहलीं. पंतप्रधानाचे सेवें येजमानसाहबांचे आज्ञेप्रमाणें येकरूप राहणें प्राप्त व राहिलों. तीर्थरूप व सौावती मातोश्रीस इतर मंडलीसहित पुण्यांस आणिलें ते समई दर्शन व भेट जाहली. लग्नादि कर्तव्यता सर्वत्रांची तीर्थरूप जी व सौावती मातोश्रीनीं केली. प्रपंच्यांत येकवार तरीं आपलेसमीप लग्नोत्सव व्हावा म्हणोन गतवर्षी नातीचें लग्न पुण्यांत करावयाचाच उद्योग केला. खर्च किती पडेल व कर्ज भरी होणें लागेल, याचा अंदेशा न करितां उद्योग केला होता. रो गोविंदराव भगवंत यांचा पुत्र वर आहे. सेवकाकडील शरीरसंमध व्हावा येविषईं गोविंदरावजीचाच उद्योग होता व परस्परें पदरापदरी चांभोरगोंदकराकडून शरीरसंमधी आहेत, यास्तव संमध मान्य केला. परंतु, फख्त करणी तीनसहजार रुपये व यावितरिक्त हुंडी किवा वाट खर्च द्यावा. म्हणजे च्यार हजार रुपयेपर्यंत वर संमधी खर्च. यावितरिक्त लग्नसंमधी च्यार हजार, आठ हजार रुपयाचा भरणा पाहिला. हजार दीड हजारपर्यंत करणी गोविंदराव यांचे चित्तास न आली, व कर्तव्यता नांहीं म्हणोन स्पष्ट उतर केलें. त्या उपरी भगवंतराव चिंचोरे, प्राचीन संमधी, याकरितां त्यांचे नाताची योजना केली. तेथें कांहीं प्रतिकूळता होती किवा होणार म्हणोन चांभारगोदकर, सेवकाचे मातुळानी सागून पाठविलें याकरितां तेथील योजना राहिली. त्या उपरी ध्यानास आणितां, पुण्यांतील कर्तव्यता आम्हासमान गरीबाचे उपयोगी नांहीं. यजमानसाहबांचे सेवक, याकरितां नांव थोर व धनाची अनकूळता नांहीं म्हणोन पुण्यांत लग्न करणें अयोग्य जाणून, विचार मवकूफ केला. सांप्रत खेड, पाथरी व सेलू येथें वरविचारणा करविली आहे. तीर्थरूप व सौावती मातोश्रीची प्रकृती बहुत अशक्त व या वर्षीं दोन प्रतिकूळतेचीं कर्मं जाहली. चिरजीव सदासिवराव व चिरजीव नारायणराव यांचें लग्न करणें प्राप्त. तें चिरजीव कृष्टणराव घरी आहेत, ते तीर्थरूपजीचे सान्निध्य उरकतील. चिरंजीवांचे कन्येस चिरजीव_दादानीं समीप असांवें हा मुख्य पक्ष. चिरजीवांचेसमीप तेंवितरिक्त लग्नसिधी होत नांहीं. चिरजीव पुण्यांत असल्यानंतर, सांप्रत

स्वामीचे कृपेकरितां, माझी अवश्यकता येथें राहावयाची नांहीं. परंतु, मजपेक्ष्यां चिरंजीवानींच लग्नोत्सवास असांवें, हा सर्वत्र कुटुंबस्थ मंडलीचा व माझा मनोदय आहे. त्यास......

२

श्री

पुरवणी श्रीमंत राजश्री नाना स्वामीचे सेवेसी.

सांप्रत योजना जे जाहली, ते बहुत योग्य भासली म्हणोन विनती लिहितो. जे. चिरंजीव राय रघोतमराव यांचे स्थली ममता व कृपा स्वामीची, मजपेक्षा अधिक. मरातबानें प्रतिष्ठेनें राजश्री राय रेणुराव उमदे. परंतु, ममतेचे कृपेचे मार्गानें राजश्री रायजीसमान चिरंजीवाचे स्थली स्वामीची ममता व गणना चिरंजीव मंडलींत आहे. त्यापक्षीं कोण्ही औरंगाबाद प्रांतीचे ग्रहस्त कुळशीळ व वर योग्य. स्वामीचे मर्जीस आलियां मजला आज्ञा करावी. म्हणजे चिरंजीवाचे स्त्रीस व चिरंजीव मुलीसहित चिरंजीवासमीप शहरास पाठऊन देतो. माझे स्थली स्वामी आहेत व चिरंजीव सेवेसी आहेत. लग्नकर्तव्यता शहरीच केलिया, पुण्यांत केल्यापेक्ष्या विशेष आहे व याचा संतोष सेवकास बहुत. लग्नाकरितां कुटुंबस्थ मंडली व साहित्य शहरास येईल हा मुख्य पक्ष किंवा वरयोजना होऊन खेडीहून तीर्थरूपजी चिरंजीवास पत्र पाठवितील, त्याप्रमाणें चिरंजीव सेवेसी विनती करतील. यजमानसाहबास विनती करून वीस दिवसाची रुखसत द्यावी. लग्नसित्धी संपादून पुन्हा हुजूर (व) स्वामीचे सेवेसी येतील. या उपरी ज्यांत सेवेकाची स्वस्थता व चिरंजीवाची सरफराजी व उपयोगी सलाह स्वामी आज्ञा करतील, तेंच मान्य. प्रपंच्याची स्वस्थता असल्यापक्षीं परमार्थविषई कांहीं प्रवृत्ती होत आहे. त्या प्रपंचाची स्वस्थता स्वामीचे कृपेकरितां यांत परमार्थही आला. तस्मात स्वामीचे कृपेकरितां प्रपंच व परमार्थ दोन्ही साधना घडत आहे. ग्रहकृत्याची सलाह सांगण्यांविषई स्वामीस अधिकार आहे. व पूर्वीपासून माझा सांप्रदाय घरचें वर्तमान सेवेसी विनती करावी व आपण सलाह व

आज्ञा करतील तेच उपयोगी· दरबारी राजकारणी व ग्रहकृत्य सर्व वर्त-
मानाची दखलगिरी चिरंजीवास आहे व स्वामीचे कृपेकरितां चिरं-
जीव योग्य आहेत व होतील व सर्व वर्तमान सेवेसी विनती करतील.
चिरंजीवास येथोन जाऊन आठ महिने जाहले· या उपरी मजकडील
अर्ज्या हुजूर व स्वामीचे सेवेसी विनतीपत्र देऊन जे विनती केली असेल,
ते स्वामीचे कृपेकरून हुजूरपिजीरा होऊन, सेवकाची व चिरंजीवाची
सरफराजी आपले कृपेकरून होईल· चिरंजीव सत्वर रुखसत होऊन
येथें आले म्हणजे सेवकास बहुत विश्रांत, याचा विस्तार मीं काय ल्या-
हावा? स्वामी कृपावंत, त्या अर्थी मनोदयानुरूप कार्यसिधी जाहली हा
निश्चय प्रथमतांच केला आहे हे विनती.

# पुणें अखबारांतील कठिण शब्दांचे अर्थ

(अ.)—अरबी ; (फा.)—फारसी ; (सं.)—संस्कृत ; (म.)—मराठी ;
(तु.)—तुर्की; (हिं.)—हिंदुस्थानी ; (रा.व्य.को.)—राज्यव्यवहारकोश.

## अ

**अकरब** (अ.), नातलग, जवळचे.
**अकसर** (अ.), बहुशः, सर्वसाधारणपणें.
**अज** (फा.), पासून, मुळें.
**अजराह** (फा.), मार्गापासून, द्वारें.
**अजीज** (**अजिज होणे**) (अ.), हताश होणें, शरण येणें, दीन होणें, प्रियव्यक्ति.
'अजीजस्तु भवेदिष्टम् ।'
(रा. व्य. को.)
**अज्म** (अ.) निश्चय, बेत.
**अंदेशा** (फा.), संशय, विचार.
**अफवा** (अ.), कण्डी, भुमका.
**अमलदखल** (अ.), प्रदेशाचा ताबा.
**अमला** (अ.), कारकूनवर्ग.
**अर्जमारूज** (अ.), विनंती, प्रार्थना.
**अरस्तु** (फा.), ॲरिस्टॉटल.
**अरस्तु फितरत** (फा.), ॲरिस्टॉटलच्या स्वभावाचा.
**अलाहिदा** (अ.), पृथक्, विभक्त, निराळें.
**अहदपैमान** (अ. फा.), वचनप्रमाण.
**अहदशिकनी** (अ. फा.), वचनभंग.

## आ

**आखरश** (फा.), सरतेशेवटीं.
**आखाडी** (म.), आषाढाच्या पावसाच्या अभावीं पडलेला दुष्काळ.
**आजुर्दगी** (फा.), दुःख, असंतोष, कष्टीपणा.
**आजुर्दा** (फा.), असंतुष्ट.
**आजुर्दी** (फा.), कष्टीपणा.
**आब रक्षिला** (फा.), प्रतिष्ठा ठेवली.
**आमदरफ्त** (फा.), दळणवळण, वाहतुक, ये-जा.
**आमिल** (अ.), अधिकार गाजविणारा, सरकारनियुक्त अधिकारी.
**आलमासी** (फा.), पैलू पाडलेला.
**आसबाब** (अ.), सामुग्री, सामान.
**आसरा** (सं.), आश्रयस्थान, आडोसा.

## इ

**इ॥** (अ.), प्रारंभ, सुरुवात.
**इजहार** (अ.), प्रसिद्धीकरण, प्रगट करणें.
**इजाऱ्यांत** (अ.), खण्डाच्या पद्धतींत, मक्तेगिरींत.
**इंतजारी** (अ.), अपेक्षा, वाट पाहणें.
**इतिफाक** (अ.), सहविचार, योग घडणें.
**इतिला** (अ.), वार्ता, खबर, लक्ष्य, लोभ.
**इनायतनामा** (अ.), कृपापत्र.
**इमदाद** (अ.), साहाय्य, मदत.
**इरशाद** (अ.), उपदेश, आज्ञा, इच्छा.
**इरादा** (अ.), उद्देश, हेतू, बेत.
**इस्तकबाल** (अ.), सामोरें, स्वागत.
**इस्तकलाल** (अ.), जोर, धर, निश्चिती.

**इस्तसवाब** (अ.), पसंती, सल्ला.

**इस्तहार** (अ.), प्रसिद्धी, जाहिरात.

उ

**उज्म** (अ.), थोरवी.

**उजरख्वाही** (अ. फा.), विरोध करण्याची इच्छा करणारा.

**उदुलहुकुम** (अ.), आज्ञाभंग.

**उद्वोग** (सं.), उद्योग, काम.

**उमदा** (अ.), पराक्रमी, गुणी, उत्कृष्ट, मोठ्या मनाचा.

**उमेदवारी** (फा.), आशाळपणा, आशावाद.

**उरूज** (अ.), उत्कर्ष, उन्नति, बढती, महत्व.

**उस्तवारी** (फा.), व्यवस्था, शुश्रूषा, मजबूती, पुनर्घटना, मशागत, चौकशी.

क

**कदीम** (अ.), पुरातन, जुना, 'पुरातनं कदीमंस्यात्.'

**कमबेश** (फा.), कमीअधिक, अदमासें.

**कमरबस्ता** (फा.), बद्धकटी, सिद्ध.

**कमालआरजू** (फा.) विनंतीची पराकाष्ठा करणें, पराकाष्टेची इच्छा करणें.

**कमाविसदार** (फा.) वसूली कामावरील मुख्य अधिकारी.

**कयफियत** (अ.), वर्णन, व्यवहार, लेखी हुकुम.

**कयास** (अ.), तर्क, अनुमान, मत, विचार.

**कर्जहसना** (फा.) लोभापोटीं दिलेले ऋण, हातउसने.

**करारमदार** (अ.), वचन, बोली, कागद लिहून देणें.

**करारवाकई** (फा.), घडल्याप्रमाणें, बरोबर अचूकपणें.

**कलमी** (फा.), लेखी, लिखित.

**कलागत** (सं.), सपाटयाचे भांडण, लावालावी, रागाची शिवीगाळ.

**कसब** (अ.), कौशल्य, कला, धंदा.

**कसरकम** (फा.) थोडेसे कमी.

**कहीकबाड** (फा.), चारा, गवत व लाकूडफांटा.

**काबू** (फा.), संधी, कबजा, कक्षा, आटोका.

**काबूची** (फा.), लुच्चा, कपटी.

**कायमी** (फा.), निश्चिती, स्थैर्य, मजबुती.

**कारचोबी** (फा.), जरीचे वेलबुट्टीदार.

**कारपरदाज** (फा.), कार्यकर्ता, मुत्सद्दी.

**काररवाई** (फा.), प्रकरण.

**कासद** (अ.), वार्तावाहक.

**काहली** (अ.), आजारपण, आळशीपणा.

**किलत** (अ.), उणीव, कमीपणा.

**कुमकी** (तु.), सहाय्यकारी.

**कुलाहपोष** (फा.), टोपीवाला, इंग्रज.

**कोहिस्तान** (फा.), जंगल, जंगलें किंवा डोंगराळ प्रदेश.

**कौलकरार** (अ.), ठराव.

ख

**खरीता** (अ.), पत्र, टपाल, पिशवी.

**खरीदफरोख्त** (फा.), विकत घेणें व विकणें.

**खवासी** (अ.), अंबारींत खाशाच्या मागें बसण्याची मानाची जागा.

**खातरख्वा** (फा.), इच्छेप्रमाणें, यथास्थित, यशस्वी, समाधान.

**खातरदारी** (फा.), समाधान.

**खाननसीन** (फा.), घरींच बसलेले, निवृत्त.

**खानसुमारी** (फा.), घरगणती, शिरोगणती व वर्गवारी.

**खामखा** (फा.), कांहीं झाले तरी, खचित, जरूर.

**खारिज** (अ.), हद्दपार, बाहेर, कर्णोपकर्णी, ऐकीव.

**खावंद** (फा.), स्वामी.

**खावंदी** (फा.), स्वामित्व, प्रभुत्व.

**खासा** (अ.), चांगला, अभिजात, श्रेष्ठ, राजा, औरस.

**खिजमतगार, खिदमतगार** (फा.), सेवक, परिचारक.

**खिताब** (अ.), पदवी.

**खिदमत** (अ.), सेवा.

**खिलवत** (अ.), एकांतांत केलेले भाषण.

**खिलाफ** (अ.), विरुद्ध.

**खिसारा** (अ.), नुकसान, कारवाई, फसवणूक.

**खुदावंद न्यामत** (फा.), श्रीमंत.

**खुफिया** (अ.), गुप्तपणें, अंतस्थ.

**खुलासा** (अ.), सार, निष्कर्ष, स्पष्टीकरण, सारांश.

**खुशकी** (फा.), जमीन, अवर्षण, दुष्काळ.

**खूल**(म.), बंड, दंगल, भांडण, उपद्रव, अडथळा.

### ग

**गल्ला** (हिं.) धान्य, पीक, उत्पन्न, मजुरांस वांटण्याचा पैका.

**गल्याचा रसद**, धान्यसामुग्री.

**गलत** (अ.), चूक, खोटा, रद्द.

**गाडदी, गारदी**, (पोर्तु. इं.), शिपाई, पायदळांतील शिपाई, पहारेकरी.

**गारत** (अ.), नष्ट, उध्वस्त, ठार, गर्दी.

**गालिब** (अ.), वरचढ.

**गाव मारणें** (म.), लुटणें, खंडणी बसवणें.

**गिर्दनवाह** (अ.फा.), भोंवतालचा प्रदेश.

**गिरानी** (फा.), महागाई, दुष्काळ ; रुष्टता.

**गुजरणार** (फा.), प्रविष्ट करतील.

### घ

**घटवटना**, वाटाघाट, चर्चा, जुळवाजुळव.

**घासदाणा** (म.), सैन्याला गवत दाणा पुरवण्यासाठीं लावलेला कर. नागपूरकर भोसल्याकडे हा वसूल करण्याचें काम असे.

**घासलकडी**, गवत, कडबा, वैरण इ.

### ज

**जजायल** (अ.), एक प्रकारची तोफ.

**जनाब** (अ.), सन्मानार्थी संबोधन.

**जनाब मुकदसेत**, पवित्र स्वारीच्या सेवेंत.

**जमानेसाज** (फा.), प्रसंग पाहून कार्य साधणारा.

**जमीयेत** (अ.), सैन्य, लष्कर.

**जमीर मुबारक** (अ.), शुद्ध विवेकबुद्धी.

**जरब** (अ.), धाक, नग (तोफेचा), तोफ, प्रहार.

**जरीदा** (अ.), (सरकारी) माहितीपत्र, सडा, एकटा, 'एकाकी तु जरीदा स्यात्.'

**जवाबसाल** (अ.), प्रश्नोत्तर, संभाषण, तह.

**जाबजा** (फा.) ठिकठिकाणीं.

**जाहिरा** (अ.), स्पष्टपणें, उघडपणें.

**जिनसी**, कोठार.

**जुज** (अ.), अंश, भाग.

**जुज** (फा.), शिवाय.

**जुबानी** (फा.), तोंडी.

**जुरअत, जुरत** (अ.), धैर्य, शौर्य.

**जेर** (फा.), पाडाव करणें, अपयश आणणें.

**जंगी** (फा.), युद्धविषयक, मोठा, मातबर.

**ज्यहानसी, जहन-नशीन** (फा.), श्रुत, माहित.

**ज्यानबदारी** (फा.), पक्षपात.

### ड

**डेरे दाखल होणें**, तंबूत राहण्यास जाऊन प्रवासास प्रारंभ करणें.

**डोला**, मुसलमानांचा ताबूत.

### त

**तकयुद** (अ.), दक्षता, अवधान देणें.
**तकरीब** (अ.), बहाणा, सबब.
**तकसीम** (अ.), वांटणी, हिस्सा, भाग.
**तखफीफ** (अ.), कमी करणें.
**तगीर, तगीरी,** (अ.), बडतर्फ, बदल.
**तजवीज** (अ.), व्यवस्था, उपाय, सल्ला.
**तफावत** (अ.), अंतर, फरक.
**तंबी वाकई** (अ.फा.), योग्य शिक्षा.
**तमानियेत** (फा.), संशयनिराकरण, आत्मविश्वास. स्वास्थ्य, समाधान.
**तलब तनखा**, पगार अथवा खर्च मागणें, 'आकर्षपत्रं तलबम्' (रा.व्य.को.).
**तलावा** (फा.), टेहेळणी, टेहळणी करीत. 'तलावा स्यात् पर्यटनम्' (रा. व्य. को.).
**तवाजा** (अ.), बक्षीस, इनाम, नेमणूक.
**तशखीस, तसखीस,** (अ.), चिकित्सा.
**तसखीर** (अ.), काबीज.
**तसनस** (अ.), नासाडी, हानी, धुळधाण.
**तसरूफी** (अ.), अम्मल, ताबा, अमलांतील, ताब्यांतील.
**तहरीर** (अ.), कारकुनाच्या खर्चासाठीं देशपांडे इत्यादिकांच्या स्वाधीन केलेली गोषकींतील रक्कम, अथवा हक्क. मराठी राज्यांत फडनीस व मुजुमदार यांना ही देत असत. लिखाण, वर्णन.
**ताकूब** (अ.), पाठलाग.
**ताख्तताराज** (फा.), लूटमार, विध्वंस.
**तुरुक** (फा.), एक प्रकारचा घोडा.
**तूल** (अ.), लांबवणूक.
**तैनाती** (अ.), नेमणूक, सेवानियुक्त.

### द

**दफयुलवख्ती,** अशुभाचें कालहरण.
**दफेवार** (अ.), कलमवार, प्रकरणशः.
**दरखास्ती** (फा.), अर्ज्या, लेखी विनंत्या.
**दरपेश** (फा.), पुढ्यांत, समोर, पुढें.
**दरमियान** (फा.), मध्यें, मध्यस्थ, जबाबदार.
**दरवेश** (फा.), फकीर.
**दरीविला** (फा.), यावेळीं.
**दस्तक** (फा.), दारावर खटखटणें, एखाद्या कामाची टाळी वाजविणें, परवानगी देणारी पत्रिका.
**दस्तगर्दा** (फा.), बद्ध केलेला.
**दस्तगीर** (फा.), बद्ध.
**दहकपट्टी** (सं.), इनाम जमीनी सोडून इनामदाराकडून अवांतर उत्पन्नावर घ्यावयाचा कर. हा दर दहा वर्षांनीं वसूल करीत.
**दाईया** (अ.), इच्छा.
**दाब**, धमकावणी, धाक, दरारा, रुबाब.
**दारमदार** (फा.), ठराव, करार, भिस्त.
**दिवानमुख्तार**, अधिकार असलेला मंत्री.
**दुतर्फा** (फा.), दोन्ही बाजूंस.
**दुनवी**, व्यावहारिक.
**दुरअंदेश** (फा.), दूरदृष्टी, धूर्त, दूरवर विचार करणारा.
**दुरसी**, अस्पृश्य, रजस्वला.
**देरकसी**, दिरंगाई.
**दौलत** (अ.), संपत्ती, राज्य, सैन्य, ऐश्वर्य.
**दौलतख्वाह** (फा.), हितेच्छु.

### न

**नकशा** (अ.), विचार, कार्यक्रम, व्यूह.
**नक्त** (अ.), रोकड, 'द्रव्यं नख्तमुदाहृतम्.'
**नजर** (अ.), भेट, उपायन.
**नमूद** (फा.), उघड, स्पष्ट, प्रगट.
**नवनिगाहदास्त** (फा.), नवीन सैन्य भरती.
**नवीसिंदे, नवीसंदा, नवीशिंदा,** लिहिण्याचें काम करणारा, कारकून.
**नागवण** (फा.), लुटालूट, लुबाडणें, सरकारी दंड.

**नादर, नादिर** (अ.), दुर्मिळ, अमोल, अजब.
**नाबूद** (फा.), नष्टप्राय, अविद्यमान, नव्हता असा.
**नाळ** (फा.), बंदुकीची नळी.
**नाळबंदी** (फा.), मोहिमेवर जातानां शिपायांस देण्यांत येणारी आगाऊखर्ची. नालठोकणीं.
**नि ॥, निस्बत** (अ.), तर्फ, पक्ष, संबंध.
**निगाहदास्त** (फा.), फौजभरती, शुश्रूषा.
**निफाक** (अ.), द्रोह, द्वेष.
**निशा** (अ.), उधारीची पत, वचन, आबंद, कैफ.
**निशान** (फा.), बंदूक, खूण, झेंडा.

## प

**पटी, पट्टी,** यादी.
**पतक, पथक** (म.), तुकडी.
**पयदरपय** (फा.), लागोपाठ, पावलागणिक, एकामागून एक.
**पयहम, पैहम** (फा.), वारंवार.
**पसपा** (फा.), पिच्छेहाट.
**प्याज, प्यादा** (फा.), पायशिपाई, पायदळ.
**पागा** (फा.), अश्वशाला, रिसाला.
**पायगा** (फा.), फौजेचा सरंजाम.
**पाळेगर,** डोंगराळ प्रदेशांत राहणारा कर्नाटक-प्रांतांतील लुटारू व बंडखोर लोकांचा मुख्य, बंडखोर सरदार.
**पुरबाजिंदी** (फा.), अतिशय धूर्त, कपटानें भरलेला.
**पुरसीस** (फा.), प्रश्न, विचारपूस.
**पेश** (फा.), पुढें.
**पेशकदमी** (फा.), पुढे पाऊल टाकणें, प्रगती, युद्धाची हालचाल.
**पेशकसी (पेशकस)** (फा.), खंडणी, नजराणा, उपायन.
**पेशखाना** (फा.), प्रवासांत अगोदर पुढें पाठ-वावयाचे डेरे वगैरे सामान.
**पेशजी** (फा.), पूर्वीं, मागें.
**पेशबंदी** (फा.), दूरदर्शीपणा.
**पेस्तर** (फा.), पुढें, पुढील.
**पैगाम** (फा.), संदेश, निरोप.
**पोख्त** (फा.), पक्व, प्रौढ, थोर.

## फ

**फडचे** (हिं.), पहाणीनंतर लागलेला पूर्ण निकाल, बेबाक करणें.
**फरारी** (अ.), गुन्हा करून पळून गेलेला, देश-त्याग केलेला.
**फरासखाना** (अ.), डेरे, कनाथा, बिछायती इ० सामान ठेवण्याची जागा.
**फरासीस** (हिं.), फरेंच.
**फल्याने, फलाँ** (फा.), अमुक.
**फहमायश** (फा.), सूचना, निवेदन.
**फिदवी** (अ.), सेवक.
**फिदवीयत** (अ.), सेवा, सेवासक्ती.
**फिरंगी** (फा.), युरोपियन मनुष्य, टोपीवाला, पोर्तुगीज.
**फैसला** (अ.), निवाडा, निर्णय, ऋणमोचन.

## ब

**बइतिफाक** (अ.), सुसंगत, योगायोगानें.
**बजिनस** (फा.), वस्तुतः, हुबेहूब, सदेह.
**बतरीक** (अ.), या तऱ्हेनें.
**बदकौल** (फा.), वचनभ्रंश.
**बंदगानआली** (फा.), राजाचे सन्मानदर्शक संबोधन.
**बदमामली** (फा.), दुष्कृत्य करणारा.
**बमय** (अ.), बरोबर, सहित (सहितवाचक दोन्हीं शब्द एकत्र आले आहेत).
**बमोजिब** (फा.), प्रमाणें.

**बमोजिब तलब** (फा.अ.), मागणीप्रमाणें पगाराप्रमाणें.

**बयान** (अ.), वर्णन, तारीफ, विस्तार.

**बरकरार** (फा.), निश्चिती, कायमी.

**बरखिलाफ** (फा.), विरुद्ध.

**बल पडणें**, जोर येणें, महत्व येणें, वितुष्ट येणें, फरक पडणें.

**बलवा**, गलबला, बंड, कुप्रसिद्धी, अव्यवस्था, उपद्रव.

**बश, बेश**, उत्तम, चांगले.

**बशर्त** (फा.), अटीवर.

**बहाल, बाहाल** (फा.), पूर्ववत् नेमणूक, कृपा.

**बागी** (फा.), बंडखोर, स्वामिद्रोही.

**बातनी** (अ.), अंतस्थ.

**बाद-अहद** (फा.), करारानंतर.

**बाद-तंबी** (अ.), ताकिदीनंतर, धमकावणीनंतर.

**बादली** (फा.), सोनें, रुपे, तांबे यांच्या तारांचे कांहीं सूत, रेशीम व कांहीं जर मिळून विणलेलें ; भरजरी.

**बादवाही** (**बादहवाई**), टाकाऊ, निराधार, अफवा, निरुपयोगीपणा.

**बानीकार** (फा.), लेखक, अभिमानी, प्रेरक, शिल्पकार.

**बार** (फा.), परवानगी.

**बाहिरबुनगा** (फा.), सैन्याच्या सामग्रीचा तळ; सैन्याबरोबरचे उदमी वगैरे गैरलढाऊ लोक.

**बिरादर** (फा.), भाऊ, भाऊबंद.

**बिला-उजर** (अ.), हरकत न घेतां.

**बुनगा**, सैन्याच्या सामग्रीचा तळ, ठेंगणा.

**बूदबास** (फा.), राहण्याचें ठिकाण, अस्तित्व.

**बेइस्तकलाल**, धैर्यहीन.

**बेगमी** (फा.), निश्चिती, पुरवठा, संग्रह. 'नैश्चित्यं बेगमी स्यात्' (रा.व्य.को.).

**बेतऱ्हा** (फा.), विलक्षण, भारी.

**बेदिल** (फा.), उदासीन, असंतुष्ट, श्रमी.

**बेमरमत**, नादुरुस्त.

**बेशक** (फा.), निःसंशय, निर्धास्त.

**बेहिमत**, म्याड.

## भ

**भौमवासर** (सं.), मंगळवार.

## म

**मा।नुले, मशारनिले, मशारनिल्हे** (अ.), वर सांगितलेला, उपरिनिर्दिष्ट.

**मार** (मजकूर) (अ.), पूर्वी सांगितलेला, चालू, माहिती, हकीकत, पत्रांतील वर्तमान, उल्लेख, विचार.

**मकदूर** (अ.), सामर्थ्य, ताकद, जोर.

**मकाने** (अ.), ठिकाणें, टप्पे, मुक्कामाच्या जागा, रक्षणस्थान.

**मकार** (अ.), ठक, तत्वहीन मनुष्य, फसव्या, भोंदू.

**मखफी** (अ.), गुप्त.

**मगलूब** (अ.), जित, नियंत्रित केलेला.

**मजहला** (अ.), संकट, बखेडा.

**मनोरे**, लढाऊ जहाज, लढाऊ गलबत. (इंग्रजी man-of-war चे रूपांतर)

**ममनून** (अ.), उपकृत, कृतज्ञ.

**मर्जीमुबारक** (अ.), शुभेच्छा, श्रेष्ठांची इच्छा.

**मरकूम** (अ.), लिखित.

**मरहूम** (फा.), मेलेला, कैलासवासी, गत.

**मरातिब** (अ.), श्रेणी, दर्जा, मानपान.

**मलफूफ** (अ.), पाकिटांत बंद केलेलें.

**मवकूफ** (अ.), स्थगित.

**मवजूद** (अ.), विद्यमान, हजर.

**मवाश, मवास** (हिं.), आश्रय, संरक्षण.

**मवासा, मोवासा** (अ.), बंडखोर, लुटारू, बंड.

**मसलत, मसलहत** (अ.), सल्ला, योग्य विचार.
**मसीर, मुशीर** (अ.), मंत्री, सल्लागार.
**मालबर** (फा.), विश्वासू.
**मानेमुजाहिम** (अ.), प्रतिबंध करणारा.
**माबैन** (अ.), मधील, मध्यंतरी, दोघांतील.
**मामलतदार** (अ.), तालुक्याचा अधिकारी.
**मामलती** (अ.), तालुक्याच्या वसुलीचे काम. जोखीम, महत्वाचे कार्य.

**मामूल** (अ.), वहिवाट, चाल.
**मालमवेसी** (अ.), चीजवस्त, गुरेंढोरें.
**माहाल, महाल** (अ.), जिल्हा, खातें.
**माहासरा, महासरा** (अ.), वेढा, परिघ.
**मिनत, मिन्नत** (अ.), मनधरणी करणारा.
**मिसमार** (अ.), नाश, विध्वंस, चुराडा.
**मिसलबंदी** (अ.), कामाची वांटणी आणि व्यवस्था.

**मुकदस** (अ.), पवित्र.
**मुकरब** (अ.), प्रिय, लाडका.
**मुकाबिल** (फा.), समोर.
**मुख्तार** (अ.), नियोजित, अधिकृत, प्रतिनिधि.

**मुजरद** (अ.), प्रसंगविशेषी, नियोजित, खास.
**मुजाहिम** (अ.), प्रतिबंध करणारा.
**मुजमू** (अ.), वसूलीचे काम, वसुली.
**मुतफिक, मुताफिक,** (अ.), एकरूप असलेले, एकमताचे.

**मुतवजे** (अ.), वळलेला.
**मुतवफी** (अ.), मेलेला.
**मुतवातर** (अ.), पुनःपुनः, सतत.
**मुतसरफी** (अ.), ताब्यांतील.
**मुतसल, मुतसिल,** (अ.), जवळ.
**मुनासिब** (अ.), उचित, योग्य.
**मुफलिस** (अ.), गरीब, दुःखी.
**मुबादला** (अ.), ऐवजीं, बदली.
**मुबारक** (फा.), मंगलदायी, मंगल.
**मुबारकबादी** (फा.), मंगलचिंतन, अभिनंदन.
**मुबालमा** (अ.), पाल्हाळ, विस्तार.
**मुरबी** (अ.), कैवारी, अनुभविक.
**मुलहक** (अ.), जोडलेला, मिळवलेला.
**मुलाजम** (अ.), चाकर, सेवक.
**मुलाजमत** (अ.), चाकरी, सेवा.
**मुशारा, मुशाहिरा,** (अ.), मासिक पगार, दरमहा, 'वेतनं तु मुशाहिरा' (रा.व्य.को.)

**मुस्तकीम** (अ.), कायम, निश्चित, भक्कम.
**मुस्तैद** (अ.), सिद्ध, तयार, भक्कम.
**मुस्तैद जंग** (अ.), लढाईस सिद्ध.
**मुसाहेब** (अ.), सोबती, स्नेही, सहचर.
**मोतमद** (अ.), चिटणीस, विश्वस्त.
**मंदवासर** (सं.), शनिवार.

## य

**यकसू** (फा.), स्नेह.
**यकीन** (अ.), निश्चित.
**यख्तियार** (अ.), प्रमाण, शक्ति, अधिकार, सत्ता.

**येका** (फा.), ऐक्य.

## र

**रजावंद** (फा.), कबूल, खुष, स्वीकृत.
**रदजवाब** (अ.), प्रत्योत्तर.
**रदबदली** (फा.), तहचर्चा, वकिली, शिष्टाई, तरफदारी, भीड-खर्ची.

**रफा** (अ.), निराकरण.
**रफीक** (अ.), स्नेही, मित्र.
**रसद** (फा.), सैन्यासाठीं सांठविलेलें धान्य, दाणा, वगैरे.

**रहदारी** (फा.), सर्वसामान्य लोकांची वाहतूक, वर्दळ, ये-जा.

**रहस** (रहस्य), गुपित.
**रावत** (सं.), घोडेस्वार.

**रुख (फा.)**, चेहरा, दिशा.
**रुखसत (अ.)**, निरोप, रजा, परवानगी.
**रुजुवाती (अ.)**, कबूली, हिशेब, यादी इ० तील कलमे ताडून पाहणे.

**रुजू (अ.)**, सरळ, दाखल, सादर, मान्य, जप्त, पसंत, सरकारजमा.

**रूबकार (फा.)**, सन्मुख, फलदायी.
**रोजमुरे (फा.)**, नित्य, रोजच्यारोजचे पगार.

**ल**

**लगायत (अ.)**, पासून.
**लाइलाज (अ.)**, निरुपाय.
**लाचार (फा.)**, क्षीणोपाय, निरुपाय, निराश्रित.

**व**

**वलंदेज**, डच लोक.
**वस्तभाव (सं.)**, चीजवस्त.
**वहमनाक (अ.)**, संशयखोर, संशयास्पद.
**वाकई (फा.)** वस्तुतः
**वाट करणार (म.)**, व्यवस्था करणार, सोय करणार, प्रविष्ट, दाखल.

**विदेही**, शारीरिक व ऐहिक विषयांची आसक्ती नष्ट झालेला.

**वोढा बसवणें (ओढा बसवणें) (सं.)**, दाब बसवणें.

**वोली (म.)**, तारण, गहाण.

**श**

**शकल (अ.)**, आकृति, योजना, व्यवस्था, प्रकार.

**शबखून (फा.)**, रातछापा.
**शरफ (अ.)**, बहुमान.
**शरीक (अ.)**, वाटेकरी, दोस्त.
**शशांकित** (शशांकित) शंकाग्रस्त.
**शह (फ.)**, धाक, दरारा.
**शागिर्दपेशा (फा.)**, नोकर, चाकर.
**शोहरत (अ.)**, प्रसिद्धी, कीर्ति.

**स**

**सख्त (फा.)**, कठीण, कडक.
**सजावाकई (फा.)**, योग्य शिक्षा.
**सदरहू (फा.)**, उपरिनिर्दिष्ट.
**सदराह होणें**, सैरावैरा पळून जाणें.
**सदी (फा.)**, शतक.
**सनगे (म.)**, विणलेली वस्त्रें, वस्त्रांचे तागे, नग, उंची वस्त्रें.

**सरगर (फा.)**, चांभार.
**सरगरम (फा.)**, उद्युक्त, सोत्साह.
**सरंजाम (फा.)**, साधनसामुग्री.
**सरफराज (फा.)**, ऊर्जित, अर्पित.
**सरफराजी (फा.)**, मानांत बढती.
**सरबराई (फा.)**, कृती, योग्य व्यवस्था.
**सरसुभे (फा.)**, सुम्याचा मुख्य.
**सरेदरबार (फा.)**, भरदरबारांत.
**सलामती (अ.)**, सुरक्षितता.
**सलाम मुजरा** (अ.), वंदन.
**सलाह (अ.)**, योग्य उपदेश, हितवाद.
**सलाहकार (अ.)**, सल्लागार.
**सलाहदौलत (अ.)**, राज्यास इष्ट.
**सलाहनेक** (अ.), इष्ट हितवाद.
**सलाहवक्त** (अ.), समयोचित.
**सलूक** (अ.), सलोखा, सख्य, शिष्टाचार.
**सवदागिरी** (फा.), व्यापारी.
**साजस** (फा.), संधान, कट, कौटिल्य, कपट.
**सादर** (अ.), प्रविष्ट.
**सालाबाद** (फा.), वर्षानंतर.
**सिकस्त** (फा.), पराजय.
**सिबंदी** (फा.), किल्ल्यांतील फौज.

**सिरपेच** (फा.), पगडीवर घालण्याचा रत्न-जडित अलंकार.

**सिलक, शिलक** (फा.), सरबत्ती.

**सिलेदार** (अ.), हत्यार बाळगणारा, बहुमानाची पदवी.

**सुतरस्वार, शुतरस्वार** (अ.), सांडनीस्वार.

## ह

**हकीक** (अ.), वस्तुतः, खरोखर.

**हंगामा वारद होणें** (फा.), दंग्यास सुरवात होणें.

**हमराही** (फा.), एकाच मार्गी जाणारे, बरोबरीचे.

**हरकत** (अ.), हालचाल, विरोध, आक्षेप, अडथळा, विलंब.

**हरकारे** (फा.), जासूद, टेहळे, पडेल ते काम करणारे.

**हरगिज** (फा.), कधीहीं, बिलकुल.

**हासल** (अ.), प्राप्त, लभ्य, नफा, तात्पर्य.

**हिफज, हिफाजत**, पाठ, स्मरण, आश्रय, बचाव.

**हिला** (अ.), युक्ती.

**हुजराती** (अ.), जवळ असलेले.

**हुजूर पिजीर** (अ.), राजाने मंजूर केलेले.

**हौसलेदार** (अ.), कर्तृत्ववान, शक्तिवान, महत्वाकांक्षी.

# सूची

## व्यक्तिनिर्देश

**घ**



**च**



**ज**



**ट**



**त**



**द**

भ



म

# स्थलनिर्देश

घ



च



ज



झ



ड



त



थ



द



ध



न



प

ब



भ



म



र

व



श



स



ह